श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः।

# चरित्र चिंतन

## प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज

लेखक :- डॉ. वासुदेव व्यंकटेश देशमुख.

प्रकाशक

शाश्वत प्रकाशन, वसई.

**प्रकाशक :**
**शाश्वत प्रकाशन**
२०६, अमृत कॉटेज्, दिवाणमान
साई मंदिराजवळ, माणिकपूर, वसई (प.)
जिल्हा ठाणे ४०१२०२
दूरभाषः ०२५०-२३४३६६३



**प्रकाशनकाल :**
प्रथम आवृत्ति, आषाढ शु।। १, शके १९२७
प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती पुण्यतिथि.
७ जुलै, २००५.
**संगणकीय अक्षरजुळणी : स्वामीधाम, पुणे.**

**मुद्रक :**
**सुपर फाईन आर्ट, लोअर परेल, मुंबई.**
**दूरभाष :**

**लेखक :**
**डॉ. वासुदेव व्यंकटेश देशमुख,**
एम् डी
५०, ७वी गल्ली, नटराज सोसायटी,
कर्वेनगर, पुणे ४११०५२
दूरभाष : ०२०-२५४४१५८२

**मूल्य : रु.१२५/-**

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः।

मज हृदयीं सद्‌गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु।
म्हणौनि विशेषें अत्यादरू। विवेकावरी।।

प.पू. प्रातःस्मरणीय
योगीराज श्री वामनरावजी गुळवणी महाराज.



यांच्या चरणी सादर समर्पण.

*वासुदेव*

श्रीगुरुःशरणम् ।।

# लेखकाचे मनोगत

**श्रीगुरुनाथेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि।**

ह्या जगांत दुर्लभ असे कांही असेल तर ती सद्वासना आहे, अशा अर्थाची श्रीज्ञानेश्वरमाउलींची ओवी आहे. ईश्वराभिन्न सद्‌गुरुनाथांच्या अहैतुकी कृपेने परमगुरु परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराजांच्या संपूर्ण वाङ्मयाचा समावेश असलेले एका सांगणिक धामाच्या (website) रचनेचा संकल्प मनांत पालवला. हा एक चमत्कारच वाटतो. श्रीस्वामीमहाराजांच्या वाङ्मयाचे अगदी मर्यादित ज्ञान, जुजबीच संस्कृत, सांगणिक जालतंत्राची (networking) साधारण माहिती, इतक्या तुटपुंज्या भांडवलावर सुरुवात करूनही, वेळोवेळी सर्व प्रकारचे साह्य मिळत गेले, त्या त्या क्षेत्रांतील तज्ज्ञांचे सहकार्य मिळत गेले ही सद्‌गुरुनाथांच्या संकल्पशक्तीचीच महती होय. ह्या "स्वामीधामा"साठी श्रीस्वामीमहाराजांचे एक इंग्रजी चरित्र लिहिले गेले. त्याचे बऱ्यापैकी स्वागत झाले. ह्याची वार्ता पुण्याच्या आमच्या "श्रीवासुदेवनिवास" त्रैमासिकाच्या संपादिका गुरुभक्त सुशीलाताई मोडक यांच्या कानांवर गेली. त्यांनीच प्रथम श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्र व वाङ्मयावर आधारित लिखाण "श्रीवासुदेवनिवास"साठी करवे अशी सूचना केली ती शिरोधार्य समजून हे लेख क्रमशः लिहून झाले. आमच्या त्रैमासिकांच्या वाचकांचाही अनुकून प्रतिसाद मिळाला. श्रीगुरुचरणी यथाशक्ति यथामति यत्किंचित् सेवा रुजू झाल्याचे समाधान लाभले.

गेल्या वर्षी श्रीस्वामीमहाराजांच्या सार्धजन्मशताब्दीच्या निमित्ताने या लेखांवर आधारित प्रवचनेही करण्याचा योग आला. अनेक स्वामीभक्तांच्या आत्मीयतेचा प्रत्यय त्यांतून आला. तसेच श्रीक्षेत्र गरुडेश्वर (गुजरात) येथे २००२ सालच्या कोजीगुरी पौर्णिमेच्या शुभ मुहूर्तावर स्थापन झालेल्या "**प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनी**"च्या माध्यमांतूनही अनेक दत्तसंस्थांचे पदाधिकारी, दत्तभक्त, विद्वज्जन यांच्या स्नेहान्वित कृपेचा लाभही झाला. प्रबोधिनीच्या २००३ व २००४ या श्रीक्षेत्र कारंजा (महाराष्ट्र) व श्रीक्षेत्र पीठापूर (आंध्र प्रदेश) येथे संपन्न झालेल्या वार्षिक संमेलनांचाही यांत समावेश आहे. पीठापूरच्या संमेलनांत वसईचे प्रसिद्ध स्वामीभक्त श्री. सुनील पाध्ये(पाध्येकाका) यांचा परिचय होऊन त्यांनी चालविलेले स्वामीमहाराजांच्या चरित्र व वाङ्मयाच्या थोर कार्याची माहिती मिळाली. त्यांच्या या कार्यांत आपलाही कांही खारीचा वाटा असावा असा प्रयत्न आहे. त्यांच्या वाचण्यांत हे लेख आले. जिज्ञासू स्वामीभक्तांना यांचा उपयोग

होईल असे त्यांना प्रकर्षाने वाटल्याने त्यांनी हा संग्रह छापण्याचा प्रस्ताव मांडला. अशी या पुस्तकाची जन्मकथा आहे.

इथे एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे. हे श्रीस्वामीमहाराजांचे चरित्र नव्हे. श्रीस्वामीमहाराजांची अनेक चरित्रे मराठीत उपलब्ध आहेत. ह्या लेखांचे प्रयोजन श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रांतून बोध घेण्याचे आहे. अवतारी संतांचे जीवन परमार्थमार्गाचे प्रकाशन करते. स्वतः स्वामीमहाराजांनीसुद्धां श्रीगुरुचरित्राची रचना त्रिखंडात्मक करून त्यांत अंतर्भूत असलेल्या ज्ञान, कर्म व भक्ति या त्रिविध मोक्षमार्गाचे दिग्दर्शन विशद केले आहे. अर्थात्च स्वामीमहाराजांच्या चरित्रांतूनही साधकांना त्यांच्या त्यांच्या अधिकारानुसार मार्गदर्शन उपलब्ध होणार यांत काय संशय? हे चरित्र नसून चरित्रचिंतन आहे. हे लेख वेळोवेळी स्वतंत्रपणे लिहिलेले असल्याने त्यांत थोडा विस्कळीतपणा स्वाभाविकच आहे. तसेच कुठे कुठे पुनरुक्तीही आढळते. वाचकांच्या सोयीसाठी ग्रंथाच्या शेवटी त्यांच्या जीवनांतील प्रमुख घटनांचा क्रम दिला आहे. तो पुरेसा ठरेल असा विश्वास वाटतो. तसेच त्यांच्या ग्रंथांची एक सूचीही दिली आहे.

ह्या निगूढ तत्त्वांचा मागोवा घेणे आणि त्याद्वारे आपल्या चित्ताचे मल यथाशक्य शुद्ध करणे, हाच या लेखांचा मुख्य उद्देश आहे. असे या लेखांचे स्वरूप मननात्मक आहे. श्रीस्वामीमहाराजांचे अथांग जीवन आणि लेखकाची अत्यल्प मति यांचा विचार करता, सश्रद्ध जिज्ञासू साधकांना यांतून यत्कंचित्ही साधनोपयोगी पाथेय गंवसले तर त्याचे श्रेय श्रीस्वामीमहाराजांच्या जन्मकर्माचे आहे. ह्या लेखांतील उणीवा, प्रमाद आणि अज्ञान यांच्यावर मात्र या अकिंचन लेखकाचाच अधिकार आहे.

हे पुस्तकाच्या प्रकाशनाबद्दल सर्वश्री शाश्वत प्रकाशन, वसई - विशेषतः स्वामीभक्त श्री. सुनील पाध्ये(पाध्येकाका), ह्या लिखाणासाठी मला उद्युक्त केल्याबद्दल व वेळोवेळी मार्गदर्शनासाठी गुरुभक्त सुशीलाताई मोडक, हे लिखाण बारकाईने तपासून शुद्धीकरणासाठी सन्मित्र गु.भ. दत्तात्रेय त्रि. बोंद्रे, तसेच मुद्रिते तपासणीसाठी पत्नी सौ. अरुणा देशमुख व कन्या डॉ. सौ. वर्षा देशमुख (गोसावी) हे सर्व श्रेयाचे वाटेकरी आहेत.

"तेवी तुम्हां संतांचा पढियावो। कैसेनि तरी आम्हांवरी हो। इयां काकुळती जी आहो। सलगी करीत।।" ह्या माउलींच्या शब्दात सर्व वाचक संतसज्जनांची क्षमा व कृपा मागून ही सेवा श्रीस्वामीमहाराजांच्या चरणी समर्पित करतो.

**वासुदेव व्यं देशमुख**
**आषाढ शु।।१, शके १९२७**
**पुणे.**

**श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः।**

# प्रकाशकाचे निवेदन.

प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजांच्या असीम कृपेने, शाश्वत प्रकाशनाची वाटचाल समाधानकारक चालू आहे. आम्ही हाती घेतलेल्या या स्वामीकार्यामागे त्यांचीच प्रेरणा व आशीर्वाद आहेत. त्यामुळे प्रकाशित पुस्तकांना धीमा पण स्थिर उठाव आहे. त्यामुळेच आम्ही नवीन प्रकाशने सादर करीत आहो.

पू.पिताजी पाध्येकाका व ती.सौ.आई यांची प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज प्रबोधिनीच्या वार्षिक संमेलनासाठी श्रीक्षेत्र पीठापूर येथे गेले होते. तेथे अनेक स्वामीभक्तांच्या, विविध दत्तसंस्थांच्या विश्वस्तांच्या व विद्वान् व्यासंगी त्यांचे अभ्यासकांबरोबर परिचय झाले. अखिल भारतांतील दत्तसंप्रदायामध्ये एका नवीन चैतन्याची झळाळी जाणवली. ह्या दत्तभक्तांपैकीच एक डॉ. वासुदेव व्यं. देशमुख आहेत. डॉक्टरांनी एका वेब्साईट् निर्माण करून श्रीस्वामीमहाराजांचे वाङ्मय, चरित्र, तत्त्वज्ञान व कार्य यांची परिपूर्ण माहिती जागतिक पातळीवक उपलब्ध करून दिली आहे. त्यांचा स्वामीमहाराजांच्या जीवनाचा बराच अभ्यास आहे. त्यांचे गेल्या चार-पांच वर्षांत प्रकाशित झालेले या विषयांवरचे लेख ती. पाध्येकाकांच्या वाचनांत आले. तेव्हां त्यांना प्रकर्षाने असे वाटले की हे एका पुस्तकाच्या स्वरूपांत मराठी स्वामीभक्तांपुढे यायला हवेत. त्याप्रमाणे त्यांनी डॉक्टरांपुढे हा प्रस्ताव ठेवला. त्याचेच फलित म्हणजे प्रस्तुत ग्रंथ होय.

ह्या प्रकाशनाला प.पू. योगतपस्वी श्री. नारायणकाकामहाराज ढेकणे यांचे आशीर्वाद मिळाले आहेत ही श्रीस्वामीमहाराजांच्या कृपेची साक्षच असे मी समजतो. पू. पिताजींनी चालविलेल्या स्वामीमहाराजांच्या जीवन व कार्याच्या उद्बोधनाच्या अविरत व्रताचेच हे पुढचे पाऊल आहे. आमच्याकडून श्रीस्वामीमहाराजांनी उत्तरोत्तर अशीच सेवा करून घ्यावी व आपल्या पदकमलांचा आश्रय अखंड ठेवावा हीच त्यांच्या चरणी प्रार्थना !

**संजय पाध्ये**
**शाश्वत प्रकाशन, वसई.**

# चरित्र चिंतन

प.प.श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज

## अनुक्रमणिका

।।श्रीगुरुःशरणम्।।

# प.प.श्रीमद्वासुदेवानन्दसरस्वती(टेंबे)स्वामीमहाराज
# एक दर्शन

**श्रीगणेशाय नमः। श्रीगुरुदत्तात्रेयाय नमः।**
**वासुदेव यतिं वन्दे वामनाय च सद्गुरुम्।**
**दत्ताभिधायच तथा कवीश्वराय ते नमः।।१।।**

यावनी पारतंत्र्याचें सहस्त्रक उलटून आंग्ल साम्राज्यशाहीचींहि मुळें रुजलीं होतीं. मुसलमानांच्या हिंसक व विध्वंसक हजार वर्षांनंतरहि भारतीय - विशेषतः वैदिक संस्कृती असंख्य, गंभीर घावांनीं विदीर्ण आणि क्षीण झाली होती. पण तिचा गाभा चातुर्वर्णीयांच्या विशेषतः ब्राह्मणाच्या नैष्ठिक, त्यागमय आणि तपस्वी परंपरांनीं जोपासला होता. आर्थिक, राजकीय आणि सामाजिक प्रतिकूलतेला तोंड देत वैदिक संस्कृती टिकवण्याचें श्रेय, अखिल भारतांत या काळांत दीपस्तंभांप्रमाणें मार्गदर्शन करणाऱ्या नानक, ज्ञानेश्वर, नामदेव, कबीर, तुलसीदास, चैतन्य महाप्रभु, सूरदास, मीरा, तुकाराम, रामदास आदि थोर संतांच्या परंपरांना, तसेंच राणा प्रताप, कृष्णदेवराय, छत्रपति शिवाजी आदि राज्यकर्त्यांना जातें. एकोणिसाव्या शतकांत आंग्ल विचारवंतांनीं भारतीय संस्कृतीच्या मर्मावरच घाव घातला. आपल्या पारंपरिक श्रद्धास्थानांवरच त्यांनीं छुपे हल्ले चढविले. हें त्यांनीं आंग्ल शिक्षणाच्या माध्यमांतून मुख्यतः केले आर्थिक प्राप्तीची लालूच दाखवीत वैदिक समाजाचा मार्गदर्शक व सांस्कृतिक परंपरांचा आधारस्तंभच अशा ब्राह्मण समाजालाच आंतूनच पोखरण्यांत ते यशस्वी झाले. हळूंहळूं वैदिक समाजाच्या धार्मिक श्रद्धा सामाजिक मानसांतून पुसट होत गेल्या. भारतीय विचारवंतांच्या गोंधळलेल्या मनःस्थितींतून आर्यसमाज, ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज आदींनीं जन्म घेतला. पारदर्शी ऋषिमुनींनीं स्वानुभवांतून उत्स्फूर्तपणें वेदांच्या माध्यमांतून निश्चित केलेलीं आपल्या धर्माचीं मूलतत्त्वें संदिग्ध भासूं लागलीं; आपल्या श्रद्धा डळमळूं लागल्या; सर्व प्रकृतीच्या व सर्व थरांच्या लोकांना योग-याग-कर्म-भक्ति-ज्ञान यांनीं संपन्न असलेला श्रुतिस्मृतिप्रणीत आचरधर्म आंतरिक विरोधांनीं ग्रस्त आणि दिशाहीन भासूं लागला; मानवी जीवनाचें सम्यक् दर्शन घडविणाऱ्या आणि सामाजिक मूल्यांचें यथार्थ प्रतिपादन करून, सर्व मानवजातीला जीवनाच्या कृतार्थतेच्या मार्गावर स्थिर करविणारीं पुराणें, भिक्षुकवर्गांनीं क्षुल्लक स्वार्थासाठीं पसरविलेल्या

भाकडकथा वाटूं लागल्या. थोडक्यांत **धर्माला ग्लानी आली होती आणि अधर्माचें अभ्युत्थान झालें होतें.**

अशा वेळीं समाजाला एका अशा अवताराची आवश्यकता होती जो केवळ श्रुतिप्रणीत धर्माची तात्त्विक बैठक सुस्थिर करून थांबणार नाहीं तर तदनुसारी स्मृतिप्रणीत कर्मयोग आचरून एक सार्वत्रिक आदर्श निर्माण करील आणि हिंदु समाजाच्या सर्वच घटकांना आपल्या धर्ममार्गावर अग्रेसर करील. अगदीं असेच होते आपले प.प.श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामीमहाराज! कोंकणांतल्या एका छोट्या गांवांत, गरीब पण धर्मनिष्ठ, दत्तभक्त वैदिक ब्राह्मण कुटुंबांत जन्म घेऊन, आदर्श ब्रह्मचर्याश्रम, आदर्श गृहस्थाश्रम आणि आदर्श संन्यासाश्रम आचरीत, कर्म, अष्टांगयोग, भक्ति आणि ज्ञान या सर्वांचें अनुभूतिपूर्ण दिग्दर्शन करीत, आसेतुहिमाचल भारतभर संचार करून त्यांनीं श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्मसेतु दृढ केला; हजारों स्त्रीपुरुषांना परमेश्वरोन्मुख केलें आणि श्रीदत्तभक्तीची पावन परंपरा पुष्ट केली. अशा या महापुरुषाच्या जीवनाचें चिंतन हा चित्तशुद्धीचा एक प्रभावी उपाय आहे अशा संतवचनाला अनुसरून हें एक वाङ्मय दर्शन घेण्यास आपण प्रवृत्त होऊं या!

प.प. श्रीगोविंदस्वामींच्या महासमाधीनंतर श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनें वाडी सोडून पत्नीसह उत्तरेकडे जातांना गंगाखेड मुक्कामीं महामारीच्या उपद्रवानें सौ.अन्नपूर्णामातुःश्रींच्या मृत्यूनंतर चौदा दिवसांनीं 'अनाश्रमी न तिष्ठेत'या शास्त्रवचनाला अनुसरून श्रीस्वामीमहाराजांनीं चतुर्थाश्रम घेतला. श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेंच उज्जैन येथें श्रीनरसिंहसरस्वतीकुलोत्पन्न श्रीसमर्थसंप्रदायाचे प.प.श्रीनारायणानन्द सरस्वती स्वामीमहाराज यांच्याकडून दंड ग्रहण केला. त्यानंतर श्रीदत्तप्रभूंची आज्ञा झाली कीं "सर्वत्र वर्णाश्रमलोप झालेला आहे. तरी सर्व भरतखंडांत पायींच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करावी." इथून तेवीस वर्षें या आज्ञेचें निष्ठेनें पालन करीत श्रीस्वामीमहाराजांनीं भारतभर परिभ्रमण केलें.

**व्यक्तिः** - श्रीस्वामीमहाराजांचें व्यक्तिमत्त्व प्रथमदर्शनींच छाप पडण्यासारखें नव्हतें. मध्यम बांधा, सांवळा रंग आणि अत्यंत साधे कपडे यांमुळें सर्वसाधारण माणसाला त्यांच्या योग्यतेची सुरुवातीला कल्पना येत नसे. ते

पूर्वाश्रमीं वाडीला पहिल्यांदा गेले तेव्हां 'हे ब्राह्मण तरी आहेत कीं नाहीं' अशा शंकेनें त्यांना पुजारीमंडळींनीं श्रीपादुकांवर पाणी घालूं दिलें नव्हतें. श्रीदत्तप्रभूंना त्यासाठीं गोविंदस्वामींना मुद्दाम कट्ट्यावर पाठवावें लागलें.

वाडीहून परततांना श्रीस्वामीमहाराज कोल्हापूरला श्रीमहालक्ष्मीचें दर्शन घेऊन येत असत. एकदां त्यांनीं ठकारभटजींच्या घरीं मुक्काम केला होता. ठकारांना महाराजांची योग्यता ठाऊक असल्यानें त्यांनीं कोल्हापुरांतील एका शास्त्रीबुवांना त्यांचा परिचय करून देण्यासाठीं बोलावलें होतें. त्यावेळीं एक मळकट पंचा नेसलेली महाराजांची मूर्ति पाहून त्यानीं विचारलें कीं, "हें असलें रत्न तुम्हीं कोठून आणलें? याकरितां कां आम्हांला तुम्हीं बोलावलें?" अर्थात् पुढें परिचय व कांहीं शास्त्रीय विषयावर बोलणें झाल्यावर चकित झालेल्या शास्त्रीबुवांना आपल्या उद्गारांबद्दल दिलगिरी व्यक्त करावी लागली.

एकदां शके १८२८ मध्यें श्रीस्वामीमहाराज देवास संस्थानांत आले. तेथील राजेसाहेबांना त्याची पूर्वकल्पना आल्यानें व त्यांची इच्छा श्रीमहाराजांना राजवाड्यांत आणून आपण स्थापिलेल्या दत्तमंदिरांत पहिली पूजा त्यांच्या हस्ते करविण्याची असल्यानें त्यांनीं कांहीं राजसेवकांना महाराजांच्या वाटेवर ठेवून 'एक संन्यासी या रस्त्यानें येतील त्यांना राजवाड्यांत घेऊन या' अशी आज्ञा दिली. श्रीस्वामीमहाराज त्या रस्त्यानें आल्यावर त्या सेवकांनीं त्याना राजाज्ञा निवेदन केली. तेव्हां महाराज म्हणाले,"तुमचा राजा मोठा आहे, तो आमच्यासारख्या संन्याशाला बोलावणार नाहीं, ते दुसरे कोणी तरी पालखींतील संन्यासी असतील. शोध करा" हें ऐकून व श्रीस्वामीमहाराजांकडे पाहून त्या राजसेवकांना भुरळ पडली व राजेसाहेबांची इच्छा अपुरीच राहिली. थोडक्यांत 'वेष असावा बावळा' या समर्थोक्तीला साजेसें श्रीस्वामीमहाराजांचें बाह्य स्वरूप होतें.

श्रीस्वामीमहाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रभावी घटक तेजस्वी डोळे व मृदु, ऋजु, स्निग्ध पण ठाम आणि व्युत्पन्न वाणी हे होते. श्रीमहाराजांच्या दृष्टीला दृष्टी देणें सामान्यतः अशक्यच होते. पण त्यांच्या करुणापूर्ण कृपाकटाक्षानें सहस्त्रावधि जीवनांना कृतार्थ केलें आहे. "साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे" असें त्याचें बोलणें असायचें. ते बोलूं लागले कीं सर्व इन्द्रियांचे कान करून ऐकत रहावें असें वाटायचें. शास्त्रीय प्रमेयांचें प्रतिपादन करतांना त्यांच्या वाणींत निःसंदिग्धता असायची तर सगुणभक्तीच्या निरूपणांत ती

प्रेमरसानें ओथंबलेली असायची. शरणागताला अभय देतांना ती कारुण्यानें भिजलेली असे तर उन्मार्गापासून परावृत्त करतांना ती वज्राप्रमाणें कठोर होई. या सर्व रूपानीं ती वाणी सदैव व्यक्तीचें व समाजाचें कल्याणच साधत असे.

अत्यंत कठोर कांटेकोर आचरण, श्रुति-स्मृति-पुराणें यांचा सांगोपांग, सखोल अभ्यास, निःस्वार्थ शास्त्रनिष्ठ जीवनशैली आणि सर्वांत मुख्य म्हणजे संपर्कांत येणाऱ्या प्रत्येक जीवमात्राविषयीं अकृत्रिम, आंतरिक, निरपेक्ष आणि तीव्र अनुकंपा, ह्यांमुळें श्रीस्वामीमहाराजांना सहस्रावधि भक्तांची निष्ठा मिळाली. त्या सर्वांना श्रीस्वामीमहाराजांच्या माध्यमांतून एक आश्रय, एक आधार, एक पारमार्थिक जीवनाचा दीपस्तंभ, थोडक्यांत एक सद्गुरु प्राप्त झाला.

**संग्रह :-** संग्रह हा शब्दच श्रीस्वामीमहाराजांच्या संदर्भांत वावगा ठरावा. चार लंगोट्या, दोन छाट्या, कधींमधीं एखादी धाबळी, दंड, कमंडलु, उपनिषदांची पोथी, पंचायतनाचा संपुष्ट, दोन दत्तमूर्ति आणि पाणी काढण्यासाठीं एक दोरी यापलीकडे कांहीं असलेच तर लिखाणाचें कांहीं साहित्य केव्हां केव्हां बरोबर असायचें. ऐन हिमालयाच्या थंडींतहि दोन छाट्या व एक धाबळी यापलीकडे वस्त्रांचा संग्रह त्यांनी केला नाहीं.

**राहणी :-**संन्यासाश्रमाच्या सर्व नियमांचें अत्यंत कांटेकोर पालन श्रीस्वामीमहाराज करीत. त्याचें वर्णन करतांनाहि छाती दडपते. कुणाचीहि सेवा घ्यायची नाहीं. वस्त्रें, भांडीं इ. स्वतःच स्वतःचीं धुवायची. कुणाचाहि स्पर्श करून घ्यायचा नाहीं. क्वचित् कधीं झालाच तर लगेच स्नान करायचें. त्रिकालस्नानाशिवाय प्रत्येक वेळीं शौचानंतर स्नान करावयाचें. आयुष्यभर संग्रहणीचा विकार असतांना हें किती कठिण असेल याचा विचार करवत नाहीं. शौचाला नदीच्या पात्राबाहेर जाण्याचा नियम होता. ब्रह्मावर्ताच्या चातुर्मासात उन्हाळ्यांत  नदीचा प्रवाह लहान झाला कीं शौचानंतर स्नानाला जायचें तर अर्धा मैल रणरणती वाळू तुडवीत जावें लागे. असा प्रसंग भर दुपारींहि येई. त्यावेळीं त्या तापलेल्या वाळूकडे पहायलाहि नको वाटावें. तसेंच शांतपणें नागव्या पायांनीं वाळू तुडवीत जावें व स्नान करून परत यावें. हें प्रत्यक्ष पाहिलेले श्री शिरोळकर स्वामी शंकराचार्य म्हणतात, 'अशा ब्रह्मनिष्ठ, देहावर ज्यांची बिलकुल आसक्ति नाहीं अशा महात्म्यांच्या दर्शनानें व भाषण, सान्निध्य इत्यादिकांचा लाभ ईशकृपेनें झाल्यानें आम्ही धन्य झालों.'

अग्निस्पर्श(शेकणें इ.) संन्याशांना वर्ज्य असतो. हा नियम अर्थातच महाराज कटाक्षानें पाळत. हिमालयांत दोन वर्षें संचार करूनहि हा नियम मोडला नाहीं. श्रीस्वामीमहाराज सूर्यभेदी प्राणायामानें थंडीचा प्रतिकार करीत. फक्त एकच वेळ अपवाद झाला - तोहि स्वच्छेनें नाहींच. गंगोत्रीस महाराज गेले असतांना तेथें स्नान करतांच महाराजांचें अंग इतकें गारठून गेलें कीं कांहींच हालचाल होईना. तेवढ्यांत कोणी तरी एक शेगडी जवळ आणून ठेवली तेव्हां बऱ्याच वेळानें शरीरांत थोडी ऊब आली.

**प्रवास:-** संन्यासाच्या नियमांप्रमाणें सतत पायींच प्रवास असायचा. पायांत कधीहि कांहींहि घातलें नाहीं कीं कुठल्याहि वाहनांत बसले नाहींत. एका गांवीं सहसा तीन रात्रींपेक्षां अधिक मुक्काम करीत नसत. मुक्काम बहुधा मंदिरांत, मठांत किंवा धर्मशाळेंत होई. एकदां ज्वरपीडेमुळें एका ब्राह्मणाच्या घरीं तीन रात्रींच्यावर रहाणें झालें तर देवांनीं शिक्षा केली ! शहरांत किंवा राजवाड्यांत महाराजांनीं कधींहि मुक्काम केला नाहीं. भक्तवात्सल्यामुळें क्वचित् अपवाद झाले.एकदां इंदोरमध्यें तिथल्या मंडळींचा आग्रह व निष्ठा पाहून व त्यांनीं संन्यासधर्माच्या पालनांतील सर्व अडचणी दूर करण्याचें मान्य केल्यानें अठरा दिवस मुक्काम झाला. तसेंच कुरुंदवाडच्या राजेसाहेबांच्या 'प्रेमबलानें' राजवाड्यांत न जाण्याचा व राजकीय भिक्षा न घेण्याचा नियम श्रीस्वामीमहाराजांना मोडावा लागला.

पावसाळ्यांत व्यासपौर्णिमेपासून दोन महिने संन्याशांचा चातुर्मास असतो. तेव्हांच फक्त महाराज खात्रीनें एका ठिकाणीं मुक्काम करीत. बहुतेक चातुर्मास शहरापासून दूर व बऱ्याच वेळीं दुर्गम ठिकाणींहि होत. असें असूनहि मुक्कामाची वार्ता पसरायचीच व त्या त्या ठिकाणाला भक्तमंडळींच्या गर्दीनें एखाद्या तीर्थस्थळाचें स्वरूप यायचें. 'अरतिर्जनसंसदि' ह्या ज्ञानी पुरुषाच्या सहज लक्षणानुसार महाराजांना केव्हां केव्हां अगदीं वीट येत असे. मुद्दाम जंगलांत वगैरे मुक्कामाचा प्रयत्न त्यांचा असे. श्रीदत्तप्रभू मात्र त्यांना सांगत, 'अरे तूं कुठेंहि गेलास तरी हे लोक येणारच. ' शके १८३१चा चातुर्मास गोदातीरीं मंथनकाळेश्वर या निर्जन ठिकाणीं चातुर्मास करावा अशा विचारानें महाराज तिथें थांबले; पण श्रीदत्तप्रभूंना हें मान्य नव्हतें. पुनःपुन्हां सांगूनहि महाराज ऐकत नाहींत असें पाहून देवांनीं छडी घेऊन घोड्यावर बसलेल्या साहेबाचा वेष घेऊन महाराजांना

धमकावलें व पुढें जाण्यास भाग पाडलें. **महाराजांचा सर्व प्रवास श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेंच होत असे** तो असा. एकदोन प्रसंगीं अपवाद घडले त्यांचा विचार पुढें येणारच आहे. चातुर्मासाखेरीजहि कांहीं ठिकाणीं मंडळींच्या विशेष प्रेमाग्रहानें किंवा कांहीं विशेष कार्याखातर अधिक मुक्काम होत असे. सर्वांत मोठा मुक्काम ब्रह्मावर्तांत दोन वर्षाहून अधिक झाला. या काळांत महाराजांचे पूर्वाश्रमांतील बंधू सीतारामहाराज यांनीं गायत्रीपुरश्चरण केलें.

त्या काळीं नव्यानें सुरूं झालेल्या रेल्वेच्या सोयीमुळें बऱ्याच पारंपरिक वाटा लुप्त होऊं लागल्या होत्या. अशा वेळीं लोक महाराजांना रेल्वेनें जाण्याचा सल्ला देत. पण **श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेला अनुसरून ते पायींच जात.** अशा वेळीं त्यांना अनेक वेळां दैवी मार्गदर्शन होत असे. याचीं कांहीं उदाहरणें आपण पुढें पाहणार आहोंत.

श्रीस्वामीमहाराज वेगानें चालत असत. रोज १०-१० कोस चालणें नित्यच होतें. एकदां तर शके १८२८च्या आश्विन वद्य ५ला दुपारीं भिक्षा करून पंढरपूरहून निघाले ते वद्य ६ला माध्याह्नीं वाडीला पोहोंचले. ८०-९० मैलाचा प्रवास एका दिवसांत झाला! त्यांच्याबरोबर चालणें साधारणपणें कठिणच असे. त्यांत पुन्हां त्यांचे नियम! या कारणानें ते सहसा एकटेच प्रवास करीत. मंडळी अतिप्रेमानें कधीं कधीं महाराजांच्या निषेधाला न जुमानतां मागें येत. अशा वेळीं कधीं समजुतीनें, कधीं क्रोधानें, कधीं शापाचा धाक दाखवून तर क्वचित् सिद्धींचा अवलंब करून ते स्वतःची सोडवणूक करून घेत.

डाकोरहून शिनोरास जातांना रामशास्त्री प्रकाशकरांनीं महाराजांची गाडीनें जाण्याची आज्ञा असतांना पायीं त्यांच्याबरोबर जाण्याचा आग्रह धरला. तेव्हां महाराजांनीं मागें वळून 'आतां तं मागें फिरतोस कीं नाहीं' म्हणत असा कांहीं क्रोधाचा आवेश आणला कीं मुकाट्यानें रामशास्त्री मागें फिरले. दोन दिवसांच्या प्रवासानंतर ते शिनोरला पोंचले तर गांवांतील मंडळींनीं श्रीस्वामीमहाराज दोन दिवसांपूर्वीच संध्यकाळीं तेथें आल्याचें सांगीतलें.

महाराज गलगलीहून जातांना तेथील वैष्णव मंडळींना उशीरां कां होईना त्यांची योग्यता लक्षांत आल्यानें ते महाराजांना राहण्याचा आग्रह करूं लागले. त्यांना नकार देऊन महाराज मार्गस्थ झाले असतां ते त्यांच्या पाठीमागें येऊं

लागले. तें पाहून महाराजांनीं रस्त्यात एक रेषा काढली आणि सांगितलें कीं 'जर ही रेषा ओलांडून याल तर तुमचा वंशक्षय होईल'. मग मात्र कुणाचीहि पुढें येण्याची हिंमत झाली नाहीं.

शके १८२८ च्या चैत्रांत श्रीस्वामीमहाराज काशीला गेले होते. तेव्हां पंचक्रोशी यात्रेंत कांहीं यात्रेकरूंनीं पूर्वसूचना देऊनहि तीर्थश्राद्ध न करतां महाराजांना भिक्षा घातली. नैवेद्य दाखवून तो घास महाराजांनीं तोंडांत घालतांच तो घशांतच अडकला व महाराजांना यात्रा सोडून लगेच वाडीचा रस्ता धरण्याची आज्ञा झाली. त्यावेळीं सहयात्रींनीं त्यांना जाऊं न देण्यासाठीं त्यांना गराडा घातला. पण त्या ५०-७५ माणसांतून श्रीस्वामीमहाराज एकदम अदृश्य झाले ते प्रयागलाच प्रकटले.

**महाराजांची दिनचर्या :-** पहांटे चार वाजतां श्रीस्वामीमहाराजांचा दिवस सुरूं होई. प्रभुस्मरण व प्रातर्विधि आटोपल्यावर स्नान होई. स्नान नित्य त्रिकाल होई. दंडतर्पण, प्रणवजप आदि नित्य अनुष्ठान आवरून श्रीदत्तमूर्तीची पूजा होई. संन्याशाला फुले, तुळशी इत्यादि तोडतां येत नसल्याने कुणी आणुन दिले तरच हे उपचार देवाला मिळत. एरवीं थंड पाण्यानें स्नान आणि भस्मलेपन एवढीच पूजा असे. सकाळचा सर्व वेळ पाठ, अध्यापन इत्यादींत जात असे.

**श्रीस्वामीमहाराज वैदिक संस्कृतीचा चालता बोलता ज्ञानकोशच होते.** वेद, वेदांगें, स्मृति, षड्दर्शनें, पुराण, इतिहास यांचें सांगोपांग ज्ञान, ते सर्वांना त्यांचा अधिकार, आवड इ. पाहून देत असत. कुणाला वेदमंत्रांची संथा, कुणाला व्याकरण, कुणाला योग, कुणाला नित्यकर्म, कुणाला वेदान्त, कुणाला आयुर्वेद इ. विविध विषय त्यांनीं शिकवले आहेत. महाराजांना संगीत, काव्य इतकेंच काय पण सूतकताई, विणकाम अशा विद्यांतहि गति होती. कोणी बुद्धिबळ खेळत असले तर दुरूनच ते योग्य खेळी सुचवीत. त्यांच्या ज्ञानशक्तीला जणूं कांहीं मर्यादाच नव्हती.

एकदां वाडीला असतांना एक ब्राह्मण महाराजांकडे आला व त्यांच्यापुढें सामवेदाचें पठण करायचा आग्रह करूं लागला. महाराजांनीं त्याला देवापुढें जाऊन म्हणण्यास सांगीतलें तरीहि महाराजांसमोरच म्हणण्याचा हेका तो सोडीना. तेव्हां महाराजानीं त्याला अनुज्ञा दिली. पण एकदम त्याची स्मृति जाऊन त्याला कांहींच आठवेना. मग त्याला महराजांनीं एक मंत्र म्हणून दाखविला तेव्हां

त्याचा अहंकार जाऊन तो महाराजांना शरण आला. डाकोरला रामशास्त्री प्रकाशकर यांना महाराजांनीं एका वर्गाचीं पदें म्हणण्यास सांगीतलें. तीं त्यांनीं म्हणतांच आपण स्वतः त्याच्या जटा, घन, पंचसंधि, माला, रथक्रम, दंडक्रम इं. विकृति म्हणून दाखविल्या व रामशास्त्रींच्याकडूनहि म्हणून घेतल्या. जालवणला कांहीं वृद्ध वैदिक मंडळींना अरणें म्हणावयाचीं होतीं. परंतु योग्य सांगणारा न भेटल्यानें ती त्यांची इच्छा अपुरीच राहिली होती. श्रीस्वामीमहाराज तेथें गेल्यावर त्यांनीं त्यांना अरणें सांगीतलीं.

**आहार :-** माध्याह्नकाळीं भिक्षेला निघत. भिक्षा फक्त दक्षिणी ब्राह्मणांच्या घरींच घेत. तीन, पांच किंवा क्वचित् सात घरचीच भिक्षा घेत. सर्व भिक्षा एकत्र करून नदीच्या पाण्यांत बुडवून निथळून घ्यायची. अशा रीतीनें अन्नाची चवच मारायची. नंतर तिचे तीन भाग करून गोग्रास व नदीचा भाग देऊन फक्त तिसरा भागच ग्रहण करीत. यतीला सांगितलेला आठ घासांचाच आहार ते घेत. मठभिक्षा वर्ज्य होती. दंडग्रहणाच्या दिवशीं श्रीगुरुस्वामींच्या आग्रहामुळें मठभिक्षा घेतांच उलट्या सुरूं झाल्या. त्या थांबविण्यासाठीं गुरुस्वामींना देवांची क्षमा मागून पुनः असा आग्रह न करण्याचें वचन द्यावें लागलें. द्वारकेच्या मार्गावर (शके १८२१) गुजराथ प्रांतांतून जातांना दक्षिणी ब्राह्मणांचीं घरें नसल्यामुळें ३३ दिवस भिक्षा मिळाली नाहीं. गुजराथी ब्राह्मणांनीं दिलेलें खारीक व खोबरें खाऊन दिवस काढले. त्यामुळें संग्रहणीचा विकार बळावला. एवढें कठोर धर्माचरण होतें. दोन वर्षें श्रीस्वामीमहाराज हिमालयांत होते. तिथें त्यांना भिक्षा मिळाली किंवा कसें याची माहिती नाहीं.

संन्यासाश्रमाच्या नियमानुसार भिक्षेला जातांना कुणी नमस्कार केला किंवा काहीं विटाळ झाला तर उपोषण करीत. केव्हा केव्हां असें उपोषण एकादशीच्या उपोषणानंतरहि घडे. अशा वेळीं एखादें फळ किंवा भांडेंभर ताक घेत. उपास घडले तरी रोजचा दहा दहा कोसांचा प्रवास चालूंच असे. तसेंच पाठ प्रवचनें इत्यादि कार्यक्रम नित्याप्रमाणें चालूं असत. कुठें कुठें भिक्षेच्या वेळीं नियमांचें उल्लंघन होऊं नये म्हणून कुणी तरी बरोबर येत असे.

आहार अत्यंत मित म्हणजे वीस एक तोळ्याच्या आंत होता. ज्वारीची भाकरी, भात, ताक, लिंबू आणि मीठ एवढेच पदार्थ साधारणपणें जेवणांत असत. गूळ, तूप, गव्हाची पोळी त्यांना सोसत नसे. तसेंच पाणीहि नुसतें चालत नव्हतें.

घतलेंच तर थोडें काळें मीठ घालून पाणी घेत. साखरेला तर महाराज शिवतदेखील नव्हते. मेणबत्ती व परदेशी कापूरहि असाच वर्ज्य होता. साखरेच्या ऐवजीं गूळ घेत. श्रीखंडांत गूळ निषिद्ध असल्यानें वेळप्रसंगीं नैवेद्यासाठीं लोणी, गूळ, केशर असें श्रीखंड करण्यांत येई. तसेंच दही, वाटलेलें खिसमिस, केशर, विलायची, जायफळ असाहि एक पर्याय कधीं कधीं केला जाई.

दुपारीं तीनच्या पुढें मंडळींची ये जा सुरूं होई ती संध्याकाळपर्यंत. नित्य शेंकडो लोक येऊन आपल्या अडचणी किंवा कामना महाराजांच्या पुढें मांडीत. श्रीस्वामीमहाराजहि सर्वांचें म्हणणें आपुलकीनें ऐकून घेत व त्यांना उपाय सांगीत. सायंस्नान व संध्यावंदनानंतर पुराण किंवा शास्त्रीय विषयावर निरूपण होत असे. महाराजांची निरूपणाची शैली ओघपूर्ण व प्रभावी असून विवेचन सोपपत्तिक तसेच शास्त्रांतील व पुराणांतील चपखल प्रमाणांनी व दृष्टांतांनीं युक्त असे. वेदवाक्याचा उच्चार पुराण-निरूपणादिकांत न करण्याचा कटाक्ष होता. त्यांचा फक्त निर्देश करीत. मोठमोठीं विद्वान मंडळीं, नैयायिक व वेदान्ती, संन्यासी महाराजांच्या निरूपणाला आदरानें व आवडीनें येत. शके १८१५च्या चातुर्मासांत शारदापीठाधीश श्रीराजराजेश्वरस्वामी शंकराचार्य यांनीं श्रीस्वामीमहाराजांकडून आवर्जून उपनिषद्भाष्याचें श्रवण केलें.

निरूपणांत मुख्यतः अद्वैत वेदान्ताचें आचार्यमतानुसारी प्रतिपादन करीत. श्रीमदाद्यशंकराचार्यमताचा महाराजांना विशेष अभिमान होता. वाडीला श्रीस्वामीमहाराजांच्या दर्शनासाठीं प्राध्यापकद्वय विजापूरकर(कोल्हापूर) व भानू(पूणें) आले होते. तेव्हां प्रा. भानूंचें व्याख्यान नारायणस्वामींच्या कट्ट्या समोर झालें. तत्पूर्वी व्याख्यान आचार्यमतास अनुसरूनच व्हावें असें महाराजांनीं बजावलें होतें. स्वतःच्या मानापमानाविषयीं महाराज उदासीन होते; पण जगद्गुरु शंकराचार्यांच्याविषयीं अनादराचे उद्गार त्यांनीं कधींच सहन केले नाहींत. अशाच एका विद्वन्मन्य गृहस्थांनीं स्वतःचें लिखाण वाचून दाखवितांना 'श्रीमत् भगवद्गीतेवर आजपावेतों अनेक लोकांनीं टीका, भाष्यें, अर्थ केले असोन शंकराचार्यांनींहि द्राविडी प्राणायाम केला आहे.' एवढें वाक्य त्या गृहस्थांच्या तोंडून बाहेर पडलें मात्र, कीं श्रीस्वामीमहाराज म्हणाले, 'कोण आहे हा नरकांतला किडा; आमचे जगद्गुरु शंकराचार्य महाराजांना "द्राविडी प्राणायाम" म्हणतो? त्याचें हें पुस्तक नर्मदेंत नेऊन टाका.' उपस्थित भक्तांनीं ह्या आज्ञेची

त्वरित अंमलबजावणी केली हें सांगायला नकोच.

रात्रीं स्थानिक मंडळींच्या आवडीप्रमाणें भजन, कीर्तन आदि कार्यक्रम होत असत. कीर्तनाचीं आख्यानें महाराज लिहून देत तसेंच लिहिणाऱ्याला मार्गदर्शन करीत. भजनांत बऱ्याच वेळां प्रेमानें मंडळीं नाचत असत. असें प्रेमपूर्ण भजन महाराजांनाहि आवडत असे. केव्हां केव्हां तर भजन ऐकतां ऐकतांच महाराजांची समाधि लागायची. या सर्व कार्यक्रमांत मध्यरात्रहि कधीं कधीं उलटून जावी. त्यानंतरहि कुणी कुणी आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू येत असत. वाडीला कांहीं दिवस ह्या वेळीं स्थानिक मंडळींना ब्रह्मकर्म शिकवण्यात येई. अशा रीतीनें रात्रीं दोन वाजण्याच्या सुमारास महाराजांना आडवें होतां येई. दोन तासांचीच काय ती विश्रांति कीं पुढचा दिवस सुरूं होई. असें असूनहि महाराजांची मुद्रा कधीं कंटाळलेली, त्रस्त अथवा थकलेली दिसली नाहीं. अगदीं अंगांत ताप असतांनाहि, 'थांबा, एवढें हें हींव घालवून येतो'असें म्हणून ते प्राणायामादि उपायांनीं घटकाभरांत ताप घालवून पाठाला येत. असें त्यांचें तपोमय, दत्तसमर्पित जीवन हें एक अखंड असिधाराव्रतच होतें.

## प.प. श्रीवासुदेवानन्दसरस्वती(टेम्बे)स्वामीमहाराजांचा
## लोकसंग्रह

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**
**कुर्याद्विद्वांस्तथास्कतश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम्।।३-२५।।**

श्रीमद्भगवद्गीता(भ.गी.)

श्रीस्वामीमहाराज हे एक अवतारी व कारणिक, जन्मसिद्ध कोटींतील पुरुष होते. त्यांना स्वतःसाठीं प्राप्य असें कांहींच नव्हतें. "नानवाप्तमवाप्तव्यं"(भ.गी. ३-२२) ह्या उक्तीप्रमाणें त्यांच्या सर्व जीवनाचें उद्दिष्ट केवळ श्रीदत्ताज्ञेनें धर्मसंस्थापनेचें कार्य करणें एवढेंच होतें. उपजत एकांतप्रिय अशा या संन्याशाला केवळ श्रीदत्तप्रभूंच्या आदेशानुसार जन्मभर सतत लोकांच्या गर्दींत राहावें लागलेलें आपण पाहतो. "अरतिर्जनसंसदि"(भ.गी.१३-१०) ह्या मूळ वृत्तीमुळें स्वामीमहाराजांनीं क्वचित् या गर्दीला उबगून प्रभूंशीं कलहहि केलेला आहे. बरेचदां लोकांचा संपर्क टाळण्यासाठीं महाराजांनीं मुद्दाम वस्तीपासून दूर मुक्काम केला तर तिथेंहि गर्दी व्हायचीच. एकदां तर प्रभूंनीं त्यांना स्पष्टच सांगीतलें कीं, "अरे, तूं कोठेंहि गेलास तर लोकांची गर्दी होणारच. मग (वस्ती)जवळच कां रहात नाहींस?" स्वामीमहाराजांचीं बहुतेक चातुर्मासांचीं ठिकाणें शहरापासून दूर, पावसाळ्यांत तर दुर्गमच अशीं होतीं. उदा. कुरुगड्डी, नरसी इ. पण तिथेंहि लोकांची झुंबड व्हायचीच. आपण महाराजांची दिनचर्या पाहिलीच आहे. अगदीं भल्या पहांटेपासून मध्यरात्र उलटून गेली तरी एकांत असा महाराजांना मिळत नसे. महाराजांचें वैयक्तिक जीवन कितीहि कडक असलें व ते सतत सोंवळ्यांतच रहात असले तरी त्यांच्याकडे येणाऱ्या सर्वांना मुक्तद्वार असायचें. अर्थात् पाठ, प्रवचन इत्यादि चालूं असतांना कुणी आल्यास वाट पहावी लागे तेवढीच. तिथें कसलाहि भेदभाव नसायचा. सर्वांची विचारपूस आत्मीयतेनें करून त्यांच्या प्रापंचिक, वैचारिक, पारमार्थिक अडचणींवर उपाय सांगीतले जात. पारशी, मुसलमान इत्यादि परधर्मीयांनासुद्धां तिथें मज्जाव नव्हता. इतरांप्रमाणें त्यांनाहि स्वामीमहाराजांनीं आपल्या कृपाछत्राखालीं घेतांना यत्किंचितहि भेदभाव केला नाहीं. खाजगींत किंवा एकांतांत मात्र ते कुणालाहि भेटत नसत. जें कांहीं बोलायचें असेल तें सर्वांसमक्ष बोलावें असा दंडक होता. राजेरजवाडे यांनाहि त्याप्रमाणेंच भेटतां येई.

असें असूनहि स्वधर्माप्रमाणें आचार न ठेवणाऱ्या हिंदूंना, विशेषतः ब्राह्मणांना स्वामी महाराज दर्शन देत नसत. केंस ठेवणारे, स्नानसंध्यादि आचार

न पाळणारे ब्राह्मण किंवा अनधिकार आचार करणारे अब्राह्मण, सकेशा विधवा अशा व्यक्ती पुढें येतांच महाराज तोंड फिरवीत. त्यांनीं आचारांत योग्य ती सुधारणा केल्यावरच त्यांना दर्शन होई. बऱ्याच व्यक्तींना आचारधर्माचें शिक्षणहि महाराज जातीनें देत.

अर्थातच महाराजांची परीक्षा पहाणारे, त्यांच्याशीं वादविवाद करणारे, त्यांना भोंदू ठरवूं पाहणारे किंवा प्रसंगीं त्यांच्याशीं भांडणारेहि लोक त्यांच्याकडे येत. अशा मंडळींना आगाऊच ओळखून त्यांच्याकडे महाराज दुर्लक्ष करीत. एकदां बढवाईला एका राजेसाहेबांच्या आगमनाची वर्दी देणाऱ्या कारभाऱ्याला त्यांनीं "वेड्याच्या दर्शनाचा काय उपयोग? हे इथें आलेले लोक वेडे आहेत. हाहि त्यांतलाच एक वेडा आहे. तरी तुम्ही अशा वेड्यांच्या नादीं न लागतां घरीं जाऊन सुखानें रहा" अशा परखड शब्दांत त्यांच्या वृत्तीची जाणीव देऊन परत पाठविलें होतें. तद्वतच वादविवाद करणारा एक आर्यसमाजी महाराजांच्या मौनानें चिडून जाऊन अद्वातद्वा बोलूं लागल्यावर ते शांतपणें त्याला म्हणाले, "एवढाच आमच्यावर राग असेल तर आम्हांला मारून समाधान करून घ्या." तो आर्यसमाजी खरोखरच महाराजांवर हात उगारतो तोंच समोरच्या माडीवरील एका स्त्रीनें तें पाहून आरडाओरडा केला त्याला घाबरून तो पळून गेला. अशाच महाराजांवर चिडलेल्या एका वावदूकावर महाराजांच्या एका भक्तानें मंत्रप्रयोग करून त्याची वाचाच बंद केली. कांहीं वेळानें महाराजानींच त्या भक्ताला सांगून मंत्र परत घेवविला.

असे कांहीं लोक सोडले तर श्रीस्वामीमहाराजांकडे येणाऱ्या लोकांची विभागणी आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू आणि ज्ञानी अशा चार प्रकारांत करतां येईल. ह्यांपैकीं आर्त आणि अर्थार्थी ह्याचा विचार एकत्र करतां येईल. कारण प्रतिकूल परिस्थितींतून सुटका मागणारे (आर्त), आणि कांहीं तरी कामना धरून येणारे ह्या दोघांनाहि प्रापंचिक स्थितींत सुधारणा अपेक्षित असते. सर्व कामनांचें मूळ प्रपंचांतील कांहीं तरी न्यूनता पूर्ण करण्यांतच असत नाहीं कां? अर्थातच अशाच लोकांचें प्रमाण श्रीस्वामीमहाराजांचेकडे गर्दी करणाऱ्यांत अधिक होतें.

## आर्तत्राण

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाचा धांवता जरी आढावा घेतला तरी त्यांत त्यांनीं झेललेल्या दुःखांचेंच प्रमाण सुखाच्या तुलनेंत अधिक दिसतें. ह्या अवस्थेबद्दल त्यांनीं कधीं चुकूनहि तक्रार केल्याचें किंवा प्रतिकूल परिस्थितीला विरोध केल्याचें दिसत नाहीं. अनाक्रोश, अप्रतिकारपूर्वक प्रारब्ध सहन

करण्याकडेच महाराजांचा कटाक्ष होता. तो इतका कीं प्लेग, महामारी(कॉलरा), महारोग(लेप्रसी), श्वेतकुष्ठ, सर्पदंश आणि अभिचारिक प्रयोगानें कुणीतरी आयुष्यभर मागें लावलेली संग्रहणी(dysentery) अशा विकारांनीं अनेक वेळां प्राणसंकटसुद्धां आलें तरी औषध किंवा इतर कोणताहि उपाय त्यांनीं केला नाहीं. इतरांच्या आग्रहास्तव क्वचित कधीं औषध घेतलें तर एकदम विपरीत परिणाम होई व आग्रह करणाऱ्या व्यक्तीनें देवांची क्षमा मागून पुन्हां असें न करण्याचें मान्य केल्यावरच महाराजांना आराम पडे. क्वचित कांहीं प्रसंगीं देवांच्या आज्ञेनेंच कांहीं औषध घेतल्याचें दिसतें. ही झाली शरीरस्वास्थ्याची गत. इतर प्रापंचिक परिस्थितीची अवस्थाहि अशीच होती. गृहस्थाश्रमांत आर्थिक विवंचना, पत्नी व माता यांच्यांतील वैमनस्य, असूयेनें व द्वेषानें लोकांनीं केलेले उपद्रव यांना सतत तोंड द्यावें लागलें. श्रीमहाराजांनीं त्यांचा उपयोग वैराग्याच्या जोपासनेसाठींच केला.

संन्यासाश्रमांत त्यांनीं सोसलेले कष्ट तर वाचूनच अंगावर कांटा उभा रहावा. भिक्षेचे कडक नियम होते व नित्य संचार यांमळें नित्य उपास घडायचे तरी दहा वीस मैलांची चाल चालूंच राही व नित्य पुढें येणाऱ्या आर्त-जिज्ञासूंच्या समाधानांत यत्किंचितहि कसूर होत नसे. नरसीच्या चातुर्मासाअखेर क्षौराच्या वेळीं मंडळींच्या आग्रहानें तेथील न्हाव्यानें सहज महाराजांच्या पायांतले कांटे काढले ते एकवीस भरले! पुढें संकेश्वर पीठाचे शंकराचार्य झालेले श्रीशिरोळकर स्वामी ब्रह्मावर्ताला असतांना उन्हाळ्याचे दिवस होते. गंगेचा प्रवाह क्षीण झालेला व कांठापासून अर्धा-पाऊण कि.मी. आंत गेलेला. श्रीमहाराजांना संग्रहणीमुळें वारंवार शौचाला जावें लागे. प्रत्येक वेळीं स्नान होत असे. दुपारच्या वेळीं तापलेल्या त्या वाळूकडे पहायलाहि नको वाटे. अशा त्या नदीच्या पात्रांतून शांतपणें उघड्या पायांनीं वाळू तुडवीत जाऊन स्नान करणारे स्वामीमहाराज पाहून विदेहावस्था कशी असते त्याचें साक्षात् दर्शन घडे! श्री.शिरोळकर स्वामी म्हणतात कीं अशा ब्रह्मज्ञानी सत्पुरुषांचें दर्शन, संभाषण इत्यादींनीं आपण धन्य झालों!

हें सर्व इथें सांगण्याचें कारण कीं स्वतःच्या सुखदुःखाविषयीं इतके उदासीन असणारे महाराज दुसऱ्याच्या दुःखानें मात्र कळवळून जात. सतत पुढें येणाऱ्या सर्व मंडळींच्या अडचणी केवळ आत्मीयतेनें ऐकूनच ते घेत असें नाहीं तर त्याला योग्य तो सल्ला, औषध, मंत्र , यंत्र अशा त्यांना अवगत असलेल्या

विविध उपायांनीं व स्वतःच्या तपःसामर्थ्यानेंहि समोरच्या व्यक्तीच्या दुःखाचा परिहार ते करीत. त्यांच्याकडे आलेली व्यक्ति विन्मुख गेल्याचें उदाहरण सांपडत नाहीं. वैदिक परंपरेंत मनुष्यजीवनांत त्रिविध तापांचें प्रतिपादन आहे, १. आध्यात्मिक. २. आधिभौतिक व ३. आधिदैविक.

**आध्यात्मिक** ताप म्हणजे शारीरिक पीडा होत. व्याधि म्हणजे स्थूल शरीराचे विकार व आधि म्हणजे मानसिक पीडा. अक्षरशः हजारों लोकांना श्रीस्वामीमहाराजांनीं आपल्या वैद्यकाच्या ज्ञानाच्या साह्यानें व्याधिमुक्त केलें आहे. हें आपलें ज्ञान त्यांनीं योग्य अधिकारी पुरुषांना मुक्त हस्तानें दिलेलेंहि आहे. उदाहरणार्थ कोलगांवचे श्री. गणेशपंत सातवळेकर व नसरापूरचे श्री. गंगाधरपंत वैद्य. कांहीं कांहीं चातुर्मासांच्या ठिकाणीं सांथींचा प्रादुर्भाव झाला असतां त्यांनीं मोठ्या प्रमाणांवर औषधी तयार करवून त्या गरजू लोकांना वाटल्या. कांहीं रुग्णांना दुर्लभ वनस्पती शोधून किंवा प्रयत्नपूर्वक मिळवून त्या पुरवीत असत. आजहि कांहीं लोकांकडे हें महाराजांचें औषधोपचाराचें ज्ञान परंपरेनें उपलब्ध आहे असें ऐकिवांत आहे. त्याच्या सहकार्यानें तें प्रसिद्ध होणें सर्वांना लाभदायक ठरेल.

बऱ्याच वेळां केवळ औषधींनीं गुण येत नसल्यास ते योगिक उपचारहि सांगत. पोटदुखी व अन्नद्वेष ह्यांनीं गांजलेला एक ब्राह्मण महाराजांना शरण आला. त्याला महाराजांनीं विपरीतकरणी करायला सांगितली. त्यानें त्याची पोटदुखी जाऊन भूक इतकी वाढली कीं त्याची बायको त्याच्या भुकेला आळा घालण्याची विनंति करूं लागली. प.पू. श्री. गुळवणीमहाराजांना गरुडेश्वर येथें ताप येऊं लागला तेव्हां त्यांना श्रीस्वामीमहाराजांनीं मयूरासन करायला सांगितलें. त्यानें त्यांना लगेच आराम पडला. हीं वानगीदाखल दोन उदाहरणें आहेत. असे शेंकडों लोकाचे अनुभव आहेत.

औषधोपचार व योगिक उपायांखेरीज श्रीस्वामीमहाराज दैवी उपासनाहि सांगत उदा.- औदुंबर, देऊळ किंवा पोथीला प्रदक्षिणा. रोगाच्या गांभीर्याच्या प्रमाणांत ह्या उपायांची तीव्रता व कालमान असे. चिखलद्याला एक ब्राह्मण पोटांत अन्न ठरेना म्हणून महाराजांकडे आला. तो अत्यंत क्षीण झाला होता. महाराजांनीं हें कुलदेवतेच्या सेवेंत खंड पडल्यानें झालें असल्याचें सांगून त्याला दत्तमंत्र व देवीमंत्र यांचा जप सांगून कांहीं औषधहि दिलें.

नरसोबावाडीला महाराज असतांना महामारीची साथ आसपासच्या

गांवांतून येण्याची शक्यता दिसूं लागली. तेव्हां महाराजांनीं श्रीदत्तपादुकांवर संततधार धरायला सांगितलें. यासंबंधीं कांहीं मंडळींनीं महाराजाना विचारलें कीं, "महामारीच्या साथीवर अभिषेकाचा कसा परिणाम होतो?" तेव्हां महामारी इत्यादि साथी ह्या मृत्युरूप परमेश्वराच्या शक्ति असून, संततधार इ. शास्त्रविहित उपायांनीं त्या मृत्युरूप परमेश्वराचा संतोष होतो व त्याच्या शक्तींचेंहि उपशमन होतें असें सांगितलें.

श्री. वासुदेव ठाकुर नांवाचे एक गृहस्थ वाडीला महाराजांचेकडे आले व आपल्या पत्नीच्या आजारपणाबद्दल त्यांना विचारलें. तेव्हां महाराजांनीं त्याना त्यांच्या पूर्वजांच्या समाधीची योग्य देखभाल होत नसल्याचें हें फळ आहे असें सांगितलें. ठाकूर यांनीं आपल्या गांवीं जाऊन त्या समाधीची जागा शोधून, तिची डागडुजी करून नित्य पूजाअर्चेचीहि व्यवस्था केली. तेव्हा त्यांच्या पत्नीची प्रकृति हळूंहळूं सुधारली.

कधींकधीं ग्रहांच्या शांतीचाहि सल्ला महाराज देत. एकदा एका गृहस्थाची संतति वाचत नव्हती. महाराजांच्या आज्ञेनें त्यानें मंगळाचें व्रत करतांच त्याची संतति जगूं लागली.

पूर्वाश्रमांत माणगांव येथें महाराज असतां, सावंतवाडीचे सबनीस यांचा मुलगा आजारी पडला तेव्हां महाराजांनीं(तेव्हांचे वासुदेवशास्त्री) त्यांना मुलाची पत्रिका पाहून गोप्रदान करावयास सांगीतलें. सबनीस यांनीं शास्त्रीबुवांना नकळत त्यांचे बंधु सीताराम यांना बोलावून दक्षिणापूर्वक गोप्रदान केलें. परिणामीं, सीताराम यांना घरीं येतांच सपाटून ताप आला. शास्त्रीबुवाना ही हकीकत कळतांच त्यांनीं सीतारामाची आपल्याला न विचारतां गोप्रदान घेतल्याबद्दल चांगली हजेरी घेतली व ती गाय दुप्पट दक्षिणा देऊन दुसऱ्या ब्राह्मणाला देऊन टाकल्यावर सीतारामाचा ताप उतरला.

श्रीस्वामीमहाराजांच्या देहविसर्जनानंतर गरुडेश्वरीं समाधिमंदिराच्या कामांत सहभागी एका कामगाराच्या पायाला सूज येऊन तो दुखायला लागला. चालणेंसुद्धां अवघड झाल्यानें देवाचें काम आपल्या नशिबांत नाहीं अशी निराशा वाटून तो घरीं परतण्याचा विचार करूं लागला. त्याच दिवशीं सकाळीं तो सरकत सरकतच शौचाला जात असतां एक भगवें वस्त्र व कौपीन धारण केलेला संन्यासी त्याला भेटून त्यानें त्याला एक जवळचें झुडुप घरीं नेऊन तें

बारीक वाटून तें पायाला लावून शेंक करायला सांगितलें. त्याप्रमाणें करतांच दुसऱ्याच दिवशीं त्याची सूज नाहींशी होऊन त्याला चालतां येऊं लागलें व तो कामावरहि हजर झाला. त्याची हकीकत ऐकून तेथील अधिकाऱ्यानें त्याला महाराजांचें चित्र दाखवतांच तेच मला भेटलेले बाबाजी असल्याचें त्यानें सांगितलें.

असे आणखीहि असंख्य प्रसंग त्यांच्या आयुष्यांत घडलेले आहेत. विस्तारभयास्तव इथें फक्त कांहीं प्रातिनिधिक उदाहरणें दिलीं आहेत.या संदर्भांत श्रीस्वामीमहाराजांनीं द्विसाहस्रीच्या(द्वि.सा.) टीकेंत(२३:३०-३१) उद्धृत केलेलें वचन विचारणीय आहे. "**पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण पीडते। तच्छांतिरौषधैर्दानैर्जपहोमसुरार्चनैः।।**". सर्व व्याधींचा उगम पूर्वार्जित पापकर्मांत आहे. त्यांचा (व्याधींचा) उपशम करण्यासाठीं औषधें, दान(सत्पात्रीं), जप, यज्ञ, देवसेवा ह्या उपायांनीं होतो. ह्याला श्रीमहाराजांनीं स्वतःची एक पुस्ती जोडली आहे, "**साधुदृष्ट्यापि सर्वाघहृतिदक्षया**" (द्वि.सा. २३:३०). संतांच्या कृपाकटाक्षानें सर्वच पापांचा नाश होतो तर व्याधीचा नाश होईल यांत काय संशय? श्रीमहाराजांच्या आश्रयाला येणाऱ्या सर्व आर्त व्याधिपीडितांच्या रोगपरिहारांत त्यांची कृपादृष्टि हेंच कारण इतर सर्व (औषधादिक) कारणांपेक्षां महत्त्वाचें होतें यांत संशय नाहीं.

**आधिभौतिक** ताप म्हणजे पंचमहाभूतांच्या प्रकोपानें होणारे अनर्थ. भूकंप, पूर, आग, विद्युत्पात, वादळ इत्यदि यांचीं उदाहरणें होत. प.प. श्रीदीक्षितस्वामी यांची पुतणी सीताबाई हिला नवऱ्यानें भिलवडीला एक शेत देऊन विभक्त ठेवलें होतें. ती स्वतःच शेती करून त्यावर गुजराण करीत असे. तिची श्रीमहाराजांवर मोठी निष्ठा होती. महाराज वाडीला आले असतांनी त्यांची चरणधूलि सीताबाईंनीं एका डबींत भरून ठेवली होती. तिच्या शेतावर एकदां खळ्यांत धान्य मळून तयार झालें असतां एकदम मोठा पाऊस येऊन सर्व धान्याची नासाडी होणार असें दिसूं लागलें. सीताबाईंनीं लगेच महाराजांचें स्मरण करून ती डबींतली पायधूळ त्या खळ्याभोंवतीं टाकली व "मी या संकटांतून मुक्त झाल्यावर वाडीला येऊन ब्राह्मणसमाराधना करीन, मला एवढें अन्नदान महाराजांनीं द्यावें." अशी प्रार्थना केली. महाराजांच्या कृपेनें तिच्या खळ्यावर पावसाचा एक थेंबहि न पडल्याने तिच्या धान्याचें संरक्षण झालें. तिच्या ब्राह्मणसमाराधनेच्या वेळीं महाराज वाडीला होते व त्यांनीं तिथें भिक्षा

घेऊन तिचें समाधान केलें.

गरुडेश्वरीं नर्मदाकांठीं गोकुळाष्टमीच्या भजनाच्या वेळीं पैलतीरावर एकदम आभाळ येऊन जोराचा पाऊस सुरूं झाला व आतां तो इकडेहि येऊन भजन थांबवावें लागणार अशीं चिह्नें दिसूं लागलीं. तेव्हां महाराजांनीं पावसाची चिंता न करतां भजन चालूं ठेवण्यास सांगितलें. मध्यरात्रींपर्यंत भजन करून मंडळीं आसऱ्यांत आल्याबरोबर बाहेर धो धो पाऊस सुरूं झाला व महाराज म्हणाले "हा घ्या मघाचा पाऊस !"

असाच प्रसंग एकदां माणगांवला एका गुरुद्वादशीला घडला. प्रसादाला उघड्यावरच पानें टाकलेलीं आणि एकदम ढग येऊन जोराचा पाऊस पडणार असें दिसतांच महाराज म्हणाले, "तो(पाऊस)हि तुमच्यासारखाच प्रसादाला आला आहे. एक मोठा नैवेद्य त्याला वाढा." त्याप्रमाणें करतांच सभोंवार मुसळधार पाऊस पडत असतांहि प्रसादाच्या जागेवर थेंबसुद्धां पडला नाहीं व प्रसादाचा कार्यक्रम निर्विघ्न पार पडला. बढवाईच्या चातुर्मासानंतर वाडीकडे जातांना सीतारामबुवा व गांडाबुवा सनावदपर्यंत बरोबर होते. तेथें वडिलांची तिथि असल्यानें सीतारामबुवांनीं, "आज पाऊस येणार आहे, करिता तुम्ही गांवांत जाऊन स्वयंपाक करा" या महाराजांच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून घाटावरच स्वयंपाक केला. श्राद्धकर्म होतें न होतें इतक्यांत पाऊस सुरूं झाला व सर्वांच्या जेवणावरच गदा आली. गांडाबुवांनीं त्यावेळीं महाराजांची क्षमा मागितल्यावर पाऊस बंद होऊन जेवणें झालीं. असे आणखीहि बरेच प्रसंग सांगतां येतील.

**आधिदैविक** पीडा म्हणजे देवतांच्या कोपानें होणाऱ्या पीडा. देवयोनींत देवांबरोबरच असुर, राक्षस, गंधर्व, यक्ष, नाग, किन्नर तसेंच पिशाचादि योनींचाहि समावेश होतो.

देवता बहुतेक वेळां ईश्वराच्या विधानांप्रमाणें आपापलें विहित कार्य करत असतात. मनुष्यांशीं त्यांचा संबंध मुख्यतः त्या त्या व्यक्तीला त्याच्या बऱ्यावाईट परिपक्व कर्माचीं फळें देण्यापुरताच असतो. विशिष्ट प्रकारच्या परिस्थितीसाठीं त्या त्या विशेष देवतेची आराधना करून आपल्याला इष्ट तो बदल करून घेतां येतो. अर्थात् सर्व देवता तत्त्वतः परमेश्वराच्याच विभूति असल्यानें ईश्वरी उपासना उदा. कुलदेवता अथवा इष्टदेवता यांची सेवा

हीसुद्धां दैवी अनुकूलता प्राप्त करून देऊं शकते. महामारीच्या साथीचा प्रतिकार अभिषेकानें कसा होतो ह्यासंबंधीं श्रीमहाराजांचे उद्गार वर आलेलेच आहेत. परंतु सर्वसाधारण माणसाला आपल्या अडचणींचें आधिदैविक कारण अथवा त्यासाठी उपाय यांचें कांहींच ज्ञान नसतें. आणि क्वचित् असा उपाय समजलाच तर तो योग्य रीतीनें करणेंहि त्याच्या शक्तीपलीकडचेंच असतें.

इथेंच साधुसंतांच्या मार्गदर्शनाचें आणि कृपेचें महत्त्व आहे. ते पारदर्शी महात्मे समोर येणाऱ्या शरणागताच्या सद्यःस्थितीचें नेमकें आधिदैविक कारण जाणतात, त्यावर अचूक उपायहि जाणतात आणि तो उपाय करण्याचें बळहि भक्ताला आपल्या कृपेनें देऊं शकतात. अशाच थोर संतांपैकीं श्रीस्वामी महाराज एक होते. मानवी जीवन हें मूलतः अधुरें, अपुरें आणि दुःखमिश्रित आहे. आपल्या शारीरिक, आर्थिक, संततिसंबंधींच्या अशा अनेक अडचणी घेऊन लोक त्यांच्याकडे येत; आणि महाराजहि त्यांना आत्मीयतेनें सर्व प्रकारचें साह्य करीत. जात-पात, धर्म, पंथ इत्यादि कोणताहि भेदभाव न ठेवतां प्रत्येक आर्त आणि अर्थार्थी जीवाला ते मार्गदर्शन करून त्यांच्या अडचणींवर मात करायची शक्ति प्रदान करीत. अशा प्रकारच्या उपायांचें वर्णन वर आलेंच आहे.

**पिशाचयोनि** ही देवयोनींत गणलेली असली व देवयोनीप्रमाणें त्यांना बऱ्याच अमानुष शक्ती उपलब्ध असल्या तरी त्या अमंगळच मानल्या गेल्या आहेत. कांहीं पापकर्मांचें फळ, सूडाची भावना किंवा अतृप्त वासना (बहुतेक अर्थ आणि काम यासंबंधींच्या) जीवाला ही योनि प्राप्त करून देतात. पिशाचांचें स्थान भूलोकाच्या लगत वर असलेला भुवर्लोक आहे. त्यांचा संबंध ऋणानुबंध असलेल्या मानवांशींच येतो आणि ते नाना प्रकारच्या पीडा देऊं शकतात. ह्या विषयावर स्वतंत्र सविस्तर लेख पुढे दिला आहे.

अशा अनेक लोकांनीं श्रीमहाराजांच्या कृपेनें आपापलीं कार्यें सिद्ध करून घेतली. अर्थात् कांहीं लोकांनीं अश्रद्धेनें त्यांची आज्ञा पाळली नाहीं व ते आपल्याच नाशाला कारणीभूत झाले. महाराजांच्या कृपाछत्रांतील एका मुलीच्या यजमानांनीं महाराजाच्या आज्ञेविरुद्ध सासरच्या मंडळींच्या पत्नीच्या विरोधाला न जुमानतां शांति होण्यापूर्वींच आपल्या मुळावर जन्मलेल्या मुलाचें दर्शन घेतलें. परिणामीं एक वर्षाच्या आंत क्षयानें मृत्यू ओढवून घातला.

आपल्याकडे येणाऱ्या सर्व जनांच्या प्रापंचिक अडचणींत एवढें लक्ष घालून त्या दूर करण्यासाठीं इतके अथक परिश्रम महाराजांसारख्या विरक्त

संन्याशानें कां करावेत असा प्रश्न साहजिकच पडतो. समर्थ म्हणाल्याप्रमाणें "मुळींच नासका" अशा प्रपंचाविषयीं स्वतः पूर्णपणें उदासीन असूनहि ही सगळी उठाठेव महाराजांनीं कां बरें केली असेल? महाराजाचे प्रेमी व अधिकारी वेदान्ती सांगलीचे एकसंबेकर शास्त्री यांनाहि नेमका हाच प्रश्न पडला होता. त्यांनीं महाराजांना तसें स्पष्ट विचारलेंहि कीं "आपल्यासारख्या संन्याशाला हा खटाटोप कशासाठीं?" श्रीमहाराजांनीं त्यांना त्याचें सरळ उत्तर दिलें नाहीं. पुढें एकदां बोलता बोलतां त्यांना विचारलें कीं, "कां हो शास्त्रीबुवा, तुम्हांला कांहीं उपाधि नसतांना तुम्ही संन्यास कां नाहीं घेत?" शास्त्रीबुवा म्हणाले, "आमचें हें देहप्रारब्ध आहे त्याला इलाज नाहीं." महाराज लगेच म्हणाले "तुम्हांला तेवढें देहप्रारब्ध आणि दुसऱ्याला ते नाहीं कीं काय? " शास्त्रीबुवांपुरतें हें कदाचित् त्या प्रश्नाचें उत्तर असेलहि. पण आपल्याला ह्याचें अधिक समर्पक आणि समाधानकारक स्पष्टीकरण महाराजांच्या द्विसाहस्त्री ग्रंथांत आढळतें. अर्थात् स्वतःचें महत्त्व प्रकट करणारें हें उत्तर महाराजांच्या मुखांतून प्रकट होणें शक्यच नव्हतें.

**ईदृश्यो लौकिका लीला कृता भक्तिविधित्सया।**
**भजेयुर्मां कथमपि लोका इत्याशयोऽस्य तु।।४९।।**
**लोके प्रत्युपकारित्वं समीक्ष्य भगवान्विभुः।**
**लौकिकानंदजनकां चमत्कृतिमिहाकरोत्।।५०।।**
**हेतुनानेन तल्लोका भजन्ति भगवत्पदम्।**
**भजनादेव निर्धूतमला यान्ति मुमुक्षुताम्।।५१।।**

सायंदेवाला यवनभयापासून मुक्त केल्याची कथा सांगून झाल्यावर श्रीमहाराजांनीं दत्तावताराचें नित्य कार्य विशद करणारे हे श्लोक लिहिले आहेत.

"यांसारख्या लौकिक लीला (श्रीदत्तप्रभूंनीं) भक्तिमार्गाच्या विकासासाठीं केल्या. कोणत्याहि प्रकारानें लोकांना आपल्या भजनीं लावणें एवढाच त्यांचा हेतु (असतो). लोकांची प्रत्युपकाराची भावना पाहून, त्यांना संतोष देणारे (असे कांहीं) चमत्कार प्रभु इथें दाखवितात. ह्या कारणानें (कां होईना) त्यांची ईश्वरचरणीं भक्ति जडेल आणि त्या भजनानें(अष्टविध भक्तीनें) त्यांचे मनोमल धुतले गेले कीं सहजच मोक्षाची तीव्र इच्छा (मुमुक्षा) त्यांच्या चित्तांत प्रकट होईल. " ही ज्ञानाची पहिली पायरीच होय. इथूनच पुढें अभ्यास-वैराग्यांच्या साधनांनीं गुरुकृपा होऊन पुढें जीवनमुक्तीचे ते अधिकारी होतील अशा अर्थाचे

श्लोक आले आहेत. म्हणजेच केवळ ऐंद्रिय सुखाच्या मागें धावून जन्ममरणाच्या फेऱ्यांत भ्रमणाऱ्या जीवांना भक्तीची गोडी लावण्यासाठीं भगवान त्यांच्या प्रापंचिक जीवनांत अनुकूल असे कांहीं चमत्कार घडवतात तें त्यांची आसक्ति वाढवण्यासाठीं नव्हे तर त्यांच्या चित्तांत ईश्वरप्रेमाचें बीज रुजविण्यासाठीं ! ह्याचेंच नांव लोकसंग्रह. आणि हेंच स्वामीहाराजांच्या समर्पित, अविश्रांत, निःस्वार्थ जीवनाचें रहस्य होय.

## प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज व पिशाचयोनि

**भूतप्रेतपिशाचाद्या यस्य स्मरणमात्रतः।।**
**दूरादेव पलायन्ते दत्तात्रेयं नमामि तम्।।१।।**

मृत्यूनंतर आत्मा स्थूलशरीराचा त्याग करतो तेव्हां प्रथम आतिवाहिक देह धारण करतो. या प्रेतशरीराला अन्न-पाणी देण्याचा मंत्र असा आहे - *'आकाशस्थो निरालम्बो वायुभूतो निराश्रयः। इदं नीरमिदं क्षीरं स्नात्वा पीत्वा सुखी भव।। '*. याचाच अर्थ परलोकगत आत्मा वायुभूत (वायव्य) असून तो आकाशांत निराश्रित असा तरंगत असतो. विष्णुधर्मोत्तरपुराणानुसार मरणोत्तर तत्क्षणीं (जीव) आतिवाहिक देह धारण करून वर जातो. त्याच्याबरोबर (पृथ्वी आणि आप हीं जड भूते खालींच राहून तेज, वायु आणि आकाश ही) तीन भूतेच संलग्न असतात. कांहीं शास्त्रांत हा देह केवळ वायवीय असतो असेहि सांगितले आहे. हा देह फक्त मानवांनाच प्राप्त होतो पशुपक्ष्यांना नाही. ह्या देहांत भोग घेण्याची क्षमता नसते. दाहकाली व नंतरच्या दहा दिवसांत प्रेताला उद्देशून केलेल्या पिंडांच्या परमाणूंपासून हळूंहळूं भोगदेहाची निर्मिति होते. "प्रेतत्त्वविमुक्तये एष पिंडस्तुभ्यं स्वाहा" या मंत्रानेच श्राद्धकाली पिंडदान केले जाते. काळांत जर पिंडदान व सोळा श्राद्धें घडली नाहींत तर तो जीव प्रेत(पिशाच)रूपानेच दीर्घकाल अतृप्तावस्थेत भ्रमण करीत राहतो. एकदा ही वेळ निघून गेल्यावर पुढे अनेक श्राद्धे केली तरी त्या जीवाला शांतीचा मार्ग सांपडत नाही. हा भोगदेहही तात्पुरता असतो वर्षश्राद्धाचे वेळीं सपिण्डीकरण झाल्यावरच खऱ्या भोगदेहाची प्राप्ति जीवाच्या कर्मानुसार होते. पुण्य अधिक असेल तर दिव्य देहाची प्राप्ति होऊन तो जीव स्वर्गाला जातो व पाप अधिक असेल तर यातना देह प्राप्त होऊन नरकवास घडतो.

अथर्ववेदांत प्रेतापसारणाचे व मारणाचे अनेक मंत्र व प्रयोग वर्णन केले आहेत. उदाहरणार्थ शांतिसूक्त. तसेच आयुर्वेदांत "भूतोऽमी देवयोनयः" अशा शब्दांत पिशाचांची गणना देवयोनीत केली आहे. आयुर्वेदांत १८ प्रकारची भुतें वर्णिलेली आहेत. सुश्रुत, वाग्भट्ट यांच्या ग्रंथांतहि बालप्रकरणांत भूतादि ग्रहांच्या निवृत्तीचे प्रयोग बरेच सांगितले आहे. विविध पुराणें व स्मृतिग्रंथांतूनहि प्रेतयोनि व प्रेतबाधानिवारण यांच्याविषयी विपुल माहिती आहे. अशी रीतीने भारतीय परंपरांत पिशाच/ प्रेत/ भूत-योनीला सार्वत्रिक मान्यता आहे. तसेच ह्या योनीचे

अनुभव अनेक अर्वाचीन व प्राचीन तसेच पाश्चात्य व पौर्वात्य देशांतून वर्णन केलेले आहेत. एवढेच नाही तर त्या सर्व वर्णनांतून बऱ्याच प्रमाणांत एकवाक्यताहि आढळते. बहुतेक पुराणांनी भूतप्रेतगणांचा अंतर्भाव भगवान शंकरांच्या गणांत केला आहे.

आतिवाहिक देह वायुप्रधान असल्याने त्यांचे सामर्थ्य अतिमानवी असते हे खरेच; पण ज्याच्या त्याच्या कर्मानुसारे भूत अधिक वा कमी शक्तिमान् असते. आळंदीकरांच्या पत्नीला नर्मदेंतून वर आणायला २६ माणसांची मदत घ्यावी लागली. तसेच वाडीच्या १९०७ च्या मुक्कामांत महाराजांकडे एक स्त्री आली. तिला एक ब्रह्मराक्षस वाऱ्याच्या रूपाने येऊन उचलून आभाळांतून दूर नेऊन ठेवीत असे. त्या वेळीं ती बेशुद्ध होई व कालांतराने शुद्धीवर आल्यावर हुडकत हुडकत घरी येई. महाराजांनी तिला एक यंत्र करून दिले ते तिने गळ्यांत बांधल्यावर तिचा त्रास गेला.

मनुष्यजन्मांत पूर्वजन्माच्या संस्कारांनी, दुःसंगतीने जे लोक तामस वृत्तीचा आश्रय घेऊन (तमोऽभिभूत), आसुरी संपत्ती जमा करून, अधर्माचरण, दुराचरण व्यसनाधीनता, अशुचि आहार-विहार करून भगवंताला विमुख होतात ते या योनींत प्रवेश करतात. साधारणतः ह्या योनीत जाण्यची कारणे खालीलप्रमाणे पुराणांतरी दिली आहेत.

१. मृत्यूच्या वेळी ज्या मनुष्याच्या मनांत कुणाविषयीहि प्रबळ द्वेष किंवा प्रबल आसक्ती असेल त्यांना पिशाचत्व प्राप्त होते. विशेषतः द्वेषाच्या भावनेने अभिभूत होऊन मरणाऱ्याला अत्यंत कष्टदायक असे प्रेतत्व भोगावे लागते. यास्तव आपल्या मनात सूडाची किंवा द्वेषाची भावना कल्याणेच्छु जनांनी मुळांतच रुजूं देऊ नये. स्वभावदोषांमुळे वा प्रारब्धानसार ही भावना उत्पन्न झाली तरीहि ती काढून टाकण्याचा प्रयत्न करावा व यासाठी ईश्वरी सहाय्याची प्रार्थना करावी. तीच गोष्ट आसक्तीबद्दल आहे. द्रव्य, स्त्री, पुत्र-पौत्रादिकांविषयींची आसक्ति कमी करण्याचा प्रयत्न शाश्वत सुखाची अभिलाषा ठेवून, देवभक्तीच्या आश्रयाने करावा.

प.प. श्रीस्वामीमहाराज माणगांवांत असतांना, सावंतवाडी संस्थानच्या राणीसाहेबांच्या एका स्वयंपाक्याचे पैसे त्यांच्याकडे राहिलेले असतांनाच त्याला मृत्यू आला. त्या द्रव्याच्या आसक्तीमुळे तो पिशाच होऊन राणीसाहेबांना पीडा देऊं लागला. महाराजांनी सांगितलेल्या उपायांनी त्या त्या बाधेपासून मुक्त झाल्या. आपल्या वैदिक सनातन धर्मात, आणि बऱ्याच अंशी इतर भारतीय

धर्मांतहि अंत्येष्टीचे विधान ऋषिमुनींनी विस्ताराने करून ठेवले आहे. आजकाल आपले त्याकडे वरचेवर दुर्लक्ष होत चालले आहे. ही फारच घातक परिस्थिति आहे. कारण शास्त्राच्या विधानानुसार, कोणत्याहि कारणाने ज्याची अंत्येष्टि, पिंडदान, तिलाञ्जली, श्राद्धादि होत नाहीत त्यांना पिशाचयोनीत दीर्घकाळ रहावे लागते. कधीकधी तर हा काळ कल्पांतापर्यंत सांगितला आहे. महाराज उज्जैनला पहिला चातुर्मास करून ब्रह्मावर्ताला जातांना पिछोरा मुक्कामीं महाराजांचे पुराण चालू असतांच तेथील मामलेदारांचा भाऊ भास्करराव येऊन आपल्याला अपस्माराच्या व्याधीपासून मुक्त करण्याबद्दल त्यांची प्रार्थना करूं लागला. लगेच त्याच्या अंगांच प्रेतावेश होऊन तो बडबडूं लागला. तेव्हां त्याला महाराजांनी दुसरे दिवशीं पुराणाच्या आधीं येण्यास सांगितले. त्या वेळीं त्या पिशाचाने आपण रहात असलेल्या पिंपळाजवळ हा भास्करराव लघ्वी करत असल्याने आपण त्याला पीडा देत असल्याचे त्याने स्पष्ट केले. निपुत्रिक अवस्थेत मरण पावल्याने त्याचे और्ध्वदेहिक झाले नसल्याने तो या योनींत आला होता. भास्करराव सधन असल्याने आपल्यासाठी नारायणबळी करवावा अशी त्याने विनंति केल्याने महाराजांनी भास्कररावला तसे करण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्याने करतांच पिशाचाचीहि मुक्ति झाली व भास्कररावाचाहि आजार गेला.

२. जे लोक भूतप्रेतांची पूजा करतात, जारणमारणादि तामसी साधने करतात तसेच तामस आहारविहार करतात ते सर्व पिशाच होतात.

३. व्यसनी, चोर, डाकू, खुनी, व्यभिचारी, विहित कर्माविरुद्ध आचरण करणारे आणि अधर्माचा प्रचार करणारे अत्यंत कष्टप्रद अशा प्रेतयोनींत जातात.

४. आत्महत्या करणारे, आपल्या पूर्वकर्माने अग्नि, विष व पर्वतपात, भित्तिपात अपघात इत्यादि कारणांनी अकस्मात् मृत्यू पावतात ते सर्व या अमंगल योनींत दीर्घकाल खितपत पडतात. अंतरिक्षांत मरणारेहि प्रेत होतात असेहि म्हटले आहे.

५. ज्या माणसाचा खून झाला असेल तोहि सूडाच्या भावनेने पेटून पिशाच होतो.

६. गरुडपुराणांत प्रेतत्वप्रापक कर्मांचे वर्णन असे आहेः-

**वापीकूपतडागांश्च आरामं सुरमंदिरम्।**
**प्रपां सद्म सुवृक्षांश्च तथा भोजनशालिका।।**
**पितृपैतामहं धर्मं विक्रीणाति स पापभाक्।**
**मृतः प्रेतत्वमाप्नोति यावदाभूतसम्प्लवम्।।**

**गोचरं ग्रामसीमां च तडागारामगह्वरम्।**
**कर्षयन्ति च ये लोभात् प्रेतास्ते वै भवन्ति हि।।**
**देवद्रव्यं च ब्रह्मस्वं गुरुद्रव्यं तथैव च।**
**कन्यां ददाति शुल्केन स प्रेतो जायते नरः।।**
**मातरं भगिनीं भार्यां स्नुषां दुहितरं तथा।**
**अदृष्टदोषास्त्यजति स प्रेतो जायते नरः।।**
**न्यासापहर्ता मित्रध्रुक्परदाररतः सदा।**
**विश्वासघाती कूटश्च स प्रेतो जायते नरः।।**
**भ्रातृधृग्ब्रह्महा गोघ्नः सुरापो गुरुतल्पगः।**
**कुलमार्गं परित्यज्य ह्यनृतोक्तौ सदा रतः।**
**हर्ता हेम्नश्च भूमेश्च स प्रेतो जायते नरः।।**

पूर्वाश्रमीं महाराजांचे सावंतवाडीला विष्णुपंत **आणावकर** नांवाच्या एका वकीलांकडे जाणे-येणे होते. त्या वकीलसाहेबांच्या अंगांत त्यांच्याच एका पूर्वजाच्या पिशाचाचा संचार होत असे. तो सर्व शास्त्रांत तज्ज्ञ असून कोणाचेहि भूत-भविष्य-वर्तमान बिनचूक सांगत असे. त्याने स्वतःच पिशाचयोनीत जाण्याचे कारण सांगितले ते असे. पूर्वजन्मी तो एक उत्तम वैदिक ब्राह्मण होता. एकदां त्याने त्याच्या परसांत येऊं पाहणाऱ्या गाईला हांकण्यासाठी तिला एक दगड फेकून मारला. तो दुर्दैवाने तिच्या वर्मी लागून ती मरण पावली. ही आपल्या हातून झालेली गोहत्या त्याने गुप्तच ठेवली व त्यासाठी कांही प्रायश्चित्तहि घेतले नाही. मृत्यूनंतर यमाच्या दरबारांत तेव्हां यमराजांनी त्याला गोहत्येच्या पापाबद्दल व्याघ्रयोनि व पिशाचयोनि यांपैकीं एक पत्करावी लागेल असे पर्याय दिले, तेव्हां पिशाचयोनींत ज्ञान तरी राहील असा विचार करून त्याने पिशाचयोनीचा स्वीकार केला. त्या वेळीं त्याला पिशाचयोनींत २५० वर्षे झाली होती.

७. सूतकांत, श्वानादिकांच्या संपर्कात, रजस्वलादिदोषांत मृत्यु आला तरीहि प्रेतत्वाची गति होऊं शकते. या सर्व कारणांपासून आपण दूर रहावे व आपल्या कुटुंबीय आणि इष्ट जनांनाहि यांपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न करावा. या योनींत जाणारे जीवात्मे सर्वच सारख्या आकृतीचे अथवा प्रकृतीचे असत नाहींत. स्थूलदेह पृथ्वीवरच सोडला तरी लिंगदेह त्यांच्याबरोबरच असतो. त्यामुळे त्यांतील चांगले-वाईट संस्कार, स्वभाव व ज्ञानसुद्धां त्यांना असते. वर आणावकर समंधाच्या ज्ञानाचे वर्णन आले आहेच. हीच गोष्ट स्वभाव व संस्काराचीहि. आहे. पिशाच तमोगुणप्रधान असले तरी मानवी जीवनांतील कर्मानुसार रज व सत्त्व ह्या गुणांची मात्रा कमी-अधिक प्रमाणांत असते. चेहरा- मोहरा, आकृति व रागद्वेषहि मानवी

जीवनांतीलच असतात. पण मुख व नेत्र हे बहुधा विकृत आणि भयकारक असतात. अर्थात् बहुतेक पिशाचे निर्दय, हिंस्र, दुष्ट व अशांत असतात व म्हणूनच सदैव दुःखी असतात. आपापल्या शक्त्यनुसार ते उपद्रवच देतात. पिशाचांना तर्क, न्यायबुद्धि इत्यादि असत नाहीत त्यामुळे त्यांच्यांत दुष्टावा, कावेबाजपणा व निर्दयता दिसून येतात. अल्पशा अपराधासाठी भयानक पीडा ते देऊं शकतात. १८९६च्या हरिद्वारच्या चातुर्मासानंतर बर्ह्मावर्तच्या मुक्कामांत एका पिशाचाने आपले दीड रुपया येणे न दिल्याच्या अपराधावरून, गणपतिबुवा या साधूंच्या पुतण्याला भ्रष्ट करून त्याच्या बायकोचा गर्भपात केला; तसेच मोठ्या मुलाला वेड लावून, धाकट्याला ठार केले! या वायुप्रधान देहांत भोगशक्ति नगण्यच असल्याने व तरीहि भोगवासना प्रबल असल्याने ते सदैव अतृप्ततेच्या अग्नींत जळत असतात. आपल्या अतृप्त वासनांच्या पूर्तीसाठी त्यांना मानवी शरीराचाच आश्रय घ्यावा लागतो. यालाच झपाटणे, लागणे, धरणे अशा संज्ञा मराठींत आहेत. हीच पिशाचबाधा होय.

## पिशाचबाधा केव्हां व कुणाला होते?

पिशाचे कितीहि सामर्थ्यावान् असले तरी ते कुणालाहि बाधू शकत नाहीत. विशेषतः भगवद्भक्ति करणाऱ्या, नित्य व नैमित्तिक कर्माचे अनुष्ठान करणाऱ्या व पवित्र आचरणाच्या लोकांच्या जवळहि पिशाच फटकत नाही. याविषयीं गरुडपुराणाचे वचन असे आहे. -

**रुद्रजापी धर्मरतो देवतातिथिपूजकः।**<br>
**सत्यवाक् प्रियवादी च न प्रेतैः स हि पीड्यते।।**<br>
**सर्वक्रियापरिभ्रष्टो नास्तिको धर्मनिंदकः।**<br>
**असत्यवादनिरतो नरः प्रेतैः स पीड्यते।।**

सर्वसाधारणतः पिशाचांची बाधा त्यांच्याच कुळांतील व्यक्तींना होते. श्रीमहाराजांच्या १९०६च्या वाडीच्या मुक्कामांत एक कोंकणातील पिशाचग्रस्त ब्राह्मण त्यांच्या दर्शनाला आला. त्या पिशाचाने श्रीमहाराजांना आपण ह्या ब्राह्मणाचे बाप असून, रोज विष्णुसहस्रनामाचे पाठ करण्याचा व ब्राह्मणभोजन घालण्याचा माझा नियम हा पाळत नसल्याने मी त्याला पीडा देत आहे असे सांगितले. महाराजांच्या आज्ञेनुसार ते नियम त्या ब्राह्मणाने पाळायला सुरुवात करतांच त्याची बाधा नाहींशी झाली.

कुळांतील व्यक्तींशिवाय मुख्यतः त्या पिशाचाच्या ऋणानुबंधांत असलेल्या- विशेषतः त्याला ह्या योनींत जाण्याला कारणीभूत व्यक्तींनाहि

पिशाच त्रास देते. श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रांत एका नवशिक्षित नास्तिक सखाराम नांवाच्या गृहस्थाची हकीकत आहे. पिशाचयोनि इत्यादि सर्व थोतांड मानणाऱ्या सखारामालाच पिशाचबाधा झाली. तेव्हां नाइलाजाने तो माणगांवीं येऊन सेवेला राहिला असतां त्याचा एक एल.एल.बी. झालेला मेहुणा त्याला भेटायला आला. त्याने सखारामाच्या शरीरांत आविष्ट भूताचा उपहास करून आपल्या शरीरांत संचरून त्रास देण्याबद्दल आह्वान दिले. त्या वेळीं त्या पिशाचाने स्पष्ट केले कीं 'ज्याच्याकडे आमचे येणे असते अशी संबंधी व्यक्तीलाच आम्ही त्रास देतो; इतरांना नाही.' हे ऐकल्यावर तो मेहुणा अधिकट पेटला. त्याने पिशाचाची, देवाची आणि बुवांचीहि थट्टा करायला सुरुवात केली. मग मात्र त्या पिशाचाने त्या मेहुण्याच्या संबंधी अशा एका पिशाचाला सांगून त्याचा चांगलाच समाचार घ्यायला लावला व 'आतां कां ढोंग करतोस?' असे खिजवून 'काय तुझे शहाणपण आहे ते दाखव' असे प्रत्याह्वानहि दिले. मग मात्र तो नास्तिक माणूस महाराजांना शरण आला व त्यांनी सांगितलेली सेवा श्रद्धापूर्वक करून दोषमुक्त झाला.

त्याचप्रमाणे कुणी पैसे उसने कर्जाऊ अथवा ठेव ठेवून मरण पावला तर तो पिशाचयोनींत जाऊन ज्याचे येणे आहे अशा व्यक्तीला व त्या व्यक्तीच्या वंशजांनाहि त्रास देतो. सावंतवाडीच्या राणीसाहेबांची गोष्ट इतरत्र आली आहेच. वाडीला एक गृहस्थ आपल्या प्रेतपीडित पत्नीला घेऊन आला. अनेक उपायांनी तिचा त्रास कमी होईना तेव्हां तो महाराजांना शरण आला. त्यांनी त्याला त्याच्या पूर्वजांकडे ठेवलेली एका ब्राह्मणाची १२००रु. ठेव परत न घेतांच तो मृत्यु पावल्याने पिशाच होऊन तुमच्या पत्नीला त्रास देत असल्याचे सांगितले. महाराजांच्या आज्ञेने त्याने तेवढे पैसे ब्राह्मणसंतर्पणांत खर्च केल्यावर त्याच्या पत्नीची बाधा नाहीशी झाली.

दुसऱ्या एका ब्राह्मणाने अशीच आपली हकीकत महाराजांना सांगितली. त्याच्या आजोबांकडे एक ब्राह्मण जेवायला आला. जातांना त्याने आपले बत्तीस रुपये 'कांही दिवसांनी येऊन घेऊन जाईन' असे सांगून त्याच्याकडे ठेवले. पुढे तो एकदा येऊन गेला पण पैसे कांही त्याने नेले नाहींत. त्याच्या नांवागांवाचीहि चौकशी आजोबांनी केली नव्हती. अशा परिस्थितींत तो ब्राह्मण परत न येतांच मेला. आजोबाहि वारले. मात्र तो ब्राह्मण पिशाच होऊन आपल्या वडिलांना त्रास देऊं लागला. दोन वेळां नारायणबळी करूनहि ही पीडा जात नसल्याचे त्याने सांगितले. महाराजांनी त्या पिशाचाला बोलावून त्या हकीकतीची शहानिशा केली. त्याने ते सर्व खरे असल्याचे सांगून आणखी

एकदां नारायणबळी करून आपल्याला मुक्ति द्यावी अशी प्रार्थना केली. त्याप्रमाणे तसे करून तो ब्राह्मण त्या बाधेपासून मुक्त झाला.

वाडीच्या मुक्कामांतच एक पिशाचग्रस्त ब्राह्मण महाराजांकडे आला होता. त्याच्या आजाने एका ब्राह्मणाच्या बागाईत जमीनीची अपहार केला होता. त्यामुळे तो पिशाच झाला व त्याने त्याचे कुटुंब, मुलगा यांना ठार करून आतां नातवाला छळत होता. त्याने महाराजांच्या आज्ञेने तीन लक्ष गायत्रीजप व ४९ गुरुचरित्र सप्ताह केल्यावर तो पिशाचमुक्त झाला.

असंबंधित व्यक्तींना पिशाचबाधा होण्याची शास्त्रांत सांगितलेली कारणे खालीलप्रमाणे आहेत.

१. मलमूत्रत्यागाच्या वेळी जी अशुचिता येते ती प्रेतावेशाला अनुकूल असते. मलमूत्रविसर्जनानंतर त्यामुळे पिशाचांच्या वसतीच्या ठिकाणी मलमूत्रत्याग करू नये असे शास्त्र सांगते. महाराज उज्जैनला पहिला चातुर्मास करून ब्रह्मावर्ताला जातांना ते खरेरा नांवाच्या एका गांवीं आले. तेथे एक स्त्री दर्शनाला आली व महाराजांच्या छोट्या दत्तमूर्तीची पूजा करूं लागली. तिने उदबत्ती पेटविल्याबरोबर तिच्या अंगांत पिशाचसंचार झाला व ती ओरडूं लागली व मंडळी जमली. तेव्हां महाराजांनी त्याला 'तूं कोण आहेस?' असें विचारतांच त्या पिशाचाने आपण जवळच्याच मशिदीचे जिंद असून आपल्या मशिदीजवळ ह्या बाईने लघुशंका केल्याने आपण तिला धरल्याचे सांगितले. त्या पिशाचाने त्या स्त्रीच्या तीन गर्भांचाहि नाश केला होता. त्या पिशाचाच्या विनवणीवरून महाराजांनी त्या स्त्रीच्या नवऱ्याला मशिदीची दुरुस्ती करण्यास सांगितले. त्यानंतर ती बाई पिशाचमुक्त होऊन तिला संततीहि झाली.

२. अशुद्ध स्थाने; एकान्तांत अंधाराची ठिकाणे; तलावादि जलाशयांच्या कांठीं; पिंपळ, वड, ताड-खजूर इत्यादि वृक्षांखालीं, श्मशानभूमी, समाधिस्थान व कबर, थडगे यांच्या जवळ; चव्हाटा इत्यादि ठिकाणी पिशाचांची वस्ती असते. तसेच निर्जन जुने किल्ले, हवेल्या व इतर निवासस्थाने. अशा स्थानांत सहसा वस्ती करूं नये. केलीच तर पूजा, हवन, भागवत, रामायण, गुरुचरित्र आदि पठण, उदकशांति यांपैकीं एक वा अनेक कर्मांनी ती जागा शुद्ध करून घ्यावी. अशा ठिकाणी जाणे अनिवार्यच असेल तर श्रीगुरु व इष्टदेवता यांचे स्मरण करून गुरुदत्त मंत्राचे वा भगवन्नामाचे अखंड स्मरण स्तोत्रादिकांचा मोठ्याने पाठ करीत जावे.

३. प्रेत भोगवासनेने वखवखलेले असल्याने वरील स्थानांतून किंवा अशुद्ध अवस्थेत खाणे किंवा नग्नावस्थेत स्नान करणे इत्यादि

पिशाचाला आकर्षण करतात. त्या कटाक्षाने टाळाव्या. शक्य तो घराबाहेर खाऊ नये व खाणे झाल्यावर चूळ भरल्याशिवाय राहूं नये.

४. पिशाच सिद्ध करणे किंवा त्यांची मदत घेणे कटाक्षाने टाळावे. उदाहरणार्थ प्लॅंचेट्, माध्यम वगैरे. अशा साधना करणाऱ्या व्यक्तींशी संपर्क ठेवूं नये. कुणाची बाधा निवारण करण्यासाठी अशा मांत्रिकांची मदत घ्यावीच लागली तर घ्यावी; पण त्यांच्याशी संपर्क वाढवणे किंवा वैयक्तिक लाभासाठी उपयोग करणे दुर्गतीला कारण होते हे विसरू नये.

५. पिशाचाकडून कोणतीहि वस्तू घेणे, त्याच्या आग्रहाने अनुचित गोष्टी करणे या गोष्टी कटाक्षाने टाळाव्यात. मृत व्यक्तीचे द्रव्य किंवा इतर वस्तू घेतल्या तरी पिशाचबाधा होऊं शकते. श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रांत ग्वाल्हेरच्या एका आळंदीकर नांवाच्या भिक्षुकी करणाऱ्या ब्राह्मणाची गोष्ट आहे. ह्या भटजीबुवांना एका चोरांच्या टोळीने दर पौर्णिमेस रेड्याच्या बलिदानाचा मंत्र सांगण्यासाठी धरून न्यावे व भरपूर दक्षिणा देऊन आणून सोडावे. असा क्रम बारा वर्षे चालला व त्यानंतर त्या टोळीची जागा बदलण्याची वेळ आली. तेव्हां गुरुजींची आणि त्यांच्या पत्नीचीहि संभावना करण्यासाठी त्यांना आपल्या गुहेत ते घेऊन गेले. त्या वेळी त्यांनी दिलेल्या वस्तूंत कांही दागिनेहि होते. अर्थात्च सर्व चोरीचाच ऐवज होता. त्यांपैकी कांही विशिष्ट दागिने गुरुजींच्या पत्नीने अंगावर घातल्याबरोबर त्यांना एका ब्रह्मसमंधाने झपाटले. दहा वर्षांच्या प्रयत्नानंतर गाणगापूरला झालेल्या श्रीदत्तप्रभूंच्या दृष्टांतानुसार त्यांनी गरुडेश्वरला श्रीमहाराजांकडे जाऊन त्या आर्तीपासून पत्नीची सुटका करून घेतली.

६. पिशाचाचे दर्शन झाले किंवा भूतबाधेच्या माणसाशीं संपर्क आला तर घाबरू नये. ईश्वरावर आणि सद्गुरूंवर दृढ निष्ठा ठेवून त्याला काय हवे ते आदरपूर्वक विचारावे. त्याला हवी असलेली वस्तू औचित्याच्या मर्यादा पाळून देतां आल्या तर द्याव्यात(उदाः- अन्नादि); त्याच्या गतीसाठी उचित कर्म करावे.

**जो भगवंताला शरण जातो, ईश्वरभक्ति करतो त्याला कशाचेहि भय नाही.** देवतासुद्धां त्याचा अपकार करूं शकत नाहीत. याकरतां सतत ईश्वराच्या भजन, पूजन, स्मरण, कीर्तन व नामजपांत रहाण्याचा प्रयत्न करावा.

## प्रेतबाधा

प्रेतबाधेचे प्रमाण कलियुगांत अत्यधिक असल्याचे पुराणांनी सांगितले आहे. तरीहि आपल्याला या योनीच्या अस्तित्वाचीच शंका वाटते. याचे कारण

पिशाचबाधा ओळखण्याची क्षमता आपल्यांत नसते. अमंगल, अपवित्र व सर्वथा दुष्ट आणि घृणित अशी ही योनि असली तरी तिची गणना देवयोनींत आहे. व ज्ञान व क्रिया या दोन्ही शक्तींत ते कलियुगांतील सर्वसामान्य मानवांपेक्षां खूपच वरचढ असतात. देवांप्रमाणेच मनुष्याच्या बुद्धिद्वारा त्यांचे कार्य होत असते. थोडक्यांत सांगायचे तर प्रेतबाधेने माणसाच्या मति, प्रीति, रति, लक्ष्मी आणि बुद्धि (प्रवृत्ति) यांचा नाश होतो. वेद, शास्त्र, धर्म, स्मृति-पुराण. यांच्याविषयी नास्तिक्य, देवता व ब्राह्मण यांची निंदा, कर्मत्याग व दुराचार ही प्रेतजन्य बाधेची लक्षणे सांगितली आहेत. आस्तिक्यबुद्धी व सारासारविवेक नष्ट होऊन पिशाचबाधित माणूस अनैतिक कर्मांनी धन मिळविण्याला उद्युक्त होतो. बंधुबांधवच काय, मातापिता आणि पुत्राशींहि वैर धारण करून त्यांची हत्याहि करण्यास प्रवृत्त होतो. अशी रीतीने प्रीतीचा सर्वथा अभाव असणे हे पिशाचबोधेचेच लक्षण आहे. सुंदर पत्नी घरांत असूनहि त्याला संसाराचे सुख लाभत नाही. पत्नीचा वियोग वा मृत्यू घडतो. ज्या धनासाठी आटापीटा केला ते धनहि कालांतराने नष्ट होते. पाऊस चांगला होऊनहि शेती न पिकणे, व्यापारांत अनपेक्षित तोटा होणे, बांधलेली घरे न टिकणे, व्यसनाधीनता हीसुद्धा पिशाचाच्या बाधेने होतात.

बनवासी येथे एका गृहस्थाने घर बांधले की लगेच त्याला पूर्वसूचना देऊन एक पिशाच ते पाडून टाकी. महाराजांनी त्याला कांही उपाय सांगितल्यावर त्याचे घर टिकले. पाथरीच्या चौधरींचे शेत पिकत नव्हते. कुणी ते  शेत करू लागला की मरण पावत असे. महाराजांना विचारतां त्यांनी त्या शेतांत मृत्यु पावलेला एक फकीर जिंद झाला असून त्याच्या शांतीसाठी प्रतिवर्षी बरेच फकीर बोलावून त्यांच्यकडून नमाझ पढवून त्यांना जेवण घालण्यास सांगितले. तसे करतांच ते शेत लागवडीस आले.

पिशाचबाधेने संततीला प्रतिबंध होतो; संतति झाली तरी जगत नाही; स्त्रियांना रजोदर्शन न होणे, गर्भपात होणे हीसुद्धा बऱ्याच वेळा प्रेतबाधेने होतात. पापकर्मांतच अधिकाधिक गोडी वाढून तो स्वतःचाच नाश करतो. अशा पिशाचबाधेने ग्रस्त झालेले कुळ पांचव्या पिढींत नष्ट होते. असे वचन आहे.

नर्मदातीरावर महामंडलापूर येथील भैरवप्रसाद याने आपली मुले जगत नाहीत, अशी आपली कर्मकहाणी महाराजांना कथन केली. शेवटी पांचव्या मुलाचे प्रेतहि एका जटाधारी बुवाने उचलून नेल्याचे सांगितले. महाराजांनी त्यांना त्याचाच एक पूर्वज पिशाच झाला असून त्यानेच हा नाश केल्याचे सांगितले. शेंवटी महाराजांच्या आज्ञेप्रमाणे नारायणबली, विष्णुसहस्रनामाचे पाठ, कांही प्रायश्चित्ते इत्यादि उपाय सांगून त्याला घरीं पाठविले.

महाराजांचा एक पूर्वाश्रमींचा भाचाच आपली संतति जगत नाही म्हणून त्यांच्याकडे आला. त्यांनी त्याला त्याचा चुलताच पिशाच होऊन पीडा देत असल्याचे सांगितले व त्याच्या मुक्तीसाठी त्रिपिंडी श्राद्ध करण्यास सांगितले. ते कांही निमित्ताने त्याने टाळले. पुढे ३-४ वर्षांनी त्याची आई गरुडेश्वरला गेली तेव्हां महाराजांनी ते श्राद्ध मुलाकडून लवकर करून घ्यायला सांगितले. तसे करतांच त्याची मुले जगूं लागली.

पवनीजवळ बोरी गांवच्या पटवाऱ्याला एक मूल झाले त्याला. त्याला फक्त तोंडच असून इतर अवयव कांहीच नव्हते. ते मूल पाहून भीतीने आजारी होऊन पटवाऱ्याची पत्नी महाराजांना शरण आली. महाराजांनी तिला एक यंत्र करून दिले. ते धारण केल्यावर ती त्या त्रासांतून मुक्त झाली.

शारीरिक व्याधींचा प्रादुर्भाव हें पिशाचांच्या पीडेचें एक मुख्य स्वरूप आहे. हावनूर येथील चातुर्मासांत, एका वैष्णव स्त्रीला तिचा भाऊ घेऊन आला. लग्नानंतर कांहीं दिवसांतच तिचे सांधे आखडून तिला चालणें-फिरणेंच काय पण उठणें-बसणेंहि शक्य होत नव्हतें. श्रीमहाराजांनीं त्या स्त्रीकडे पाहतांच खरा प्रकार जाणला व आपल्या कमंडलूंतील पाणी तिच्या अंगावर शिपडलें. लगेच त्या पिशाचाचा संचार होऊन 'मी जातों, मी जातों' असें ती ओरडूं लागली. त्या पिशाचाला त्या दुष्ट योनींतून मुक्ति देण्याचें श्रीमहाराजांचें आश्वासन मिळतांच तें पिशाच त्या स्त्रीला सोडून गेलें व ती उठून चालत आपल्या घरीं गेली. असे अनेक चमत्कार श्रीमहाराजांच्या कृपेनें सतत घडून जात.

## प्रेतावेश

वर पिशाचांच्या आक्रमणाला अनुकूल अशा स्थितींचे वर्णन आले आहे. अशा प्रसंगीं पिशाच अदृश्य किंवा दृश्य रूपांत त्या व्यक्तीच्या प्राणमय कोशांत प्रवेश करते व त्या शरीराचा ताबा घेऊन आपल्या वासनांच्या पूर्तीचा प्रयत्न करते. त्या व्यक्तीच्या वागण्यांत यामुळे लक्षणीय फरक पडतो. उदाहरणार्थः- आहारांत अमर्याद वाढ, अकारण वा क्षुल्लक कारणावरून रागावणे, शिवीगाळी, आरडाओरडा करणे इत्यादि. पिशाच सहजासहजी स्वतःची ओळख पटवत नाही. पण त्याच्या अशुचि, रागीट व उपद्रवकर स्वभावानेच त्याला ओळखतां येईल. गुप्त राहूनच आक्रमित व्यक्तीला त्रास देण्याची त्याची प्रवृत्ती असते. अशा वेळी त्याला ओळखणे किंवा आवेशकाळीं त्याच्याशी संवाद करून त्याची माहिती करून घेणे केवळ जाणकार व सामर्थ्यशाली व्यक्तीलाच शक्य आहे. सर्वसामान्य माणसाला तो प्रयत्न घातक ठरूं शकतो. आवेश झालेल्या व्यक्तींत फार मोठे बळ येऊं शकते. अर्थात् हे त्या पिशाचाच्या सामर्थ्यावर व स्वभावावर अवलंबून असते.

योग्य प्रयत्नांनी पिशाचाला बोलते करून त्याच्या मुक्तीचा उपायहि त्याच्याकडूनच जाणतां येतो. कोगूर येथे (१९०७) श्रीपादशास्त्री अय्यर यांची बहिण वारंवार बेशुद्ध पडे. औषधपाण्याचा कांहींच गुण न आल्याने तिला महाराजांकडे आणले. महाराजांनी तिला पाहूनच पिशाचबाधा असल्याचे सांगितले. श्रीपादशास्त्रींनी आपण पिशाचयोनी मानतो पण त्यांचा माणसांशी संबंध येतो हे आपल्याला मान्य नसल्याचे सांगितले. तेव्हां महाराजांनी त्यांना एक प्रयोग करून प्रत्यक्षच पहायला सांगितले. महाराजांनी एका विटेवर एक मंत्र लिहून त्याचा रोज विटेपुढे धूप घालून २१ वेळां जप केल्यास २१ दिवसांत पिशाच बोलूं लागेल असे सांगितले. तसाच अनुभव श्रीपादशास्त्रींना आला व २१व्या दिवशी पिशाचाने योऊन आपल्या ही योनि प्राप्त होण्याचे त्या बहिणीला त्रास देण्याचे कारणहि सांगितले. शेवटी महाराजांचा ताप सहन होत नसल्याने आपण जात आहों, आपल्यासाठी अमुक कार्य करावे असे सांगून ते पिशाच निघून गेले व त्या बहिणीची सुटका झाली.

## .पिशाचबाधेचा परिहार

पिशाचबाधेपासून सुटका करण्याचे अनेक उपाय शास्त्रांत वर्णिलेले आहेत. त्या सर्वांची सविस्तर चर्चा इथे करणे अप्रस्तुत आणि अशक्य आहे. कांही सोपे उपाय इथे उल्लेखिलेले आहेत.

**श्रीमद्‌भगवद्‌गीता** :- गीतापाठाने, ११व्या अध्यायांतील ३५ ते ४६ श्लोकांच्या हवनाने, विशेषतः ३६व्या श्लोक (स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्परहृष्यत्यनुरज्यते च। रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसंघाः) लिहिलेले तख्ते भिंतीवर टांगल्याने, त्या जागेतून पिशाच निघून जाते. असाच लाभ श्रीविष्णुसहस्रनामाच्या पाठानेहि होतो. महामृत्यंजयमंत्र, हनुमानचालिसा यांचा पाठहि पिशाचपरिहाराला उपयुक्त आहे.

**गायत्रीजप** :- गायत्रीचा जप किंवा गायत्रीने अभिमंत्रित पाणी अभिभूत व्यक्तीच्या अंगावर शिंपडणे, तिला पाजणे इत्यादि उपायहि परिणामकारक आहेत असे शास्त्रांचे सांगणे आहे.

**श्रीमद्‌भागवत** :- श्रीमद्‌भागवतसप्ताहाने पीडित व्यक्ति व पिशाच या दोहोंची मुक्ति होते हे सर्वश्रुतच आहे. गोकर्णमाहात्म्यांत याचे वर्णन आहे.

**गङ्गास्नान** :- गङ्गादि पवित्र नद्यांच्या स्नानाने पिशाचपरिहार झाल्याची उदाहरणे आहेत.

**गोसेवा** :- गोमातेची सेवाहि पिशाचबाधेपासून मुक्ति देते.

**नारायणबळी** :- तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी पिशाचाला सद्‌गति मिळावी म्हणून नारायणबळीचे विधान अनेक पुराणांत आणि स्मृतींतहि दिले आहे.

**त्रिपिंडी श्राद्ध** :- हेहि पिशाचाला मुक्ति देते. महाराजांनी आपल्या भाच्याकडून करवून घेतले होते.

**गयाश्राद्ध** :- गयाश्राद्धाचे माहात्म्यहि सुप्रसिद्धच आहे.

**श्रीदत्तप्रभूंची सेवा**, गाणगापूर, नरसोबावाडी, माहूर इत्यादि दत्तस्थानांतून करून पिशाचबाधेपासून मुक्त झालेले असंख्या लोक आहेत. माणगांवला श्रीदत्तप्रभूंचे सात वर्षे वास्तव्य झाले तेव्हांहि तिथे प्रदक्षिणा, धूप व आरतीला उपस्थित राहणे इत्यादि सेवा करून पीडामुक्त झाल्याची खूप उदाहरणे आहेत. तसेच गुरुचरित्र-पारायण, ब्राह्मणभोजन, रुद्राभिषेक, अश्वत्थाला पार बांधणें इत्यादि उपायांनीहि प्रेतपीडेचा परिहार झाल्याची उदाहरणे महाराजांच्या चरित्रांत आहेत.

**मंत्र आणि यंत्र** यांचा उपयागहि अथर्ववेदापासून ग्रथित आहे. याचा अभ्यास करणारी मंडळीहि असतात. अर्थात् यांत ढोंगी लोकांपासून सावध रहाणे आवश्यक आहे. तपस्वी, निःस्वार्थी अशाच मांत्रिकाचा या कामी आश्रय घेण्याची खबरदारी घेतली पाहिजे. ब्रह्मावर्त येथे गणपतिबुवांच्या पुतण्याच्या मुलाला महाराजांनी यंत्र करून दिले होते. ते गळ्यांत असेपर्यंत त्याला पिशाच कांही करूं शकत नसे. आपल्या अस्पृश्य आईकडे जाण्याचा हट्ट त्याने धरल्याने ते यंत्र काढावे लागले व हीच संधि साधून त्या पिशाचाने त्याला ठार केले.

सत्पुरुषांची, साधुसंतांची कृपासुद्धा पिशाचबाधेपासून मुक्ति देते. हावनूर मुक्कामी पिशाचबाधेने हातपायसुद्धां हलवतां न येणाऱ्या स्त्रीला महाराजांनी केवळ तीर्थ प्रोक्षण करून चालते केले. त्यामुळे त्यांच्याविषयी आकस बाळगणारे वैष्णव लोकहि त्यांच्या भजनी लागले. अशी अनेक उदाहरणे श्रीस्वामीमहाराजांच्या चरित्रांत आहे.

प्रेतोपासना, प्रेतसेवा, प्रेतसिद्धि या प्रकारच्या उपासना तामसी आहेत. ही साधने करणारे प्रेतयोनीसच प्राप्त होतात. म्हणून कुठल्याहि स्वार्थाच्या अभिलाषेने अशा साधनांचा अवलंब कदापि करू नये.

## प.प. श्रीवासुदेवानन्दसरस्वती(टेम्बे)स्वामीमहाराजांचे
## जिज्ञासू भक्त

**अतः कोऽप्येकया भक्त्या सकामोऽपि भजेत्प्रभुम्।।**
**भक्त्यैवेह विनिर्धूतमलो मुक्तिं क्रमाद्व्रजेत्।।** श्रीदत्तपुराण ६:४:६८

मागच्या भागांत पाहिल्याप्रमाणें कांहीं प्रापंचिक अर्थाच्या, म्हणजेच कामनेच्या प्राप्तीद्वारा परमेश्वराच्या भक्तीला लागलेला अर्थार्थी भक्त हा भक्तिमार्गाचा पहिला टप्पा होय. या अवस्थेंत परमेश्वर हें साध्य किंवा ध्येय नसतें. तर प्रापंचिक सुखाचें एक साधनच अशी भावना असते. आपल्या सांसारिक जीवनाला पुष्टि देणारा, त्यांतील उणीवा भरून देऊन त्याला पूर्णता देणारा प्रभू, अशीच ईश्वराविषयीं श्रद्धा असते. पूर्वी पाहिल्याप्रमाणें केवळ ऐंद्रिय सुखांतच रमलेल्या जीवाचें लक्ष परमेश्वराकडे वळावें यासाठीं स्वतः ईश्वर अथवा संतमहात्मे कधीं कधीं त्याच्या कामना पूर्ण करून त्याला सुखावणारे चमत्कार घडवून आणतात. मात्र हे चमत्कार केवळ त्याची श्रद्धा रुजावी, वाढावी एवढ्यासाठींच असतात. बऱ्याच भक्तमंडळींची अशी श्रद्धा असते कीं परमेश्वर (किंवा सद्‌गुरु) हे सदोदित आपल्या इच्छा पूर्ण करतीलच. परमेश्वर हा अत्यंत दयाळू व सर्वसामर्थ्यसंपन्न असला तरी आपल्या भक्तांनीं कायम विषयांच्या भोगांत मग्न रहावें हें त्याला (म्हणजेच श्रीगुरूंना) अभिप्रेत नाहीं. शिवाय कर्मसिद्धान्त हा सृष्टीच्या मुळाशींच निगडित असल्यानें त्यापासून कुणालाहि मोक्षाशिवाय सुटका नाही. मोक्ष हा आत्मज्ञानाशिवाय संभवत नाहीं. तसेंच आत्मज्ञान हें वैराग्याशिवाय लाभत नाहीं. असें असल्यानें परमेश्वर या अर्थार्थी भक्ताला केवळ संसारांत रमूं देत नाहीं. त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें प्रत्येक जीवाला, त्यांत भक्तहि आलेच, सुखदुःखांना सामोरें जावेंच लागतें.

मानवी जीवनाचें हें वैशिष्ट्य आहे कीं येथें सुख आणि दुःख असे दोन्ही भोग आहेत. असें म्हणतात कीं स्वर्गादि लोकांत केवळ सुखच आहे. आपल्या पुण्याचा भोग घेण्यासाठींच जीवाला त्या लोकाची प्राप्ति झालेली असते. मानवी मनाला कल्पनाहि करतां येणार नाहींत अशीं सुखें एकापाठोपाठ एक अशीं तो उपभोगतो. त्यांत तो जीव(स्त्री वा पुरुष) इतका रममाण होतो कीं त्याला परमेश्वराचें स्मरणसुद्धां होत नाहीं. आणि त्याच्या पुण्याचा सांठा ओसरला आणि पापपुण्याची समानता झाली कीं त्याची रवानगी परत मृत्युलोकांत होते. पुण्याच्या भोगासाठीं जसे स्वर्ग आहेत तसे पापाच्या भोगासाठीं नरक आहेत. तिथें केवळ तीव्रातितीव्र दुःखांच्या, यातनांच्याच

मालिका असतात. पाप भोगून झालें व पापपुण्याची साम्यदशा झाली कीं त्याला पुन्हां मनुष्यलोकांत येण्याची संधि मिळते. अशा प्रकारें केवळ मनुष्यदेहांतच पाप व पुण्य ह्या दोन्हीचे भोग आहेत. 'जगीं सर्वसुखी असा कोण आहे?' असा प्रश्न म्हणूनच समर्थ रामदासस्वामी विचारतात.

हा जो **अर्थार्थी** भक्त- उपासक परमेश्वराला भजत असतो आणि त्याच्या कृपेनेंच आपला संसार सुखाचा होत आहे असें मानतो त्यालाहि अर्थात् प्रारब्धानुसार दुःखप्राप्ति होणारच. छोटेमोठे दुःखाचे प्रसंग सर्वांच्या आयुष्यांत येतच असतात व भक्त-अभक्त त्या सर्वांना आपापल्या कुवतीनुसार तोंड देतातच. पण एखादा प्रसंग असा येतो ज्यायोगें परमेश्वर हा माझा सुखकर्ता आहे या त्या भक्ताच्या श्रद्धेलाच धक्का देऊन जातो. दुःखाच्या या तडाख्यानें विह्वल, व्याकुळ, दीन आणि हताश झालेला भक्त त्या वेळीं **आर्त** होतो. त्याची भक्ति त्याला पुनः परमेश्वराकडेच(किंवा संतांकडे) नेते. त्याच्याशिवाय दुसरा कोणी त्राता नाहीं अशा विश्वासानें तो पुन्हां परमेश्वरालाच शरण जातो. ही भक्तीची दुसरी पायरी समजायला हरकत नाहीं. ह्या आर्त भक्ताला मानवी जीवनाची नश्वरता, क्षणभंगुरता तसेंच वैषयिक सुखाची भ्रामकता कळूं लागते. म्हणजेच **विवेक जागा होतो. हेंच सत्संगाचें मुख्य फळ आहे.** जीवनांतील ह्या आपत्तीच परमेश्वरकृपा असेल तर वैराग्याला कारण होतात. वैराग्य म्हणजे नैराश्य नव्हे. संसाराचे सगळेच रंग फिकट होणें ह्याचें नांव वैराग्य. राग आणि द्वेष या दोन्हींची तीव्रता कमी होणें. वैराग्य हें दुःखाची तीव्रता कमी करतें आणि विषयाची ओढ ढिली करतें. नैराश्य मनाची उभारीच काढून टाकतें. वैराग्य हें विवेकाचें म्हणजेच विचाराचें फळ आहे. नैराश्य हें अविचाराचें, मोहाचें फळ आहे. थोडक्यांत ज्या दुःखांमुळें सर्वसाधारण माणूस निराश होतो त्यांतच साधकाला आध्यात्मिक प्रगतीचीं बीजें गवसतात. असो.

अशा रीतीनें सुखदुःखाचे आघात झेलीत जाणारा हा आर्त भक्त ह्या द्वंद्वांतूनच पूर्णपणें सुटण्याची म्हणजेच मोक्षाची इच्छा करूं लागतो. पापपुण्य भोगून त्यांचा जसा जसा क्षय होतो तसतशी चित्तशुद्धी होते व मुमुक्षा प्रकट होते. चित्तशुद्धीच्या प्रमाणांत ही मुमुक्षा तीव्र होत जाते हा भक्त **जिज्ञासू** या संज्ञेला प्राप्त होतो. अशा परिपक्व भक्ताला परमेश्वर मग सद्‌गुरूंची भेट घडवून देतो. अर्थात् अर्थार्थी आणि आर्त भक्तापेक्षां यांची संख्या कमीच असते. असे शेंकडों जिज्ञासू भक्त श्रीस्वामीमहाराजांकडे येत असत. यांच्यात वय, लिंग इत्यादि विविधता तर होतीच पण सर्वांत महत्त्वाची विविधता होती ती त्यांच्या

आध्यात्मिक अधिकाराची. आध्यात्मिक अधिकार हा शब्द इथें विशिष्ट अर्थानें योजला आहे. प्रत्येक साधकाचा एक स्वतंत्र, वेगळा असा अधिकार असतो. ह्याच्याशीं त्याच्या मोठेपणाचा कांहीं संबन्ध नसतो. त्या साधकाची पूर्वीची-जन्मांतराची साधना, प्रगति आणि प्रकृति यांच्या समुच्चयाला अधिकार म्हटलें आहे. ह्या त्याच्या अधिकारानुसारच श्रीस्वामीमहाराज त्यांच्याकडे येणाऱ्या भक्तांना त्यांचा हा अधिकार नेमका ओळखून भावी पारमार्थिक वाटचालीचें मार्गदर्शन करीत असत. सर्वच साधकांना एकच साचेबंद साधन उपकारक होईल असें नाहीं. प्रत्येक साधकाचा एक आपलाच विशेष मार्ग असतो असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

श्रीमहाराजांचें आध्यात्मिक ज्ञान किती विशाल होतें हें सांगणेंच अशक्य आहे. योगमार्गाच्या अनेक साधनांची त्यांना केवळ माहितीच नव्हे तर त्या प्रत्येक साधनांचे अनुभवपूर्ण दिग्दर्शन करून त्या त्या साधकाला आपल्या ध्येयापर्यंत पोंचविण्याचें सामर्थ्य त्यांच्याकडे होतें. उपासना, तंत्र, हठयोग, वैदिक कर्ममार्ग, अष्टाङ्गयोग, ज्ञानमार्ग ह्या सर्व मार्गांचे साधक स्वामीमहाराजांकडे येऊन कृतार्थ झालेले आहेत. त्यांपैकीं कांहींच ज्ञात आहेत. त्यांतहि बह्वंशीं साधक आपलें आध्यात्मिक जीवन गुप्तच ठेवत असल्यानें ही माहिती अगदीं मर्यादित स्वरूपाचीच असणार. तरी त्यांच्या चरित्राचा व कांहीं आठवणींचा मागोवा घेतला तर थोडीशी कल्पना येऊं शकेल. प्रस्तुत लेखकाची कुवत आणि ज्ञान यांच्या मर्यादा लक्षांत घेतां कांहीं त्रोटक माहितीच येथें समाविष्ट होईल हे उघड आहे.

**भक्तिमार्ग:-** सर्वसाधारणतः श्रीमहाराजांनीं अधिकांत अधिक उपदेश केला असेल तर तो भक्तिमार्गाचा. त्यांतहि विशेषतः श्रीदत्तप्रभूंच्या भक्तीचा. श्रीदत्तसंप्रदाय हा श्रीभागवतसंप्रदायांतर्गत आहे अशी श्रीमहाराजांची भूमिका होती. त्यांची भूमिका तर यापेक्षांहि अधिक उदार व समन्वयाची होती. हिंदु (वैदिक) धर्मांतील संप्रदायांची तर सोडाच पण जैनादिक भारतीय, व पारसिक, मुसलमान वगैरे भारताबाहेरच्या संप्रदायांचीहि त्यानीं उपेक्षा केली नाहीं. त्या त्या धर्मांतील भक्तांना त्यांच्या धर्मग्रंथांतीलच उपासना ते देत असत. तसे अनुभवहि साधकांना येत व त्या उपासना वंशपरंपरेनें करणारीं परधर्मीय कुटुंबेंहि पाहण्यांत येतात.

भक्तिमार्गांत भावाला महत्त्व आहे. भाव म्हणजे परमेश्वराविषयीं एक विशिष्ट प्रेमसंबन्ध. स्वामी, पूज्य, सखा, बंधु, पति, त्राता, कैवारी, प्रियकर

असा कुठलाहि एक भाव ईश्वराविषयीं धारण करून तो वाढवणें याचें नांव भक्तिमार्ग. ह्या भावांत महत्त्व आहे तें अनन्यतेला, सातत्याला आणि तीव्रतेला. भावाच्या बळानेंच ईश्वर आकळतो असें सर्व वेद-शास्त्र-संतांचें सागणें आहे. या मार्गांत आचारासंबंधीं फार कडक नियम नाहींत. भक्ताच्या भावाच्या दाढर्याचें व निश्चयाचेंच प्राधान्य आहे. '**भावांत फरक करूं नये**' असें श्रीस्वामीमहाराज सांगत. याची एक हकीकत पाहण्यासारखी आहे. नरसी(शके १८२८)चा चातुर्मास झाल्यावर वाशीमवरून महाराज कारंजा येथें आले व तेथें काळ्या मारुतीच्या मंदिरांत मुक्काम केला. तेथील पुजाऱ्यांचा असा नियम होता कीं मारुतीला नैवेद्य दाखवला कीं लगेच तो खाऊन टाकायचा व मग पूजा समाप्त करायची. त्या दिवशीं श्रीमहाराजाच्या उपस्थितीमुळें त्यांना संकोच वाटून त्यांनीं नैवेद्य भक्षण केला नाहीं. इकडे श्रीमहाराज ध्यान करीत असतां श्रीमारुतिरायच ध्यानांत आले व आपल्याला खायला पाहिजे अशा अभिप्रायानें मुख पसरून उभे राहिले. ही गोष्ट महाराजांनीं पुजाऱ्याला सांगतांच त्यांनीं लगेच तो नैवेद्य खाऊन टाकला. मग मात्र श्रीमारुतिराय श्रीमहाराजांच्या ध्यानांत आलं नाहींत. यावर महाराजांनीं त्या पुजाऱ्यांना सांगितलें कीं 'देवाला भक्ति फार प्रिय आहे. तरी तुम्ही कोणाचीहि भीड न धरतां आपल्या नियमात व भावनेंत बदल करूं नका'.

भक्तिमार्गांत सर्व वर्णांच्या, सर्व आश्रमांच्या एवढेंच नव्हे जातिधर्मांच्या साधकांना प्रवेश आहे. '*अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्। साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः।।*'(श्रीमद्भगवद्गीता ९:३०) या भगवदुक्तीला अनुसरून मनापासून संसाराला विटलेल्या कोणत्याहि जीवाची श्रीस्वामीमहाराज उपेक्षा करीत नसत. **सरस्वतीबाई** नांवाच्या एका वेश्येला उपरति होऊन ती वाडीला येऊन देवाची सेवा करीत होती. ती चांगली गायिका असल्यानें श्रीदीक्षितस्वामींनीं तिला नित्य देवापुढें करुणात्रिपदी म्हणायला सांगितलें होतें. एकदां श्रीस्वामीमहाराजांच्या मुक्कामांत त्या बाईंनीं त्यांच्यापुढें करुणात्रिपदीचें उत्तम तालासुरासहित गायन केलें. त्यांचा भाव पाहून श्रीमहाराजांनीं त्यांना 'भावें नमूं श्रीगुरुच्या पदासी' हें श्रीगुरुस्तोत्र लिहून दिलें व कांहीं ध्यानाभ्यासहि सांगितला. पुढें सरस्वतीबाईंनीं आमरण श्रीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें साधन करून मानवजन्माचें सार्थक करून घेतलें.

असेंच एक उदाहरण श्रीस्वामीमहाराजांच्या शिनोर येथील मुक्कामांत

घडलें. **जगला** नांवाचा एक कोळी जातींतला तरुण, घरच्या लोकांनीं त्याचें लग्न ठरवतांच पळून निघाला तो शिनोरला येऊन जवळजवळ विदेही अवस्थेंत येऊन राहिला. शीतोष्णादि द्वन्द्वें सहन करीत तो जडभरताप्रमाणेंच तिथें दोन वर्षें राहिला होता. एकदां श्रीमहाराज घाटावरून स्नान करून येत असतां जगलानें दोन्ही हात पसरून त्यांच्या मार्गांत उभें राहून त्यांना अडविलें. श्रीमहाराजांनीं त्याच्याकडे एक वेळ पाहून त्याला बोलले, 'तूं इथें राहतोस काय? रात्रीं मार्कंडेयाच्या मंदिरांत ये.' असें त्याला बोलून महाराज मुक्कामीं आले. संध्याकाळीं त्यांनीं सर्वांना सांगितलें कीं आज रात्रींपासून गीता सांगावयाची आहे. रात्रीं प्रवचनाला सुरुवात होण्यापूर्वींच वेळेवर येऊन जगला एका कोंपऱ्यांत बसला. असा क्रम रोज सुरूं झाला. पुढें गीतेचे १७ अध्याय सांगून झाल्यावर 'यापुढें आपल्याला कांहीं ऐकावयाचें नाहीं' असे सांगून तो निघून गेला. यापुढें एकदोन महिन्यातच त्याने आपली देहयात्रा संपवली. हें '*तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्। यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन*'(भ.गी.६:४३) ह्या योगभ्रष्टाच्या गतीविषयक भगवंतांच्या आश्वासनाचें प्रत्यक्ष उदाहरण आहे. प्रारब्धकर्मानुसार हीन यातींत जन्म झालेल्या जगलाला पौर्वदेहिक संस्कारांमुळें लहान वयांतच विरक्ति होऊन तो मोक्षप्राप्तीसाठीं प्रयत्न करूं लागला. श्रीमहाराजांसारख्या दत्तावतारी पुरुषांची गांठ पडून त्यांचा अनुग्रह झाला आणि त्याच्या आयुष्याचें सार्थक झालें.

भागवतधर्मांत श्रीमद्भागवताचें जें स्थान तेंच श्रीदत्तसंप्रदायांत श्रीगुरुचरित्राचें आहे. ह्या ग्रंथाच्या पठणानें श्रीदत्तप्रभूंची कृपा सहस्त्रावधि भक्तांनीं प्राप्त करून घेतली, घेत आहेत व घेतील. इंदोरचे **प.पू.नानामहाराज तराणेकर** यांनीं ह्या ग्रंथराजाच्या पठणानें व आपल्या तीव्रसंवेगी भक्तीनें श्रीमद्वासुदेवानन्द सरस्वती यांची कृपा संपादन केली. आपल्या दीर्घ आयुष्यांत श्रीस्वामीमहाराजांच्या ह्या समर्थ शिष्याने मोठ्या प्रमाणांत सर्व भारतांतच नव्हे तर जगभर श्रीदत्तभक्तीचा प्रचार केला आहे. या परंतु हा ग्रंथ मराठी असल्यानें महाराष्ट्राबाहेरच्या दत्तभक्तांना त्याचा हवा तेवढा लाभ होत नव्हता. ह्य त्रुटीचा परिहार करण्यासाठीं श्रीस्वामीमहाराजांकडून श्रीदत्तप्रभूंनीं 'श्रीगुरुचरितम्' (द्विसाहस्त्री) व 'श्रीगुरुसंहिता'(समश्लोकी) हे ग्रंथ करून घेतले. त्यामुळें श्रीगुरुचरित्राचा 'तारक व अव्यय ग्रंथात्मा' अखिल भारताला उपलब्ध झाला. श्रीगुरुसंहितेच्या तेलगु लिपींतील आवृत्तीचे नित्य पारायण

करणारे हजारो दत्तभक्त आंध्रांत आहेत.

असा हा भक्तियोग 'सुलभ, गोमटा' असला तरी श्रीतुकारामोक्तिप्रमाणें 'उपतिष्ठे पूर्वपुण्यें'! अंतःकरणांत ईश्वराविषयीं कुठल्याहि नात्यानें प्रेमाचाच काय पण द्वेषाचाहि उदय होण्याला पूर्वपुण्यच पाहिजे. अनेक जन्मांच्या कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यावरच भक्तीची वाट सांपडते. त्यासाठीं कर्मयोगाचाच आश्रय सर्वसाधारण मुमुक्षूंना घ्यावा लागतो.

**कर्मयोग:-** संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण असे कर्माचे तीन विभाग आहेत. अनेक जन्मांच्या कर्माचा कोष अशा ***संचितां***तून परिपक्व (फलाभिमुख) झालेल्या एका जन्माच्या कर्माला ***प्रारब्ध*** असें नांव आहे. आणि मानवी जीवनांत आपण प्रत्यहीं जें नूतन कर्म करतों त्याला ***क्रियमाण*** म्हणतात. अर्थात् नवीन कर्म करतांना आपण सावधगिरी बाळगली तर हें क्रियमाण सर्व पुण्यात्मकच होऊं शकते. ह्यासाठीं परमेश्वरप्रणीत शास्त्रानें कांहीं कर्म ***विहित*** केलें आहे. म्हणजेच प्रत्येक मानवाला आपला वर्णाश्रमांना अनुसरून कांहीं आवश्यक कर्म निर्धारित केलें आहे. हें न केलें तर तो ***प्रत्यवाय*** दोष होतो. ('नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।।३:८।।','स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।।१८:४५।।' भ.गी) इतर (***काम्य***) कर्मांतील कांहीं भाग ***निषिद्ध*** ठरविला आहे. ह्या कर्मानें मनुष्याची अवनति होते. हें निषिद्ध कर्म सोडून इतर काम्य कर्माची माणसाला मुभा आहे. ह्या सर्व कर्मांच्या शिवाय आणखीहि कांहीं कर्में वर्णिलेलीं आहेत. ***इष्ट, पूर्त, शांति, पुष्टि, यज्ञ*** इत्यादि कर्में पुण्यप्राप्ति, पापक्षय, प्रापंचिक लाभ इत्यादि उद्देशांनीं सांगितलीं आहेत. तसेंच केवळ पारमार्थिक प्रगतीसाठीं निरनिराळ्या आध्यात्मिक शास्त्रांनीं निर्देशित केलेलीं ***परमार्थसाधन***रूप कर्में आहेत. ह्या कर्मांच्या योगें संचित कर्माचाहि नाश होऊन जीव या कर्मचक्रांतून मुक्त होतो. हाच कर्मयोग होय. कोणत्याहि साधकाचा मार्ग इथूनच सुरूं होतो. कर्मयोगाकडे दुर्लक्ष करून परमेश्वरप्राप्तीचा विचार करणें शक्य नाहीं. यासाठीं श्रीस्वामीमहाराज नेहमीं सांगत, 'प्रजाजनांनीं राजाचे कायदे पाळले म्हणजे राजाला जसा संतोष होतो, तसाच संतोष शास्त्रनियम पाळल्यानें ईश्वराला होतो. करितां शास्त्राज्ञेप्रमाणें वागून ईश्वराची सेवा करा व आपलें कल्याण करून घ्या. '

ह्याच कारणानें श्रीमहाराजांनीं विहित कर्माच्या आचरणाचा कटाक्ष स्वतःच्या जीवनांत दाखवून दिला व आपल्याकडे येणाऱ्या सर्वांनाच, विशेषतः

ब्राह्मणांना त्याचें पालन करण्यास प्रवृत्त केलें. तशी श्रीदत्तप्रभूंची त्यांना आज्ञाच होती. केंस राखणाऱ्या ब्राह्मणांनां किंवा सकेशा विधवांना त्यांचें दर्शनहि मिळत नसे. तसेंच पंचमहायज्ञ न करणाऱ्या ब्राह्मणाच्या घरीं ते भिक्षा घेत नसत. पण त्यांना शरण आलेल्यांना ह्या मार्गाचें शिक्षण देण्यासाठीं किंवा त्याच्या अनुष्ठानांत साह्य करण्यासाठीं ते सतत झटत असत. आसेतुहिमाचल त्यानीं कर्ममार्गावर स्थिर केलेलीं ब्राह्मण कुटुंबें त्यांच्या ह्या कार्याची आजहि साक्ष देत आहेत. इथें एकदोन प्रातिनिधिक उदाहरणें पाहतां येतील.

श्रीमहाराजांच्या उज्जनी येथील पहिल्याच चातुर्मासानंतर महत्पूर येथें कांहीं दिवस राहून महाराज सारंगपूर येथें आले. तेथें लोकाच्या आग्रहानें कांहीं दिवस मुक्काम झाला. तेथें **केशवराव** नांवाचा एक पुण्याकडचा विधुर ब्राह्मण आपल्या आईबरोबर राहत असे. तो देवीडॉक्टर (vaccinator) होता. प्रथम पत्नी अत्यंत सुशील व विरक्त असून तिचा एक मुलगाहि होता. तो पांच वर्षांच्या वयांतच आपल्या ईश्वरभक्तीनें लोकांना प्रिय झालेला कोणी योगभ्रष्ट होता. एका जटाधारी बुवाच्या भेटीनंतर, त्याला 'उद्यां येतो'असे सांगून, दुसरे दिवशीं स्नानोत्तर त्या मुलाने गांवांतील सर्व लोकांना बोलावून, त्यांना परमेश्वराचें स्मरण नित्य ठेवून सन्मार्गानें वागण्याचा उपदेश केला व 'सदा सर्वदा योग तूझा घडावा' हा श्लोक म्हणून देवाला नमस्कार करून शांतपणें आसनावर बसून देह सोडला. त्याच्या आईनेंहि अजिबात शोक न करतां सर्वांना प्रपंचाच्या नश्वरतेची जाणीव करून देऊन, आपणहि सहा महिन्यांनीं पंढरपूर येथें देह ठेवणार असल्याचें सांगितलें व तसेंच झालेंहि. अंतकाळीं तिनें पतीचा वंश आपल्यापासून वाढला नसला तरी त्याचा द्वितीय विवाह मोरोपंतांच्या घराण्यांतील मुलीशीं होऊन तिच्यापासून वंश वाढेल असें सांगितलें. केशवरावाचा विरोध असतांहि तो विवाहसंबंध घडला. इतक्या विलक्षण घटना स्वतःच्या घरांत घडूनहि केशवरावाचा नास्तिकपणा कांहीं गेला नव्हता.

असा हा सर्व ब्रह्मकर्मांचा त्याग केलेला केशवराव श्रीमहाराजांच्या मुक्कामांत आईच्या सांगण्यावरून महाराजांना भिक्षेला बोलावण्यास गेला. तेव्हां महाराजांनीं स्पष्टच सांगितलें कीं, 'तूं ब्राह्मणासारखा दिसतसुद्धां नाहींस, तुझ्या घरीं नैवेद्य-वैश्वदेव कांहीसुद्धां होत नाहीं. तरी तुझ्या घरीं आपण भिक्षेसाठीं येणार नाहीं.' यावर केशवराव यानें आपण पुण्याचे कऱ्हाडे ब्राह्मण असल्याचें व आपण ब्रह्मकर्म करीत नसलों तरी भिक्षेच्या दिवशीं कुणाकडून करवून घेऊं

असें सांगितलें. त्यावर महाराज अधिकच रागावले व अशा लोकांचें आपण तोंडहि पहात नाहीं तेव्हां जेवण तर दूरच असें सांगून त्याला पाठविलें. या प्रसंगीं उपस्थित लोक महाराजांना बोलले 'महाराज! केशवराव अत्यंत दुष्ट मनुष्य आहे,..... तो आतां परत येणार नाहीं.' यावर महाराज म्हणाले 'थांबा, काय होतें ते पहा. केशवराव परत आलाच पाहिजे.'

महाराजांच्या निर्भर्त्सनेनें तापलेल्या केशवरावनें घरीं जाऊन ही हकीकत आईला सांगितली. आई उलट त्याच्यावरच रागावली व 'महाराज घरीं भिक्षेला येत नसतील तर आम्ही कसले ब्राह्मण!' आतां मात्र केशवरावला उपरति झाली व कांहीं करून महाराजांना आपल्या घरीं भिक्षेस आणावयाचेंच असा निश्चय करून तो परत महाराजांचेकडे आला. साष्टांग नमस्कार करून तो महाराजांना बोलला, 'मी महादोषी आहे. आपण दया करून मला पदरांत घ्या. यापुढें आपण सांगाल तसें मी वागेन.' त्याची ही नम्र व कळकळीची विनंति ऐकून उपस्थित मंडळींना आश्चर्य वाटलें. हा केवळ सत्संगाचा महिमा होय. स्वतःच्या पत्नी व मुलाच्या अलौकिक मृत्यूंनींसुद्धां न गेलेला नास्तिकपणा श्रीमहाराजांच्या निर्भर्त्सनेनें जाऊन तो त्यांना शरण आला. कोणत्याहि प्रापंचिक कामनेनें किवा आर्तीनें नव्हे तर स्वतःच्या उद्धाराच्या भावनेनें जिज्ञासू होऊन केशवराव आतां आला होता. त्याच्या पाठोपाठ त्याची आईसुद्धां तिथें आली. तिनें विनंति केली कीं, 'आपणच याला ब्रह्मकर्म शिकवून तो तसें वागूं लागला कीं मग आमच्या घरीं भिक्षा घ्यावी.' ही विनंति महाराजांनीं मान्य केली व सारंगपुरांत राहून केशवरावला संध्या, पूजा, वैश्वदेव इत्यादि नित्य ब्रह्मकर्म शिकवलें व त्याप्रमाणें तो वागूं लागला एवढेंच नव्हे तर नित्यकर्म केल्याशिवाय पाणीसुद्धां पिईनासा झाला. अर्थात् महाराजांनीं त्याच्या घरीं भिक्षा घेतली हें सांगायला नकोच.

असंख्य लोकांना महाराजांनीं ब्रह्मकर्माचें तसेंच याज्ञिकादि कर्मकांडाचें शिक्षण देलें आहे. त्यांच्या दिनचर्येचा विचार करतांना हें आपण पाहिलेंच आहे. त्याचप्रमाणें वेदवेदांगांचें शिक्षणहि त्यांनीं अनेकांना दिलें. कांहीं अधिकारी मंडळींना दुर्लभ, लुप्तप्राय अशा वेदविद्येचें दान केलें. उदाहरणार्थ पाथरीच्या चौधऱ्यांचे पुरोहित आप्पादेव व आण्णादेव यांना त्यांच्या दीर्घकाळच्या इच्छेप्रमाणें गोपेगांवीं अरण्यांत सतरा दिवस राहून लिंबाच्या झाडाखालीं आरण्यकांची संथा दिली. डाकोरला रामशास्त्री प्रकाशकर यांना एका वर्गाच्या

जटा, घन, पंचसंधि, माला, रथक्रम, दंडक्रम, इत्यादि विकृतींची संथा दिली. **ब्र.भू. पू. श्रीसीताराममहाराज** ह्या पूर्वाश्रमींच्या बंधूंकडून ब्रह्मावर्त येथें गायत्रीपुरश्चरण करून घेतलें तसेंच त्यांच्या कडून राजूर येथें एक संहितास्वाहाकारहि करून घेतला. कुरुगड्डीच्या चातुर्मासानंतर मराठवाड्याच्या भागांत संचार करतांना वीस स्वाहाकार, दोन चातुर्मास्य याग व दोन ठिकाणीं श्रीदत्तपादुकांची स्थापना अशीं कार्यें झाल्याचें वर्णन आहे. कुडुत्रीचे शंकरशास्त्री गुळवणी यांचे बंधू(**प.पू. योगिराज श्रीगुळवणीमहाराज**) यांच्याकडून औदुंबर येथें श्रीदत्तमालामंत्राचें अनुष्ठान करून घेतलें. तसेंच हावनूर येथील मुक्कामांत स्वामीमहाराजांनीं त्यांना श्रीविष्णुसहस्रनामाची व श्रीमद्भगवद्गीतेची संथा देऊन दहा दिवस संपूर्ण गीतेच्या अठरा अध्यायांवर पाठ दिले.

अशा रीतीनें कर्मयोगाच्या अधिकारी जिज्ञासू भक्तांना श्रीस्वामीमहाराजांनीं शास्त्रशुद्ध असें मार्गदर्शन तर केलेंच पण अत्यंत प्रतिकूल अशा कलिकाळांतहि त्या त्या साधकांकडून त्यांचीं संकल्पित कार्यें सुसंपन्न करून त्यांच्या पारमार्थिक प्रगतीला चालना दिली.

**अष्टांगयोगः**- चित्तशुद्धिसाठीं कर्मयोगांतर्गत उपासना व अनुष्ठानाप्रमाणेंच योगमार्गातील प्रक्रियांचीहि योजना आहे. निरनिराळ्या प्रकृतीच्या व परिस्थितीच्या साधकांना विविध उपासना परमेश्वरानें निर्मिल्या आहेत. त्यांत पतञ्जलीप्रणीत अष्टाङ्गयोग ही एक प्रमुख साधनपद्धती आहे. ह्या योगाचीं यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि आठ अंगें आहेत. यमनियम हे सर्व धर्मपंथांच्या व सर्व उपासनापद्धतींच्या आचारांना मूलभूत आहेत. म्हणूनच श्रीस्वामीमहाराज म्हणतात, '*भक्तिक्रियाज्ञानयोगान्मुक्तिरुक्तापि तत्त्रयम्। ज्ञेयं साष्टाङ्गयोगान्तर्गतं द्वैधमतोऽत्र नो।।*' भक्ति, कर्म आणि ज्ञान अशा तीन योगांना मुक्तिसाधनेंत गणलें आहे. त्या सर्वांचा समावेश एकाच अष्टांगयोगांत केला कीं मग वाद रहात नाहीं. अशा यमनियमांनीं आत्मनियमन(शिस्त) करून, आसनानें स्थैर्य प्राप्त करावें, प्राणायामानें दोषशोषण करावें, प्रत्याहारानें इन्द्रियजय, धारणेनें पापनाश व ध्यानसमाधींनीं आत्मैक्य साधावेत असें श्रीस्वामीमहाराज श्रीदत्तपुराणांत सांगतात(५:५:३-४). योग हा सर्व मानवजातीला भक्तिमार्गाप्रमाणेंच खुला आहे; पण योग्य मार्गदर्शक(सद्गुरु) नसेल तर इथें धोके फार आहेत.

श्रीस्वामीमहाराजांनीं अनेक साधकांना त्यांच्या अधिकारपरत्वें योगाचें

शिक्षण दिलें आहे. अगदीं प्राथमिक शुद्धिक्रियांपासून ते खेचरी मुद्रेपर्यंत सर्व योगप्रक्रियांची सिद्धि शिष्याच्या अधिकाराप्रमाणें करून दिलेली दिसते. त्यांच्या योगमार्गांतील शिष्यांपैकीं एक प्रमुख श्री. गांडाबुवा (**प.प. श्रीयोगानंद सरस्वती**) होत. तेलंगपूरचा हा गुजराती ब्राह्मण लहान वयांतच विरक्त होऊन सद्गुरूंच्या शोधांत नर्मदाकांठीं फिरत होता. लहानपणींच विवाह झाला असला तरी गृहत्याग करून एकटेच फिरत असल्यानें त्यांना ब्रह्मचारी म्हणत. आपल्याला ब्राह्मणच सद्गुरु लाभावेत अशी यांची इच्छा होती. पांडुरंगमहाराज या नर्मदाकाठच्या सत्पुरुषाच्या आज्ञेनें नेमावर येथें जपानुष्ठान करीत असतां त्यांना श्रीमहाराजांचा वृत्तांत कळाल्यानें ते शिनोर येथें श्रीमहाराजांकडे आले. ते येण्याआधींच महाराज रामशास्त्रींना म्हणाले होते कीं लवकरच एक भटकत फिरणारा अक्षरशत्रु मनुष्य येणार ! गांडाबुवा आल्यावर प्रथम आठ दिवस महाराज त्यांच्याशीं बोललेच नाहींत. गांडाबुवा मात्र रोज सकाळीं स्नान करून पहांटेच येऊन महाराजांच्या मुक्कामावर येऊन एका बाजूला बसून रहात. महाराज भिक्षेला निघाले कीं यांनींहि जाऊन कोठें तरी जेवण उरकून यावें व महाराज येण्याच्या आंत येऊन बसावें. शेंवटीं महाराजांनीं त्याला विचारलें, 'येथें तू कां बसून राहतोस?' त्यावर 'हेच समर्थ पाय माझा उद्धार करतील अशा विश्वासानें मी या पायांजवळ शरण आसों आहे' असें विनवून त्यानें आपली हकीकत महाराजांना सांगितली. कांहीं दिवस महाराजांच्या सहवासांत गेल्यावर एके दिवशीं त्यांना घेऊन महाराज निकोदा या गांवीं गेले व तेथें त्यांना योगाभ्यासाची दिशा दाखवून तिथल्या शंकराच्या देवळांत योगाभ्यास करायची आज्ञा दिली व 'श्रद्धेप्रमाणें शंकरपरमात्मा तुला फळ देतील ' असा आशीर्वाद देऊन महाराज पुढें निघून गेले. नंतर कांहीं दिवसांनीं गांडाबुवा दर्शनास आल्यावर महाराजांनीं त्यांना प्रथम आईवडिलांची क्षमा मागून व त्यांची प्रेमानें आज्ञा घेऊन चातुर्मासाचे वेळीं द्वारकेस आपल्याला भेटण्याची आज्ञा केली.

त्याप्रमाणें गांडाबुवा द्वारकेस आले व त्यांच्या आईवडिलांनीं परवानगी देतांना घातलेल्या अटी महाराजांना निवेदन केल्या त्या अशा - त्यांच्या मृत्यूच्या वेळीं जवळ राहणें, त्यांचें और्ध्वदैहिक करणें व गांडाबूवांच्या मुलीचें लग्न लावून देणें. 'कांहीं हरकत नाहीं. श्रद्धेप्रमाणें कार्यसिद्धि होऊन जाईल' असा आशीर्वाद महाराजांनीं दिला. पुढें दोन वर्षांनीं गांडाबुवांना गुणा छावणीच्या डॉ. विश्वनाथराव ताटके यांच्याकडे जिह्वाछेदनासाठीं पाठविलें. महाराजांच्या कृपेनें

तें उत्तम पार पडून गांडाबुवांना खेचरीमुद्रा सिद्ध झाली. महाराजांच्या आज्ञेशिवाय डॉ.ताटके यांच्याकडे जिह्वाछेदन करून घेण्याऱ्या दोघां साधकांना मात्र त्या शस्त्रक्रियेच्या वेळीं भयंकर रक्तस्राव होऊन महाराजांना तार करून बोलावून घ्यावें लागलें. महाराजांनीं त्यांचें तें संकट वनस्पतीच्या प्रयोगानें निवारूनहि जिह्वाछेदन मात्र पुढें होऊं शकलें नाहीं.

यावरून योगाभ्यासाकरितां समर्थ सद्‌गुरूंच्या आश्रयाचें नितांत महत्त्व स्पष्ट होतें. गांडाबुवा महाराजांच्या संचारांत बऱ्याच वेळां बरोबर असत. त्यांच्याकडूनहि महाराजांनीं एक लक्ष गायत्रीचा जप करून घेतला होता. संन्यासानंतर ह्यांचें नांव **प.प. श्री योगानंद सरस्वती** असें झाले. ह्यांची समाधि मराठवाड्यांत गुंज येथें आहे.

वठार(कोल्हापूर) या गांवचे **नरहरी दिवाण** यांना त्यांचे गुरू नरहरीमहाराज यांनीं योगाभ्यास शिकण्यासाठीं श्रीस्वामी महाराजांकडे पाठविलें. महाराजांनीं त्यांना योगाभ्यासाची माहिती देऊन पैठण येथें जाऊन त्याप्रमाणें अभ्यास करण्यास सांगितलें. तेथें एका अग्निहोत्रीबुवांच्या आग्रहानें ते संस्कृत शिकूं लागले. पुढें ते महाराजांच्या दर्शनाला आल्यावर महाराजांनीं त्यांना तो नाद सोडून 'सांगितलेला अभ्यास करून मोक्षलाभ करून घे' असें बजावलें. हेच दिवाण पुढें **अष्ट्याचे दत्तमहाराज** म्हणून प्रसिद्ध झाले. ते दत्तपुराण व दत्तमाहात्म्य यांवर पुराण सांगत असत.

श्रीस्वामीमहाराज यांच्या आणखी काहीं योगमार्गातील अधिकारी शिष्यांत **श्रीसीताराम महाराज टेम्बे**, **योगिराज श्रीगुळवणीमहाराज**, **श्रीरंगअवधूत महाराज**, श्री. बाळासाहेब वैद्य, भेलसा येथील श्री. गोविन्दमहाराज पंडित अशीं काहीं नांवें उल्लेखनीय आहेत. श्रीगुळवणीमहाराजांनीं हठयोगाचा पूर्ण अभ्यास केला होता व त्यांना खेचरी मुद्रा सिद्ध होती. यांनीं श्रीस्वामीमहाराजांच्या समाधीनंतर त्यांच्याच आज्ञेनें बंगालचे सुप्रसिद्ध संन्यासी प.प. श्रीलोकनाथतीर्थ (त्या वेळीं स्वामी चिन्मयानन्द) यांच्याकडून शक्तिपातविद्या ग्रहण केली व भारतभरच नव्हे तर विश्वभर त्या विद्येचा प्रसार केला व करीत आहेत.

**ज्ञानयोग:** - वेदांतशास्त्राच्या संप्रदायनिष्ठ अनुशीलनानें आत्मसाक्षात्कार करून घेण्यालाच ज्ञानयोग म्हणतात. अर्थात् वेदांतशास्त्रांत साधक अधिकारी (eligible) साधनचतुष्टयसंपन्न असावा लागतो. नित्यानित्यावस्तुविवेक (विचार), इहामुत्रभोगविराग (वैराग्य), शमादि षट्क

(शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा व समाधान) आणि तीव्र मुमुक्षा हीं चार साधनें ज्यानें जन्मजन्मांतरींच्या तपाचरणानें प्राप्त केलीं आहेत तोच वेदान्तश्रवणाचा अधिकारी होय. अनधिकाऱ्यावर वेदान्तश्रवणाचा विपरीत परिणाम होऊं शकतो. सावंतवाडीला पूर्वाश्रमांत महाराजांच्याकडे एक ब्राह्मण आला होता. तो क्षयरोगानें पीडित असून सर्व उपाय थकल्यावर एका सद्गृहस्थाच्या सांगण्यानें त्यानें गुरुचरित्राचें वाचन सुरूं केलें होतें. त्यानें त्याची प्रकृति बरीच सुधारली. पण पुढें तो वेदान्ताचें श्रवण करूं लागला; पण तो अनधिकारी असल्यानें त्या श्रवणाचा प्रतिकूलच परिणाम होऊन कर्माविषयीं अश्रद्धा झाली आणि त्यानें सर्व आचार सोडला. त्यानें त्याच्या क्षयानें पुनश्च उचल खाल्ली. त्यावर उपाय विचारायला तो महाराजांकडे आला. महाराजांनीं त्याची ब्राह्मण जातींत जन्मूनहि वेदान्ताच्या मागें लागून सर्व नित्यकर्में टाकल्याबद्दल निर्भर्त्सना करून त्यानेंच देवांची अवकृपा होऊन क्षयानें जोर धरला आहे असें सागितलें. शेंवटीं 'आतां तुम्ही तुम्हांला वेदान्त सांगणाऱ्या गुरूकडे जाऊन निरोगी व्हा' असा निरोप दिला. निराश झालेला तो ब्राह्मण परत गेला व कांहीं दिवसांतच मरण पावला. तेव्हां ज्ञानयोग हा सर्वांसाठीं नाहीं. आपल्या सर्व साधुसंतानीं वेदान्ताच्या सार्वजनिक प्रसाराला विरोध दर्शविला आहे. सध्यां वेदांताच्या नांवाने अनाचाराचा प्रसार दिसतो.

वरीलप्रमाणे अधिकार संपादन करून, श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सद्गुरूंना शरण जावें व वेदान्ताचें - मुख्यतः चार महावाक्यांचें **श्रवण** करावें असें शास्त्र सांगतें. ह्यानें परोक्ष ज्ञान होतें व संशय व **असत्त्वावरणा**चा (ईश्वर असूंच शकत नाहीं असा भ्रम) क्षय होतो. त्यानंतर केलेल्या श्रवणाचें **मनन** करून **अभानावरण** (ईश्वर असला तरी भासत नाहीं) क्षीण करावें. त्यानंतर त्याच महावाक्यार्थाचें ध्यान म्हणजे निदिध्यासन करून त्याच्या परिपक्वावस्थेंत मन ध्येयाकार झालें कीं समाधि अर्थात् साक्षात्कार असा साधारण क्रम आहे. साक्षात्कारानंतरहि ज्ञानाच्या दृढीकरणासाठीं वासनाक्षयादि अभ्यास सांगितलें आहेत. अर्थात्च ह्या मार्गाचे अधिकारी विरळाच.

श्रीमहाराजांकडून वेदान्ताचें श्रवण करण्याचें महद्भाग्य ज्यांना लाभले त्यांत बडेद्याच्या **श्री. रामशास्त्री प्रकाशकरां**चें स्थान विशेष आहे. हे आपल्या मामांकडे शिनोरला अध्ययनासाठीं रहात होते. वयाच्या अठराव्या वर्षी प्लेगच्या साथींत पितृछत्र हरपल्यावर रामशास्त्रींना नैराश्यानें ग्रासलें व गृहत्यागाकडे प्रवृत्ती झाली. तेव्हां स्वप्नांत एक संन्यासी येऊन त्यांना बोलले, 'तुझ्या जाण्यानें

मातोश्रींना किती दुःख होईल हा विचार तूं केलास काय? कर्दमऋषि वनांत निघून गेले तरी कपिलमुनींनीं आपल्या मातेला सोडून न जातां तिला अध्यात्मोपदेश करून शोकरहित केलें. (*मात्रे अध्यात्मनिवेदनम्*.)' स्वप्नांतच रामशास्त्री विचारतात, '*किं तदध्यात्मम्?*' संन्यासी:- '*जीवब्रह्मणयोरैक्यप्रतिपादनम्*।(जीव व ब्रह्म यांच्या ऐक्याचें प्रतिपादन)' रामशास्त्री, '*तदहं कथं विजानीयाम्*।( तें मला कसें समजेल?)' यावर तें तुला वर्षाच्या आंत समजेल असें आश्वासन देऊन ते संन्यासी अदृश्य झाले. यानंतरहि ते संन्यासी रामशास्त्रींच्या स्वप्नांत वरचेवर येऊन आज्ञा करीत असत व त्याप्रमाणें न वागल्यास शिक्षाहि करीत. अशा ह्या रामशास्त्र्यांना उपदेश करण्यासाठींच महाराज देवांचे आज्ञेनेंच शिनोरला येऊन राहिले होते. प्रथम भेटींत रामशास्त्री तरुण वय व ताठा असल्यानें महाराजांशीं मर्यादेनें वागले नाहींत व महाराजांनींहि त्यामुळें त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें. पुढें कांहीं हितचिंतकांच्या आग्रहानें रामशास्त्री पुन्हां महाराजांकडे आले. अजूनहि त्यांचें औद्धत्य कायमच होतें. महाराजांनीं त्याच्या अध्ययनाची चौकशी करतां वेदाध्ययन, काव्यादि झालें असून आपण सध्यां एका ठिकाणीं भागवत सांगत असल्याचें रामशास्त्री बोलले. तेव्हां महाराजांनीं भागवताचा पहिलाच श्लोक '*जन्माद्यस्य यतोन्वयात्*' हा श्लोक सांगायला सांगितलें. मग मात्र रामशास्त्रींना आपल्याला वेदान्ती श्लोकांचें विवेचन करतां येत नसल्याचें मान्य केलें. यावर महाराज म्हणाले, 'अरे ! मुख्य समजलें नाहीं तर भागवतवाचनाचा उपयोग काय?' हें ऐकून रामशास्त्रींना पुन्हां राग आलेला पाहून शांतपणें महाराजांनीं 'मात्रे अध्यात्मनिवेदनम्' इत्यादि स्वप्नांतील संस्कृत संवाद म्हटला. त्याबरोबर वर्षापूर्वीं पडलेल्या स्वप्नाची आठवण येऊन व हेच ते संन्यासी अशी ओळख पटून, उपरति होऊन कंठ दाटून आला, अंगावर रोमांच उभे राहिले आणि नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. एकदम उठून त्यांनीं महाराजांना साष्टांग नमस्कार घातला. दुसरे दिवशींपासून रामशास्त्रींच्या अध्ययनास सुरुवात झाली. दोघांचा सर्व दिवस त्यांतच जाई. त्या मुक्कामांत पंचदशी व भागवत याचा अभ्यास झाला. जातांना महाराजांनीं पाणी पिण्याची आपली नरोटी, लक्ष्मीसूत्र, कटिसूत्र रामशास्त्रींना दिलें. द्वारकेच्या चातुर्मासानंतर पुन्हां एकदां महाराज शिनोरला आले होते व तीन महिने तिथें राहिले होते. शेंवटीं महाराजांनीं दिलेल्या आश्वासनाप्रमाणें गरुडेश्वरला रामशास्त्री गेले होते व शेंवटपर्यंत

महाराजांजवळ राहिले होते.

नरसोबावाडीजवळ शिरोळ येथील **शंकरराव कुळकर्णी** घरची स्थिति उत्तम असूनहि लहान वयांतच विरक्त झाले. संतवाङ्मयाचें वाचन बरेंच केलें. एकदां काशीस जाणें झालें असतां त्यांना योगाभ्यासाची इच्छा झाली व तारकमठांत महाराजांच्या जवळ राहिलेले प्रज्ञानानंद सरस्वती यांच्याकडून स्वामीमहाराजांचें नांव समजलें. लगेच ब्रह्मावर्तास येऊन महाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांनीं इच्छा त्यांच्या कानांवर घातली. महाराजांनीं त्याच्या इच्छेला अनुसरून त्यांना षट्क्रिया शिकविल्या. नंतर त्यांना सांगितलें कीं 'खरा आनंद वेदान्ताच्या अभ्यासावांचून मिळणें शक्य नाहीं; पण वेदान्तग्रंथ संस्कृतमध्यें आहेत' तेथें शंकरशास्त्री दर एकादशीस, महाराजांनीं लिहून दिलेल्या वेदान्तपर आख्यानांवरून कीर्तन करीत. शंकररावांनीं महाराजांच्या जवळ राहून संस्कृत शिकण्याची तयारी दर्शविली. पण त्यासाठीं महाराजांनीं त्यांना नारायणशास्त्री एकसंबेकर याच्याकडे पाठविलें. तेथें संस्कृत शिकून वेदाध्ययन केलें व कांहीं शास्त्राभ्यासहि झाला. याच काळांत महाराजांनीं त्यांना स्वहस्तें लिहिलेली ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी श्री दीक्षित महाराजांमार्फत पाठविली होती. कालांतरानें शंकरशास्त्री शृंगेरीला गेले व न्याय-वेदान्तादि शास्त्राभ्यास करून परत आले. थोड्याच दिवसांत त्यांना संकेश्वरच्या जगद्गुरुपीठावर बसण्याचा योग आला. महाराजांनीं ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी देण्यांत हाच योग ध्वनित केला अशी यांची श्रद्धा ते वारंवार बोलून दाखवीत असत.

**ॐकारोपासना:** - **ॐ** हें एक अक्षरच ब्रह्मस्वरूप असून त्याचा परमेश्वरस्मरणपूर्वक उच्चार करून प्राण त्यागणारा उपासक परमपद पावतो, एवढेंच नव्हे तर अज्ञसुद्धां संसारबंधनांतून मुक्त होतो हा औपनिषद सिद्धान्त महाराजांनीं दत्तपुराणांत (५:७:७-१४) प्रतिपादला आहे. त्यानंतरच मृत्यूच्या चिह्नांचें निरूपण आहे. पूर्वी ज्या दोघांना खेचरीमुद्रा सिद्ध झाली नसल्याचें आलें आहे, त्यांपैकीं आप्पा निगडीकर हा ब्राह्मण महाराजांबरोबर त्यांच्या आज्ञेविरुद्ध ब्रह्मावर्ताला येऊन राहिला होता. पुढें तेथें प्लेगची साथ सुरूं झाली व आप्पाला प्लेग होणार असें महाराजांनीं देवांचें सांगणें झालें. तेव्हां महाराजांनीं त्यांना प्रत्यक्ष न सांगतां मृत्यूचीं चिह्नें फक्त सागून ठेवली. आप्पाला तीं चिह्नें दिसूं लागतांच त्यानें महाराजांना आपल्याला संन्यास घेण्याची इच्छा असल्याचें सांगितलें. लगेच महाराजांनीं त्याला आतुर संन्यास देऊन त्याच्याकडून प्रेषोच्चार करवून घेतला. शेंवटीं दीर्घप्रणवाचा उच्चार

करीत असतांच आप्पांनीं देह ठेवला. त्या वेळीं लिहिलेल्या एका पत्रांत महाराजांनीं 'हें मरण योग्यांनासुद्धां दुर्मिळ' असे उद्‌गार काढले आहेत.

**संन्यासमार्ग:** - वरील उदाहरणांत स्वामीमहाराजांनीं आप्पांना अंतकाळीं आतुर संन्यास दिल्याचें दिसतें; एरवीं मात्र महाराजांनीं कुणालाहि संन्यास दिल्याचें आढळत नाहीं. शके १८३०त सीताराममहाराजांना हरिहर येथें संन्यास घेण्याबद्दल दृष्टांत झाल्यानें ते कोगूर येथें महाराजांकडे आले व तेथील महाराजांचे भक्त ब्रह्मानंद सरस्वती यांच्यामार्फत ही गोष्ट त्यांच्या कानावर घातली. महाराजांनीं गीतेंतील '*उद्धरेदात्मनात्मानं*' या श्लोकाच्या माध्यमांतून आपला नकार कळविला. अनधिकारी व्यक्तीला संन्यास देण्याच्या ते विरुद्ध होते. तीव्र मुमुक्षा, प्रखर वैराग्य व नितांत गुरुभक्ति असेल तरच तो खरा संन्यासाचा अधिकारी होय. मंडलेश्वरला महाराज असतांना तेथें गुरुस्वामी (श्रीनारायणानंद सरस्वती) येऊन राहिले होते. त्यांच्याबरोबर त्यांचे एक शिष्य होते. घरांतून भांडून आल्यावर त्यांना गुरुस्वामींनीं संन्यास दिला होता. एकदां भिक्षेहून येतांना एका गृहस्थाची माळच त्यांनीं चोरून आणली. तेव्हां महाराज म्हणाले, 'अनधिकारी माणसाला संन्यासदीक्षा दिली असतां अशी स्थिति होते. अशा माणसाला तुरुंगांत घालावें.'

**श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामीमहाराज:**- नृसिंहवाडीच्या परिसरांतील सदलगा या गांवचे श्री. नारायण लक्ष्मण दीक्षित यांना त्यांच्या वडिलांनीं लहानपणींच पूर्वाश्रमींच वाडी येथें महाराजांच्या स्वाधीन केलें होतें. महाराजांनीं संध्येपासून सर्व नित्यकर्म तर नारायणाला शिकवलेंच पण गीता, विष्णुसहस्रनाम, स्वशाखोपनिषद् रुद्र, पुरुषसूक्त इ. अभ्यासहि करून घेतला. नारायणाची सात्त्विक वृत्ती पाहून त्याला वासुदेवमननाच्या रूपानें वेदान्तशास्त्राची ओळख करून दिली. पुढें यथाकाल नारायणाचा विवाह झाला. तेव्हांहि घरची उत्तम स्थिति असूनहि दीक्षितशास्त्रींनीं महाराजांच्या आज्ञेनें शुक्लवृत्ति (कोरान्न भिक्षा मागणें) धारण केली. गृहस्थधर्म यथाशास्त्र आचरून वडिलोपार्जित इस्टेट सत्पात्र ब्राह्मणांना दान देऊन संपविली. कांहीं काळानंतर त्यांनीं शुक्लवृत्तीचाहि त्याग करून त्याहून खडतर अयाचित वृत्ती स्वीकारली. यानंतर प्लेगच्या साथींत पत्नी, मुलगी व मुलगा असें सर्व कुटुंबच बळी पडलें व स्वतः दीक्षितशास्त्रींनाहि प्लेग झाला. त्यावेळीं मरणोन्मुख अवस्थेंत त्यांनीं आतुर संन्यास घेतला. महाराजांच्या कृपेनें ते त्या आजारांतून उठले. ह्या

घटनेनंतर त्यांना सद्गुरुदर्शनाची अत्यंत ओढ लागून ते त्या अशक्त अवस्थेंतच स्वामीमहाराजांचा शोध घेत निघाले. ब्रह्मावर्तापर्यंत जाऊन तिथून महाराज निघाले असल्यानें त्यांचा माग काढीत दीक्षितस्वामी भेलसा येथें त्यांना भेटले. महाराजांनीं त्यांना आश्रमधर्माप्रमाणें दंड घेऊन ब्रह्मचिंतन करीत राहायला सांगितलें. तेव्हा आपल्याकडूनच दंड घेण्याची त्यांची इच्छा दीक्षितस्वामींनीं महाराजांच्या कानांवर घातली. महाराजांनीं त्याना वाडीला परत जाऊन दत्तप्रभूची प्रार्थना करूत राहण्याची आज्ञा दिला व आपणहि वाडीलाच येत असल्याचें सांगितलें. त्यानंतर महाराज वाडीला आले. प्रथम महाराजानीं दत्तप्रभूंचा आज्ञा नसल्यानें दंड देण्यास नकार दिला. पण रात्रभर तळमळत्या अंतःकरणानें सतत अश्रू ढाळीत, उभ्यानेंच मूक पण आर्त प्रार्थना करीत दीक्षितस्वामींनीं व्यतीत केली. इकडे दत्तप्रभूंनीं महाराजांना ही कठोर परीक्षा आवरती घेण्याची व त्यांना दंड देण्याची आज्ञा केली. पहांटे उठून स्वामीमहाराजांनीं 'स्वामी ! तुम्ही रात्रभर येथेंच उभे आहांत? बरें तर जा आतां, तुमच्या इच्छेप्रमाणें दंडधारणाची तयारी करा.' अशा शब्दानीं दीक्षित स्वामींना आनंदित केलें. अर्थात् दंडधारणेचा विधि यथाशास्त्र पार पडला व 'नृसिंहसरस्वती' हा योगपट्ट त्यांना महाराजांनीं दिला. संन्यासधर्माचें सर्व सविस्तर शिक्षणहि महाराजांकडून दीक्षितस्वामींना मिळालें. पुढें वाडींत राहूनच श्रींची पूजा, उत्सव इत्यादि देवकार्य करीत राहायला सांगितलें. स्वामीमहाराजांना दीक्षितस्वामींचा फार अभिमान होता. त्यांची योग्यता आपल्यापेक्षांहि अधिक असल्याचें ते सांगत. बरींच वर्षें वाडींत राहिल्यावर सद्गुरूंची आज्ञा संपादन करून तीर्थयात्रेच्या निमित्तानें त्यांनीं वाडी सोडली. वाडीसमोरच कृष्णेच्या पैलतीरावर त्यानीं 'श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ' ही संस्था स्थापन केली. हेच ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर यांचे सद्गुरु होत. त्यांच्या पुढाकारानें अलीकडे ह्या पीठाचें बांधकाम झालें आहे व दीक्षितस्वामींच्या संकल्पाप्रमाणें कृष्णेवर घाटहि बांधून झाला आहे. दीक्षितस्वामींची समाधि अयोध्या येथें आहे.

# प.प.श्री.वासुदेवानन्दसरस्वती स्वामीमहाराज यांच्या जीवनांतील ज्ञानी सत्पुरुष.

**'प्रसन्नात्मानः प्रशान्ता निर्बन्धा द्वैतवर्जिताः।**
**स्वात्मारामाश्चरन्त्यत्र जडोन्मत्तपिशाचवत्'**

(द्विसाहस्री ९:५४)

ह्या शब्दांत ज्ञानी पुरुषांचे वर्णन प.प. श्री.वासुदेवानंदसरस्वती(टेम्बे)स्वामी महाराज करतात. परमेश्वरी साक्षात्काराच्या परिपाकाने ज्यांनी द्वैत टाकले आहे - अर्थात्च ज्यांना स्वात्मभिन्न म्हणजेच स्वतःपेक्षा वेगळे असे कुणीहि, कांहीहि भासतच नाही, त्यामळेच घृणा-लज्जा-भय-शङ्का-जुगुप्सा-कुल-शील-जाति हे अष्टपाश(बंध) ज्यांचे गळून पडले आहेत, हृदयग्रंथीच्या भेदामुळे संशयरहित झालेले ज्यांचे अतःकरण साहजिकच सदैव प्रसन्न असते, रागादिविकारांच्या आत्यंतिक अभावामुळे जे प्रकर्षाने शान्त आहेत, आत्मानुभूतींतच रममाण झालेले हे कृतकृत्य महापुरुष जड, उन्मत्त वा पिशाचवत्, ह्या भूलोकावर (प्रारब्ध आहे तोंवर) संचार करतात. यांतहि योगवासिष्ठांत चार भूमिका सांगितल्या. ज्ञानाच्या सप्तभूमिकांपैकी शुभेच्छा, विचारणा आणि तनुमानसा ह्या पहिल्या तीन भूमिका साधकाच्या असून सत्त्वापत्ति, असंसक्ति, पदार्थाभाविनी आणि तुरीया ह्या उत्तरोत्तर श्रेष्ठ ज्ञानभूमिका आहेत. सत्त्वापत्ति ह्या प्रथम ज्ञानभूमिकेत, साधकाला प्रपञ्च स्वप्नवत् भासतो. ह्याला ब्रह्मविद् ही संज्ञा आहे. पुढच्या ज्ञानभूमिकेत (असंसक्ति) प्रपञ्चाविषयीं हा ज्ञानी निद्रिस्त असतो तरी तो स्वतः "जागा" होऊं शकतो.(स्वतो उत्थान). ह्याला ब्रह्मविद्वर म्हटले आहे. पदार्थाभाविनी ह्या भूमिकेत प्रपञ्चाविषयीं गाढ निद्रा असून दुसऱ्याच्या प्रयत्नानेच त्याला बाह्य जगताचे भान होऊं शकते. तूरीयावस्थेंतील ज्ञानी सतत ब्रह्मनिमग्न असल्याने त्याला स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या द्वाराहि जगाचे भान होऊं शकत नाही. ह्यांची ओळख पटणे सर्वसामान्य लोकांना त्यांच्याच (किंवा ईश्वराच्या) कृपेशिवाय अशक्य आहे.

जन्मसिद्ध कोटींतील स्वामीमहाराजांच्या जीवनांत असे सत्पुरुष बालपणापासूनच येत गेलेले दिसतात. अर्थात् त्यांच्या आणि श्रीस्वामीमहाराजांच्या परस्परसंबन्धांचे आकलन हे इतरांना मर्यादित स्वरूपांतच होऊं शकते. 'साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले। सर्व मिळोनी एक

जाहले। देहातीत वस्तु।।' ह्या समर्थोक्तीप्रमाणे एकरूप झालेल्या संत-सत्पुरुषांच्या गांठीभेटीचा अन्वयार्थ आम्हां प्रापञ्चिकांना आकळणे कठिणच. बाह्य घटनांवरून व अनुमानाने थोडा फार बोध होईल व क्वचित् श्रीस्वामीमहाराजांनी कुणाला कांही सांगितले असेल तर त्यांत भर पडेल. तरीहि ह्या संबंधांचा विचार साधकांना अत्यंत उपकारक ठरेलच या भावनेने हा प्रपञ्च केला आहे.

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम्।।**

श्रीमद्‌भगवद्‌गीता ६:४४२

ह्या भगवदुक्त्यनुसार पूर्णकाम योगभ्रष्टाचा जन्म ज्ञानी योग्याच्या कुळांत होतो. श्रीस्वामीमहाराजांचा जन्म अशाच कुळांत झालेला होता. उपजीविकेच्या शोधांत माणगांवीं आलेल्या वे. हरिभट्ट टेम्बे यांना वे. सीतारामभट कोनकर यांच्याकडे आश्रय मिळाला. विद्वत्ता, सदाचार, उत्तम हस्ताक्षर आदि सद्‌गुणांनी हरिभटजी माणगांवीं लोकप्रिय होऊन स्थायिकच झाले. कोनकरांचा व त्यांचा घरोबा वाढत जाऊन कोनकरांच्या प्रथम पत्नींच्या मृत्यूनंतर हरिभटजींनी आपली काशी नांवाची मुलगी त्यांना देऊन या ऋणानुबंधाला नात्याचे रूप देले. कोनकरांची एकुलती एक मुलगी येसूबाई त्यांनी हरीभटजींच्या ज्येष्ठ चिरंजीवांना- म्हणजेच गणेशभटजींना दिली. लग्नानंतर त्यांचे नांव सौ. रमाबाई झाले. **वे. गणेशभटजी** व सौ. रमाबाई हेच श्रीस्वामीमहाराजांचे मातापिता होत. वे. गणेशभटजी हेच श्रीमहाराजांच्या जीवनांतील पहिले ज्ञानी पुरुष मानायला हरकत नाही.

वृत्तीने अत्यंत सात्त्विक व स्वभावाने भोळे अशा गणेशभटजींची वृत्ति बालपणापासूनच श्रीदत्तचरणीं रमलेली होती. त्यामुळे प्रपंचाकडे यांचे फारसे लक्ष नव्हते. त्यांत अपस्माराचा(फीट) विकार असल्याने त्यांची विरक्ति अधिकच तीव्र झाली. ते वरचेवर गाणगापुरी जाऊन सेवा करीत. दृष्टांत झाला की परत घरीं येत. घरच्या मंडळींना यांचे सारखें परगांवी दूर एकटे जाणे चिंताजनक होई. त्यांनी कांही सांगितले तर हे म्हणत 'सर्वांच्या जीवनाचा व मरणाचा काळ ठरला आहे. आपल्या काळजीने वा निष्काळजीने त्यांत कांहीच फरक होत नाही.' ह्या त्यांच्या निश्चयाच्या बोलण्यापुढें कुणाचे चालत नसे. तरुण वय, घरीं 'सगुण सुंदर अनुकूल' अशी पतिव्रता पत्नी असूनहि ह्याचे चित्त

श्रीदत्तचरणींच असे. एकदां तर सतत बारा वर्षें गाणगापूरला यांचे वास्तव्य झाले. या सेवेने प्रसन्न झालेल्या श्रीदत्तप्रभूंनी त्यांना घरीं जाऊन राहण्याचा व इतःपर गाणगापुरीं न येण्याचा आदेश दिला. यानंतरच शके १७७६ आनंद संवत्सरीं श्रावण कृ।।५ च्या सायंकाळीं श्रीस्वामीमहाराजांचा जन्म झाला.

गणेशभटजींची अत्यंत सात्त्विक वृत्ती असल्याने ते घरांत पाहुण्यासारखेच रहात. 'गृहेष्वतिथिवद्वसेत्' या उक्तीचा जणूं वस्तुपाठच ते होते. जेवतानाहि चुपचाप, खालच्या मानेने जेवत. त्यांना हवें नको ते वाढणाऱ्यानेच ओळखून वाढावें. त्यांची 'विधिवशात् प्राप्तेन संतुष्यताम्' अशीच वृत्ती होती. 'निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी' असा भगवद्भक्ताचा आदर्शच श्रीस्वामीमहाराजांच्या समोर बालवयांतच होता. श्रीदत्तभक्तीचे बाळकडूहि श्रीमहाराजांना आपल्या ह्या ज्ञानी पित्याकडून मिळाल्याचे दिसते. मुंजीनंतर लगेच नित्य श्रीगुरुचरित्रपठणाचा नियम श्रीमहाराजांनी केला तोहि आपल्या दत्तभक्त पित्याच्या प्रेरणेनेच असे समजायला हरकत नाही.

श्रीमहाराजांचे वय २३ असतांनाच श्रीगणेशभटजींनी देह ठेवला (भा.कृ।।२, शके १७९९). अंतसमयीं त्यांनी माणगांवांतील एका प्रतिष्ठित व्यक्तीला मुद्दाम बोलावून आपण थोड्याच वेळांत मरणार असल्याचे सांगीतले व तोंपर्यंत तेथेच थांबून आपल्या मृत्यूनंतर कुणालाहि रडूं देऊं नये असे त्याच्याकडून कबूल करून घेतले. तरीहि ऐन वेळीं ते गृहस्थ कांही कामाकरितां बाहेर गेल्याने, गणेशभटजींनी प्राण सोडला व घरांत रडारड सुरूं झाली. ती ऐकून तो गृहस्थ पळतच परत आला. एवढ्यांत गणेशभटजींनी डोळे उघडले व त्याला ऐन वेळीं कसा गेलास असे विचारले व आतां तरी जाऊं नकोस असे सांगून शांतपणे देहत्याग केला. ज्ञानी पुरुषाचे मृत्यूवरहि नियंत्रण असते हेच यावरून सिद्ध होते.

पूर्वाश्रमीं श्रीमहाराज एकदां मातुःश्रीबरोबर नाशिकला गेले होते. तेथे त्यावेळीं प्रसिद्ध असलेले साधु **देवमामलेदार** यांच्या दर्शनाला गेले असतां त्यांनी श्रीमहाराजांच्या शिक्षणाची चौकशी केली. आपण कांहीच शिकलों नाही असे महाराजांचे बोलणे ऐकून त्यांच्याकडे एक दृष्टिक्षेप करून देवमामलेदारांनी तेथील मंडळींना सांगितले की 'हे सर्व शिकलेले आहेत; यांचा अधिकार मोठा आहे.' असे बोलून त्यांनी महाराजांना कांही दक्षिणाहि देऊं केली; पण ती

महाराजांनी स्वीकारली नाही.

श्रीमहाराज जेव्हां प्रथम वाडीला गेले तेव्हां वाटेंत बोरगांव मुक्कामीं त्यांना श्रीदत्तप्रभूंचा दृष्टांत झाला की, "नरसोबाचे वाडीस **श्रीगोविंदस्वामी** म्हणून मोठे अधिकारी पुरुष आहेत. त्यांचे दर्शन घ्या." वाडीला पोंचल्यावर श्रीपादुकांचे दर्शन घेऊन महाराज गोविंदस्वामींची चौकशी करत होते एवढ्यांत ब्रह्मानंदाच्या मठांतून खालीं येऊन श्रीगोविंदस्वामीच अगदीं जुनी ओळख असल्यासारखें महाराजांना विचारूं लागले, "काय वासुदेवशास्त्री? केव्हां आला? चला माडीवर, स्नान वगैरे करून या." विस्मित झालेल्या महाराजांनी त्यांना आदराने नमस्कार केला. हे गोविंदस्वामीच महाराजांना पुढें गुरुस्थानी झाले व त्यांच्याकडून त्यांना श्रीदत्तोपासना मिळाली. प्रथम वाडीला महाराजांचा वेषावरून न ओळखतां आल्याने पुजाऱ्यांनी पादुकांवर पाणीसुद्धां घालूं दिले नाही. तेव्हां खिन्न झालेले महाराज वर येऊं लागतांच श्रीदत्तप्रभूंनी पोथी वाचत असलेल्या गोविंदस्वामींना त्यांच्या मदतीला पाठविले. पोथी थांबवून गोविंदस्वामी महाराजांच्या हातांत आपला दंड देऊन त्यांना घेऊन मंडपांत आले व महाराजांना श्रीपादुकांवर पाणी घालायला लावले. महाराजांना अपरात्री देवाजवळ येण्याबद्दल दरडावणारे संन्यासी साक्षात् श्रीमन्नृसिंहसरस्वतीच होते हेहि महाराजांना गोविंदस्वामींनीच सांगितले.

सुरुवातीला गोविंदस्वामींनी महाराजांना पंचायतनपूजेबरोबर दत्तपादुकांचीहि पूजा करायला सुचविले; पण महाराजांनी त्याकडे दुर्लक्ष केले. मात्र पुढें देवांनीच दृष्टांत दिल्यावर तो नियम त्यांनी सुरूं केला. अशा रीतीने महाराजांची गोविंदस्वामींवर अधिकाधिक श्रद्धा वाढली.

पुढें चांद्रायण व्रत पार पडल्यावर महाराज पुन्हां वाडीला आले. त्यावेळीं गोविंदस्वामींनी त्यांना श्रीदत्तोपासना स्वीकारण्यास सांगितले. तरीहि 'अग्नि व सूर्य ही ब्राह्मणांची नित्य उपासना आहेच. निराळी काय करायची? ' असे महाराजांचे मत पडले. पण त्याच रात्रीं प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंनीच महाराजांना मंत्रोपदेश केला. श्रीगोविंदस्वामींनी हे जाणून लगेच झोंपल्या जागेवरूनच विचारले, "शास्त्रीबुवा, मंत्र मिळाला ना? आतां याचे सर्व सांग विधान उद्यां तुम्हांला सागूं." यानंतर मात्र महाराजांची गोविंदस्वामींवर पूर्ण श्रद्धा बसून ते त्यांना आपले गुरु मानूं लागले. गोविंदस्वामींनी त्यांना उपनिषद्भाष्य रोज

नियमाने वाचण्यास सांगितले.

पुढें श्रीदत्ताज्ञेने माणगांव सोडून वाडींत राहिले. त्यावेळीं गोविंदस्वामींनी महाराजांना दशोपनिषदें सांगून त्या पोथ्या आणि शाळिग्राम त्यांना दिला. यानंतर गोविंदस्वामी आजारी पडले. आपला अंतकाळ आल्याचे जाणून गोविंदस्वामींनी आपल्या ह्या अधिकारी शिष्याकडून मनन ऐकण्याची इच्छा प्रकट केली. त्यांच्याच पुस्तकावरून महाराज त्यांना मनन वाचून दाखवूं लागले. त्यावेळीं त्यांतील रहस्यार्थ स्वामींनी महाराजाना समजावून सांगीतला.

गोविंदस्वामींच्या समाधीच्या पूर्वदिवशीच महाराजांना दृष्टांत झाला. त्या वेळेपासून महाराज सतत स्वामींजवळ बसून राहिले. दुसऱ्या दिवशी स्वामींच्या निर्याणानंतर यथाशास्त्र सर्व विधि करून श्रीगोविंदस्वामींच्या देहाचे विसर्जन कृष्णामाईच्या डोहांत महाराजांनीच केले. गोविंदस्वामींच्या निर्याणाने श्रीमौनीस्वामी या विरक्त जीवन्मुक्त पुरुषालाहि दुःख झाले. त्यांच्याच आज्ञेने महाराजांच्याच हस्तें यथाकाल गोविंदस्वामींचा समाराधना विधि संपन्न झाला.

वाडीला जसे श्रीगोविंदस्वामी महाराजांना भेटले तसेच **श्रीमौनीस्वामीं**चेहि दर्शन झाले. हे सोलापूर भागांतील असून ह्यानी लहानपणींच घर सोडून सर्व तीर्थयात्रा केल्या होत्या. काशीरामेश्वरची यात्रा अनेक वेळां पायींच केली. बराच काळ कडूनिंबाचा पाला व रस एवढाच त्यांचा आहार असे. वयाच्या अवघ्या पंचविसावे वर्षी संन्यास घेतला. त्यावेळीं त्यांच्या गुरूंनी प्रद्युम्नसरस्वती हा पट्ट त्यांना दिला. पुढें दीर्घ काळ त्यांनी मौन धारण केल्याने त्याचे नांव मौनीस्वामी पडले. शेंवटीं वाडींत स्थिर झाले. येथे त्यांनी बालवृत्ती धारण केली होती. लहान मुलांच्या संगतींत राहावें, त्यांच्यांत खेळावें, त्यांना खाऊ द्यावा ह्यांत ते रमत.

ह्यांना वाचासिद्धि होती. प्रत्यक्ष दत्तप्रभूसुद्धां त्याचा शब्द मानीत. महाराज वाडीस असतां याचे एक गंमतीचे उदाहरण घडले. अवर्षणामुळे पावसाकरतां श्रीदत्तपादुकांवर संततधार अनुष्ठान चालूं होते. त्याच वेळीं वर नामसप्ताहहि चालूं होता. तेथे श्रीमौनीस्वामी बसले होते. नेहमींप्रमाणे त्यांच्याजवळ बालगोपालांची गर्दी होती. त्यांतील कांहीनी मौनीस्वामींना विचारले की 'ज्या अर्थी आपण इथे आहांत त्या अर्थी देवसुद्धां प्रत्यक्ष इथे आहेत. मग खालीं संततधार कुणावर धरली आहे?' मौनीस्वामींहि बालवृत्तीनेच

सांगितले की 'गड्यांनो, तुमचे खरे आहे. आतांच्या आतां खालीं जाऊन संततधार बंद करायला सांगा.' मुलांनी लगेच ही आज्ञा खालीं पुजाऱ्यांना कळविली. असे अनुष्ठान एकदम बंद कसे करायचचे? अशा विचाराने त्यांनी तिकडे दुर्लक्ष केले. हे मौनीस्वामींना कळतांच ते रागावले व बोलले की, 'देव इकडे सप्ताहांत बसलेले असतां त्यांना संततधार धरून तुम्ही त्रास देतां तर पाऊसच पडणार नाही जा. काय करायचे ते करा' आतां मात्र पुजारी मंडळी हवालदील झालीं. मोनीस्वामींचा शब्द श्रीदत्तप्रभूहि मानतात याचे अनुभव त्यांना आले होतेच. शेवटी सगळे महाराजांकडे आले. महाराजांच्या सांगण्यावरून त्यांनी आपली सर्व मुले मौनीस्वामींच्याजवळ सोडली व आपल्याला अवर्षणाने ही मुले सांभाळणे शक्य नसल्याने आतां आपणच यांना सांभाळा असे सांकडे मौनीस्वामींनाच घातले. महाराजांनीहि मग मौनीस्वामींची समजूत घातली की एकदां सुरूं केलेले अनुष्ठान मध्येच कसे थांबवायचे? आणि त्यांची प्रार्थना केली की या बाळगोपाळांकरितां तरी आपण पावसासाठी श्रीदत्तप्रभूंनी गळ घातली पाहिजे. अखेर महाराजांच्या म्हणण्यास मान देऊन मौनीस्वामी उठले व श्रीदत्तपादुकांसमोर जाऊन प्रार्थना केली की, "देवा ! या मुलांबाळांकरितां पाऊस पाहिजे लवकर पाठवा". मग काय? निरभ्र आकाशांतसुद्धा एकाएकी ढग दाटून आले आणि धो धो पाऊस पडला आणि वाडींत सर्वत्र आनंदीआनंद झाला.

वाडीचे त्याकाळचे प्रसिद्ध अग्निहोत्री भारताचार्य रामभाऊ कवीश्वर यांचा महान् यज्ञहि मौनीस्वामींच्या नेतृत्वाखालीं पार पडला. ह्यांचे महाराजांवर फार प्रेम होते. श्रीदत्तप्रभू माणगांवला जाण्याआधीं महाराजांची संन्यास घेण्याची इच्छा होती. पण आणखी कांही दिवस तुमचे माणगांवला वास्तव्य होणार आहे. इतक्यांत संन्यासाची गडबड नको असे मौनीस्वामींनीच त्यांना सांगितले. गोविंदस्वामींच्या निर्याणानंतर एके दिवशी सकाळींच मौनीस्वामींनी त्या दिवशी सगळेच स्वामी तुमच्याकडे भिक्षेला येणार तर लवकर स्वयंपाक करा असे सांगितले. महाराजांनीहि कांही प्रश्न न विचारतां भिक्षा आणली व स्वयंपाक करविला. त्या दिवशी पुजाऱ्यांना अशौच आल्याने जेव्हां खरोखरच सर्व स्वामी महाराजांच्याच घरीं भिक्षेला आले तेव्हां मौनीस्वामींच्या बोलण्याचा अर्थ महाराजांच्या लक्षांत आला.

यानंतर कांही दिवसांनी जेव्हां महाराज देवांच्या आज्ञेने सहकुटुंब वाडी सोडून उत्तरेकडे निघाले तेव्हां स्थानिक मंडळींनी मौनीस्वामींना त्यांना

महाराजांना थांबविण्याची विनंति केली. महाराज सर्व तयारी करून जेव्हां मौनीस्वामींचा निरोप घेण्यास आले व आपण कोल्हापूरला निघाल्याचे सांगितले तेव्हां स्वामी लोकांच्या समाधानासाठीं म्हणाले "बरे तर, दोन दिवसांपेक्षां जास्त राहूं नका." यांत वाडीला परत येण्याची आज्ञा नव्हती हे लक्षांत येऊन त्यांच्या मुखाने देवांचीच आज्ञा झाली असे महाराजांना वाटले.

वाडीला श्रीदत्तप्रभूंच्या मार्गदर्शनाखालीं योगाभ्यास चालूं असतां एकदां कांही कारणाने महाराजांना सारखी उचकी लागली. तेव्हां श्रीदत्तमहाराजांनी त्यांना **कापशीच्या मोजणीदारा**कडे जाण्याची आज्ञा केली व ते उचकीचे कारण व त्यावर उपायहि सांगतील असे सांगितले. त्यांच्या घराजवळ पिंपळाचे झाड असल्याची खूणहि सांगितली. त्याप्रमाणे कापशीस जाऊन त्यांना भेटतां मोजणीदारांनी आपल्याला ह्या विषयाचे कांहीच ज्ञान नसल्याचे दर्शविले. महाराजांनी मात्र आपण देवाच्या आज्ञेने आलों असून निर्णय झाल्यावांचून जाणार नाही असे स्पष्ट केले. त्याच रात्रीं मोजणीदारांनाहि देवांनी दृष्टांत दिल्याने त्यांनी दुसरे दिवशी महाराजांना आदराने एकान्तांत नेऊन उपाय तर सांगितलाच पण योगाच्या विवरणात्मक कबीर-धर्मदास-संवादाचा ग्रंथ त्यांना दिला. त्यामुळे पुढें त्यांच्या बऱ्याच अडचणी दूर झाल्या. यावरून असे दिसते की भारतवर्षांत योगादि प्राचीन शास्त्रांच्या परंपरा टिकवणारे प्रसिद्धिपराङ्मुख सिद्ध पुरुष आजहि आहेत व योग्य अधिकारी शिष्याला त्यांच्याकडून लाभ होऊं शकतो.

महाराज माणगांवाहून वाडीला जातांना आजरा येथे जाऊन **आजरेकरबुवां**ना भेटून पुढें जात. हे कनोजी ब्राह्मण असून महाराजांवर फार प्रेम करीत. शरीराने धिप्पाड असून आपल्या उपासनेने त्यानी मारुतीरायांना प्रसन्न करून घेतले होते. आवेशांत आले की तेलांत शेंदूर कालवून प्यायचे व एका झाडांवरून दुसऱ्या झाडावर अशा दहा दहा हात उड्या मारीत. आजऱ्याचे मारुतीबुवा असेच लोकांनी यांना म्हणावे. ह्यांनी माणगांवी द्रोणाद्रिधारी हनुमानाची स्थापना केली होती. तेही वरचेवर माणगांवला महाराजांना भेटायला येत. आपले महाराजांना चालत नाही म्हणून हे इतरांकडून महाराजांसाठीं पापड, सांडगे, कुरुड्या अशा कोरड्या वस्तु करून ठेवीत. त्यांच्या प्रेमासाठीं महाराज तेथे एकदोन मुक्कामहि करीत. आपल्या आयुष्याच्या अखेरीस आजरेकरबुवा वाडींत जाऊन राहिले होते. तेथेच त्यांनी देह ठेवला.

गंगाखेड येथे पत्नीच्या देहावसानानंतर लगेच चौदाव्या दिवशी

श्रीदत्तप्रभूंनी श्रीगोविंदस्वामींच्या रूपाने स्वप्नांतच प्रणवमंत्राची दीक्षा दिली. तद्वत्च दुसऱ्या दिवशी सर्व लोकांसमक्षहि प्रषोच्चार करवून घेण्यास अचानक येऊन अदृश्य झाले. त्यानंतर महाराजांना देवांनी उज्जयिनीस **श्रीनारायणानंदसरस्वती** यांच्याकडून दंड घेण्याची आज्ञा केली. हे माध्यंदिन शुक्लयजुर्वेदीय शाखेचे श्रीदत्तावतार नृसिंहसरस्वतींच्या कारंजा येथील वंशांत उत्पन्न झालेले असून समर्थ रामदास स्वामींच्या संप्रदायांतील होते. त्यांचे गुरु अनिरुद्धानंदसरस्वती होते. उज्जयिनीस दंड ग्रहण केल्यादिवशी गुरुस्वामींच्या आग्रहाने महाराजांना महाराजांना देवांच्या आज्ञेविरुद्ध मठभिक्षा घ्यावी लागली. लगेच महाराजांना सतत उलट्या व्हायला लागून कांही केल्या थांबेनात. मग जेव्हां घाबरून जाऊन गुरुस्वामींनी देवांची क्षमायाचनापूर्वक प्रार्थना केली आणि 'पुन्हां आपल्या आज्ञेविरुद्ध वासुदेवानंदांना कांही सांगणार नाही' असे मान्य केले तेव्हां तो महाराजांचा त्रास थांबला.

महाराज गुरुस्वामींचा मोठा आदर करीत. गुरुस्वामींपुढें आपली लोकप्रियता व महत्त्व दिसूं नये म्हणून ते अधिक काळ त्यांच्याजवळ राहात नसत. प्रसंगोपात्त गुरुस्वामींना स्पष्ट बोलण्याचीहि वेळ त्यांच्यावर आली. मंडलेश्वरीं महाराज असतांना गुरुस्वामी तेथे कांही दिवस राहिले होते. त्यांच्याबरोबर एक तरुण संन्यासी होता. घरांतून भांडून येऊन त्याने गुरुस्वामींकडून संन्यास घेतला होता. एकदां भिक्षेच्या वेळीं या शिष्यस्वामींनी एका गृहस्थाची माळच चोरून आणली. त्या वेळीं महाराजांनी गुरुस्वामींना, अनधिकारी माणसाला संन्यास दिल्याचा हा परिणाम आहं असे स्पष्ट सांगून त्याला तुरुंगांत घालण्याचीहि सूचना केली. पुढें लोकांनी त्या संन्याशाला दुसऱ्या गांवीं पाठविले. १९२० साली चिखलद्याच्या चातुर्मासानंतर मंढलेश्वरच्या मुक्कामात महाराजांना 'गुरुस्वामी नारायणानंद सरस्वती आजारी आहेत, त्यांची सेवा करण्यास जावे' अशी देवांची आज्ञा झाली. त्याप्रमाणे उज्जैनीस जाऊन महाराजांनी त्यांना औषधोपचार करून त्यांची उत्तम प्रकारे सेवा केली व त्यांची प्रकृती बरी झाल्यावर त्याची आज्ञा घेऊन पुढें निघाले. श्रीनारायणानंदसरस्वतींची समाधि चाफळ येथे श्रीरामप्रभूंपुढें आहे.

**श्रीराजराजेश्वरस्वामी** शारदापीठाधीशाचे शंकराचार्य ह्यांची व महाराजांची प्रथम भेट हरिद्वार येथे झालेली दिसते. त्यांनी महाराजांना आग्रहाने तेथेच चातुर्मास (श्रीमहाराजांचा ३रा) करायला लावला व

त्यांच्याकडून उपनिषद्भाष्य श्रवण केले.

तंजावर येथे १७वा चातुर्मास केल्यावर कावेरीतीराने संचार करीत महाराज श्रीरंग येथे त्या वेळीं वास्तव्याला असणाऱ्या शृंगेरी पीठाचे शंकाराचार्य **श्रीनृसिंहभारती स्वामी** महाराजांच्या दर्शनासाठीं गेले. आचार्यांना आनंद होऊन त्यांनी महाराजांचे आदराने स्वागत केले. महाराजांनी शारदांबा आणि शंकाराचार्य यांचीं स्तोत्रें केलीं. आचार्यांनीहि श्रीमहाराजांचे वर्णनपर स्तोत्र करून त्यांच्या भिक्षेची व्यवस्था केली. त्यानंतर तेथील मंडळींना महाराजांची त्यांनी मुद्दाम ओळख करून दिली. श्रीमहाराज "हे साक्षात् दत्तप्रभूच त्यांच्या मातापित्यांच्या पुण्याईने अवतरले आहेत" असे सांगून आचार्यांनी महाराजांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याची तुलना श्रीमदाद्यशंकराचार्यांशी केली व त्यांना आयुरारोग्य व त्याच्या ईश्वरी कार्यांत यश चिंतिले. महाराजांनी औचित्यपूर्ण भाषण करून ‘आचार्यांमुळे पीठाला शोभा आली’ असे उद्‌गार काढले. निरोप घेण्यापूर्वी आचार्यांनी महाराजांचे कांही ग्रंथ बरोबर असल्यास मागितले. परंतु बरोबर तसे कांहीच ग्रंथ नसल्याने एक मंत्रगर्भ स्तोत्र तेवढें महाराजांनी लिहून दिले व आचार्यांच्या इच्छेप्रमाणे आणखी ग्रंथ पाठविण्याचे मान्य केले. त्याप्रमाणे दत्तमाहात्म्य, गुरुचरितम् असे कांही ग्रंथ महाराजांनी शृंगेरीस पुढें पाठविलेहि. तसेच एक स्तोत्र राजमहेद्रीच्या ब्रह्मानंदसरस्वतींना लिहून दिले व ते आचार्यांना दाखविण्यास सांगितले.

**शिरडीचे साई बाबा** यांचे प्रमुख शिष्य व विसाव्या शतकांतील सुप्रसिद्ध संत श्रीदासगणू महाराज एकदा राजमहेंद्रीच्या मुक्कामांत (इ.स.१९०७) श्रीस्वामीमहाराजांच्या भेटीसाठीं आले. थोडी कीर्तनसेवाही त्यांनी केली. शेवटी निघतांना त्यांच्या महाराजांनी पुढील कार्यक्रमाची चौकशी केली. तेव्हां आपण शिरडीला सद्‌गुरु साईबाबांच्या दर्शनाला जाणार असल्याचे त्यांनी सांगितले. त्या वेळी स्वामीमहाराजांनी जवळचा एक नारळ 'हा नारळ आमच्या बंधूंना द्या' असे म्हणून त्यांना दिला. दासगणूमहाराजांनी लवकरच शिरडीला प्रयाण केले. वाटेत कोपरगांव येथे सकाळच्या आह्निकासाठी थांबले. उन्हाळ्याचे दिवस होते. त्यांच्या बरोबरच्या मंडळींना भुका लागल्या म्हणून त्यांनी सामानांतला चिवडा काढला. पण तो फार तिखट होता. चिवड्यावर प्यायला पाणीही नव्हते. तेव्हां बरोबरचे सगळे नारळ त्यांनी फोडून खोबरे चिवड्यांत घालून पाणी पिऊन टाकले. दासगणूंचे आह्निक आटोपल्यावर

त्यांनाही चिवडा दिला व सर्वजण पुढे निघाले. शिरडीला येऊन पाहतात तर काय साईबाबांनी रुद्रावतार धारण केलेला. दासगणूच्याकडे पाठ फिरवून बाबा "चोर तो चोर, हरामखोर"म्हणत आहेत. नेहमी दासगणू आले की अत्यंत प्रसन्नतेने स्वागत करणारे बाबा आज इतके का क्रुद्ध झालेत असा विचार करून दासगणूंनी साष्टांग नमस्कार घातला व बाबांची वारंवार क्षमा मागून या क्रोधाचे कारण विचारले. "माझ्या भावाने दिलेला नारळ खाऊन पुन्हा काय विचारतोस?" असे बाबांचे बोलणे ऐकल्यावर दासगणूंनी बरोबरच्या मंडळींकडे नारळाची चौकशी केली. तेव्हां झाला प्रकार त्यांना समजला. बाबांचा राग पुढे शांत झालाच. आपले व श्री टेंबे स्वामीमहाराजांचे आंतरिक नाते प्रकट व्हावे म्हणूनच हे नाट्य त्यांनी दाखविले होते.

**शेगांवचे** प्रसिद्ध संत **श्रीगजाननमहाराज** यांच्या भेटीला श्रीस्वामीमहाराज गेले होते. स्वामीमहाराजांच्या आगमनापूर्वी एक दिवस श्रीगजाननमहारजांनी आपल्या भक्तांना सांगितले की, ‘उद्यां माझा भाऊ येणार आहे. त्याचे सोवळे-ओवळे कडक आहे’, सर्व टापटीप करून घेतली. स्वामीमहाराजांतचे स्वागत केले. श्रीगजाननविजयांत या दोन महापुरुषांच्या संबंधाचे वर्णन व विवेचन श्रीदालगणूमहाराजांनी उत्तम केले आहे.

महाराजांचे समकालीन एक संन्यासी **शांताश्रम स्वामी** नांवाचे काशीला होते. हे मूळचे महाराष्ट्रांतील कऱ्हाड येथील असून काशी येथे ४० वर्षे अखंड श्रीमद्भागवतसप्ताह पारायणाचे तप त्यांचे झाले होते. असे सांगतात की एखाद्या दिवशी स्वामींना उठायला उशीर झाला की स्वतः काशीविश्वेश्वर येऊन दारावर थाप देत. महाराजांची कीर्ति ऐकून यांना त्यांच्या भेटीची फार इच्छा होती व ब्रह्मावर्ताला महाराज असतांना ते काशीला येतील म्हणून वाट पहात होते. पण महाराजांचा ब्रह्मावर्ताचा मुक्काम लांबतच गेला व काशीच्या मंडळींना महाराज एवढेंच कळवीत की देवांच्या आज्ञेशिवाय येतां येत नाही. अखेर शांताश्रमस्वामींना न राहवून तेच ब्रह्मावर्ताला आले. दोघेहि साक्षात्कारी महापुरुष ! एकमेकांना पाहतांच दोघांच्याहि डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. महाराजांच्या सहवासांत, ब्रह्मावर्तातील त्या वातावरणांत स्वामी एवढे रमले की त्यांचा तेथे चार महिने मुक्काम झाला.

वृद्धापकाळीं शांताश्रमस्वामी कराडला जाऊन राहिले तरीहि काशीचे

त्या काळांतील अधिकारी विद्वान् त्यांना भागवतांतील शंका विचारण्यास येत. कराडच्या लोकांना स्वामींचे संस्कृतचे अध्ययन फारसे न झाल्याचे ठाऊक असल्याने एकाने त्या विद्वानांना विचारले की आपणांसारखीं विद्वान् मंडळीं ह्या स्वामींकडे कां येतां? त्यावर ते म्हणाले की 'भागवतांत कांही स्थळे अशी गहन आहेत की आम्हांलासुद्धां लागत नाहीत. पण हे स्वामी बोलूं लागले की जणूं कांही शुकाचार्य महाराजांचा अभिप्रायच स्पष्ट होतो.' पारंपरिक अध्ययन नसतांहि केवळ तपश्चर्येच्या बळावर हा संनिकर्ष प्राप्त होतो असे प.पू. श्रीदत्तमहाराज कवीश्वर सांगत.

गुर्लहोसूर येथील कैवल्याश्रम स्वामींनाहि महाराजांविषयीं असाच अकृत्रिम स्नेहभाव होता व महाराजहि त्यांच्या प्रेमाग्रहाला मान देऊन तिथे मुक्काम करीत.

अर्थात् सर्वच ज्ञानी पुरुष कांही लोकांच्या लक्षांत येत नाहीत. ज्ञानी पुरुषाला ज्ञानी पुरुषच ओळखूं शकतो. अशीच एक हकीकत नरसोबाच्या वाडीला महाराजांच्या मुक्कामांत(शके १८२८ इ.स.१९०६) घडली. वाडींत तेव्हां स्वतःला अक्कलकोटच्या स्वामींचा शिष्य म्हणविणारा **वैजनाथ** नांवाचा ब्राह्मण रहात होता. त्याचे वागणे मात्र अगदीं विपरीत होते. रोज सकाळीं दहा-अकरा वाजेतोंवर एक तांब्या हातांत घेऊन फिरावें, नंतर तास-दोन तास अंगाला माती लावून नदींत आंघोळ करावी. स्नान, संध्या, देवपूजा तर सोडाच, इतकी वर्षे वाडींत राहून श्रीपादुकांवर पाणीसुद्धां त्याने घातले नाही. कुणीं कांही विचारल्यास 'मी समंधी बाधेचा माणूस आहे. तो समंध मला कांही सुचूं देत नाही ' असे उत्तर तो देई. एक पंचा नेसायला, एक अंगावर घ्यायला एवढेच त्याचे कपडे ! कुणी बोलावले तर जेवायला जायचे. दक्षिणा मात्र पैशा-दोन पैशांवर त्याने कधी घेऊं नये. हे पैसे तो नंदगांवकर मास्तरांकडे ठेवी. कपड्यालत्त्याला त्यांच्याकडून हिशेबाने घेई. वाडींतील २५ वर्षांत त्याची शिल्लक आठच रुपये भरली. वैजनाथचा सरळ साधा स्वभाव होता व त्याच्या खरेपणाबद्दल कुणालाहि शंका नव्हती. कोर्टांतसुद्धां दत्तकाच्या प्रकरणांत साक्षीदार म्हणून गेल्यावर त्याने त्यावेळची परिस्थिति अगदीं लहान मुलाप्रमाणे, 'जमलेलीं मंडळीं पाने मांडा, द्रोण द्या, भात वाढा असे म्हणत होतीं' अशी वर्णन केली.

एकदां ह्या वैजनाथांना गांडाबुवांनी देवाच्या महापूजेसाठीं गळ घातली. 'इतके दिवस वाडींत राहून एकदांहि देवाची पूजा केली नाही, तरी तुमच्या आठ रुपये शिलकीतून देवाची महापूजा करू या.' यावर वैजनाथचे उत्तर ठरलेले होते, 'मला बंधूंस भेटायला जायचे आहे, त्यासाठीं ते पैसे मुद्दाम ठेवले आहेत.' हे त्याचे उत्तर वाडीच्या मंडळींना पाठच होते. ते गांडाबुवांना म्हणाले, 'अहो, हा गेलीं कित्येक वर्षें असेच सांगतो, पण पंचवीस वर्षांत एकदांहि बंधूंना भेटला नाही.' वैजनाथ आपला हेका सोडत नाही असे पाहून मंडळींनी कैफियत महाराजांकडे नेली. महाराज म्हणाले, 'तुम्हांला त्याच्या बोलण्याचा अर्थ समजला नाही. त्याला समंधाची म्हणजे त्या भगवंताचीच बाधा आहे. तो बंधूंस भेटण्यास जाणार म्हणजे शरीर टाकून ब्रह्मस्वरूपांत लीन होणार. ते पैसे शरीराच्या शेवटच्या व्यवस्थेसाठीं त्याने ठेवले आहेत. **तो ब्रह्मनिष्ठ पुरुष आहे. त्याची खरी योग्यता तुम्हांला कळून येणार नाही.**' मग गांडाबुवांचा विशेष आग्रह पाहून महाराजांनी त्याला सांगतांच त्याने लगेच महापूजा करण्याचे मान्य केले. सात रुपये पूजेला खर्च करून एक रुपया शिल्लक ठेवायचे ठरले. 'मला समंध बसूं देणार नाही, आपणच माझ्यासाठीं पूजेला बसा' ह्या त्याच्या म्हणण्यावर महाराज म्हणाले, 'तुम्ही आज त्या समंधास सांगा म्हणजे तो तुम्हांला त्या वेळीं सोडील' अशी हमी महाराजांनी दिली व मार्गशीर्ष शु।।१२ हा पूजेचा दिवस ठरला. मात्र,'पूजाच्या दिवशी आपणहि तिकडेच भिक्षा घेणार ' असे म्हणून महाराजांनी गांवांतीलहि सर्व मंडळींना आमंत्रण दिले. सात रुपायांत गांवजेवण कसे होणार असा मंडळींना प्रश्न पडला. पण वैजनाथच्या सात रुपयांचे सामान आणल्यावर गांवांतल्या सर्व मंडळींनीहि भराभर उत्स्फूर्तपणे आपले घरचे सामान आणून त्यांत टाकले. एक हजार पात्रांचा स्वयंपाक झाला. गांवभर पाने मांडलीं. अन्नावर महाराजांची छाटी झांकून सर्वजण वाढूं लागले. महाराज वैजनाथसह सगळ्या पंक्तींत फिरून आले. दोन हजार मंडळीं जेवलीं. शेंकडों मंडळींनी अन्न वाढून नेले तरीहि पुष्कळ उरले. अन्नाची रुचीहि त्या दिवशी विशेष वाटली. गुरुचरित्रांतील भास्कर ब्राह्मणाची गोष्टच जणूं पुन्हां घडली. अशा रीतीने वैजनाथचा खरा अधिकार व श्रीमहाराजांचे अलौकिक सामर्थ्य यांचा प्रत्यय सर्वांना आला.

श्रीमद्भागवतांतील जडभरताची गोष्ट प्रसिद्ध आहे. पूर्वजन्मीं एका हरिणाच्या आसक्तीमुळे त्याला हरिणाचाच जन्मा प्राप्त झाला होता. पुन्हां मनुष्य

जन्म येतांच कुठल्याहि आसक्तींत न सांपडण्यासाठीं त्याने जडत्वाचे म्हणजे मतिमांद्याचे सोंग धरले. अशाच एका बालकाची गोष्ट श्रीदत्तपुराणांतहि आहे. विष्णुदत्त ब्राह्मणाने त्याचे संसर्गभय निवारून त्याला अहंकाराचा त्याग करून अलिप्तपणे व्यवहार करण्याचा उपदेश केला. श्रीमदाद्यशंकराचार्यांचे प्रमुख शिष्य हस्तामलक यांचीहि अशीच कथा आहे. शके १८२८च्या वाडींतील मुक्कामांत एक गृहस्थ आपल्या मुलाला घेऊन श्रीमहाराजांकडे आला. ५-६ वर्षांपर्यंत चांगला असलेला हा मुलगा एकदम वेड्यासारखें करूं लागला. हे त्याचे वेड घालवावें अशी प्रार्थना त्याच्या पित्याने महाराजांना केली. महाराजांनी त्याच्याकडे दृष्टि टाकली तेव्हां त्यानेहि त्यांच्या नजरेला नजर दिली. १०-१५ मिनिटे नुसती दृष्टादृष्टच झाली. त्यानंतर महाराज त्याच्या पित्याला म्हणाले की 'हे वेड कांही बरें होण्यासारखें नाही, पण अपायकारकहि नाही... उलट कल्याणकारकच ठरेल' तो गृहस्थ गेल्यावर महाराजांनी खुलासा केला की, 'हा मुलगा कोणीतरी पूर्वजन्मींचा योगभ्रष्ट पुरुष आहे. याने लोकांची उपाधि नको म्हणून हे वेड्याचे सोंग मुद्दाम घेतले आहे. दक्षिणेत हा एक मोठा सिद्ध पुरुष पहाण्यांत आला'

नरसीच्या चातुर्मासानंतर(इ.स. १९०५) महाराज चौथ्यांदा ब्रह्मावर्तास गेले तेव्हां देवांनी तेथे एक परमहंस आले असल्याचे सांगितले. 'आज्ञा असेल दर्शनास जातां येईल' या महाराजांच्या सूचनेवर देव म्हणाले, 'तेच इकडे येतील'. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळीं पाठाच्या वेळींच ते आले. महाराजांनी त्यांचा मान करून आसनावर बसविले. थोडा वेळ नुसते बसून कांहीहि संभाषण इ. न करतां ते आले तसे निघून गेले. दिगंबर अवस्थेंत, सर्व द्वंद्वें (शीतोष्णादि) सहन करीत ध्यानमग्न गंगेच्या वाळवंटांत पडून रहावें अशी यांची स्थिति होता. 'असे परमहंस दुसरे कोणी पहाण्यांत आले नाहीत' असे महाराज त्यांच्याविषयीं म्हणत.

१९०५ सालीं वाडीहून पंढरपूरला जातांना महाराजांचा मुक्काम कमळापूर येथे झाला. त्या दिवशी रात्रीं त्यांच्या स्वप्नांत एक आजानुबाहू पुरुष येऊन म्हणाला, 'तुम्ही सर्वत्र फिरतां, कविताहि करतां, मग आमच्याकडे तुमचे लक्ष कां नाही?' सकाळीं महाराजांनी यासंबंधीं देवांना विचारतां ते बोलले की, 'हे **अक्कलकोटचे स्वामी** असून यांची इच्छा तुम्ही अकक्लकोटला यावें व

आपले चरित्र काव्यरूपाने लिहावें अशी दिसते' यावर महाराज म्हणाले, 'ही जिह्वा श्रीदत्तचरणीं समर्पित केली आहे. श्रींची आज्ञा होऊन माहिती मिळाल्यास कवित्व करतां येईल' पण तशी कांही आज्ञा झाली नाही. फक्त अक्कलकोटला जाऊन त्यांचे दर्शन घेण्याची अनुमति मिळाली. त्याप्रमाणे महाराज अक्कलकोटला जाऊन स्वामींचे दर्शन घेऊन गाणगापूरला गेले.

श्रीस्वामीमहाराजांच्या तत्कालीन ज्ञानी सत्पुरुषांशी आलेल्या संबंधांचा हा संक्षिप्त आढावा आहे. **हैद्राबादचे भटजीबापू** तसेच **टाकळीचे दाजीमहाराज** त्यांचा मोठा आदर करीत. ह्याशिवाय त्यांनी **श्रीगुलाबराव महाराजांना** सांगितल्याप्रमाणे आंतरिक प्रेमाचे संबंध त्यांचे अगणितच असतील. हेसुद्धा अतात्त्विकच बोलणे झाले. कारण एकाच परमेश्वरस्वरूपांत लीन झाल्यावर संबंधासाठीं आवश्यक असे द्वैतच नष्ट झाल्यावर कोण कुणाशी संबंध ठेवणार?

अशा 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळीं' आपल्या सर्वांना 'अनवरत' भेटत राहो ह्या श्रीज्ञानेश्वरमाउलींच्या शब्दात श्रीस्वामीमहाराजांची प्रार्थना करून हा लेख पुरा करूं या.

# श्री.प.प.वासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराजांचा
# **देवतांशी संपर्क**

श्रीमदादिशंकराचार्यांच्या अद्वैत परंपरेनुसार परब्रह्म हेंच जगाचे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहे. म्हणजेच ऊर्णनाभि (कोळी कीटक) जसा स्वतःच स्वतःपासून निर्माण केलेल्या तंतूंचे जाळे विणतो तसेच परमेश्वराने आपल्यापासून आपणच हें विश्व निर्माण केले. तोच अभिन्नतया या जगाचे मूलद्रव्य व कर्ताहि आहे. अर्थात् संपूर्ण जग हें परमेश्वरानेच व्यापलेले आहे. ह्या विश्वाचे मानवी दृष्टिकोनांतून आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक असे तीन विभाग दिसतात. आध्यात्मिक म्हणजे आत्मा म्हणजेच देहाच्या संबंधींचा विभाग. यांत सर्व इंद्रियांचा समूह येतो. आधिभौतिक म्हणजे इंद्रियांद्वारा अनुभवाला येणारें पांचभौतिक विश्व. इंद्रियांना व पंचमहाभूतांना अधिष्ठानभूत देवता म्हणजेच आधिदैविक विभाग. या तीनहि विभागांच्या परस्परसंबंधांतूनच विश्वाचे सर्व व्यवहार चालतात.

पंचमहाभूताच्या व पंचेद्रियांच्या अधिष्ठात्री इंद्र, वरुण, अग्नि, सूर्य व वायु ह्या मुख्य देवतांखेरीज पंचमहाभूतांच्या विशिष्ट आविष्कारांच्या विशिष्ट देवता आहेत. उदाहरणार्थ समुद्र व जल ह्यांचा अधिष्ठाता वरुण आहे व त्याच्या आधिपत्यांत जलाशय, नद्या, सरोवरें इत्यादींच्या देवता आहेत. अशा रीतीने देवतांचा म्हणजेच आधिदैविक सृष्टीचा विस्तार झाला आहे.

आधिदैविक तापांचा विचार करतांना निरनिराळ्या देवतांच्या अवकृपेने होणाऱ्या पीडांची उदाहरणे आपण पाहिली व थोडक्यांत त्यांचे निराकरण प.प.श्री टेम्बेस्वामीमहाराज कसे करीत तेहि पाहिले आहे. इथें थोडासा त्या देवतांच्या स्वरूपाचा विचार करूं या. मुख्यतः सृष्टीच्या स्थितीसाठीं त्या त्या विभागांच्या नियमनासाठीं देवतांची योजना आहे. देवता परमेश्वरी शक्तीचेच विशिष्ट कार्यासाठीं झालेले आविष्कार आहेत. मनुष्यांना यज्ञाद्वारें देवतांना प्रसन्न करण्याचा व त्यायोगें आपले कल्याण सांगण्याचा प्रजापतीचा आदेश श्रीमद्‌भगवद्‌गीतेत ग्रथित आहे.(३:१०-१२). देवतांसाठीं करावयाच्या यज्ञांचे वर्णन कर्मकांडांत आहे.

देवता ह्या मंत्ररूपच आहेत व त्यापेक्षां वेगळे त्यांचे स्वरूप नाहीं या

मताचे श्रीमहाराजांनी कुमारशिक्षा या ग्रंथांत खंडन केले आहे.(२७) ह्या देवता मूर्तिमत् असून त्या त्या रूपाने यज्ञांत येऊन आपला हवि ग्रहण करतात असेहि पुढच्याच श्लोकांत श्रीमहाराज सांगतात. या सिद्धाताच्या पुष्टीसाठीं तेथें श्रीमहाराजांनी केनोपनिषदांतील एक कथाहि सांगितली आहे. ह्यावरून देवता ह्या शरीरधारी असतात हें होते; तद्वत्च हीं शरीरें भगवंतांनीच भक्ताच्या भावाला अनुसरून धारण केलेली आहेत व त्याच्याद्वारा तो त्याच्यावर कृपा करतो असे वर्णनहि आहे. यासंबंधीं श्रीमद्भगवद्गीतेचे खालील वचन प्रमाण आहे.

**यो यो यां यां तनुं भक्त श्रद्धयार्चितुमिच्छति।**
**तस्यातस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्।।७:२१।।**
**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधानमीहते।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान्।।७:२२।।**

पारदर्शी ऋषि, ब्रह्मनिष्ठ सत्पुरुष आणि साधुसंत यांच्या अक्षुण्ण परंपरेने भारतीय जनमानसांत या देवतांचे व त्यांच्या स्वरूपाचे, यजनाचे व पूजनाचे ज्ञान आज हजारों वर्षें चालत आले आहे. लक्षावधि भक्त त्याचा आपल्या कल्याणासाठीं विनियोग करीत आहेत. सर्वसामान्य माणसाला ह्य देवतांचा संपर्क होत नसला तरी संत-सत्पुरुषांच्या मार्गदर्शनाने, शास्त्रोक्त विधानावर श्रद्धा ठेवून त्यांना इष्ट देवतांचा प्रसाद प्राप्त होऊं शकतो हें अनुभवसिद्ध सत्य आहे. आत्मज्ञानी व प्रगत साधकांना मात्र ह्या देवता केवळ श्रद्धेचा विषय नसतात तर त्यांच्याबरोबर त्यांचा प्रत्यक्ष संपर्क असतो याची असंख्य उदाहरणे आहेत. प.प.श्रीटेम्बे स्वामीमहाराज हे अशाच थोर माहात्म्यांपैकी आहेत. त्यांना ह्या भौतिक जगाइतक्याच त्यामागील अधिष्ठानभूत देवताहि प्रत्यक्ष असतात. प.प.श्रीस्वामीमहाराजांच्याविषयीं तर असे ऐकण्यांत आहे की ते जेथें जेथें जात तेथील अधिकारी देवता त्यांच्या स्वागतासाठीं पुढें येत.

**श्रीदत्तमहाराजांचे गण** तर सतत श्रीस्वामीमहाराजांच्या सेवेत असत. माणगांवांत पाडगांवकर नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांच्या घरांत कांहीं अपमृत्यू झाल्याने श्रीस्वामीमहाराजांनी (तेव्हां वासुदेवशास्त्री) त्यांना जुने घर पाडून नवे घर बांधावयास सांगितले व वास्तुशांतीनंतर आपण काय तो उपाय करूं असे आश्वासन दिले. बुवाच्या सांगण्यप्रमाणे वास्तुशांति करून पाडगांवकर त्यांची वाट पहात असतां फार वेळ झाला व रात्र झाली तेव्हां त्यांनी बुवांना आणण्यासाठीं एक माणूस पाठविला. त्याची व बुवांची भेट माणगांवच्या बाहेर डोंगराच्या पायथ्याशी झाली. तो आपल्याला सोबत म्हणून आला आहे हें ऐकून

बुवांनी त्याला एका बाजूला बोट दाखविले व म्हणाले, "तो पहा आमच्या सोबतीला आला आहे. आम्हांला दुसरी सोबत काय करायची?" तो एक मोठा नाग होता. पुढें पाडगांवकरांच्या घरीं संरक्षणविधि करून परत जातांना तो माणूसही बरोबर होता. डोंगराच्या पायथ्याशी येतांच तो नाग वाट पहात होताच. तेव्हां त्या माणसाला परत पाठवून बुवा त्या नागाबरोबर देवळाकडे गेले.

माणगांवला देवळाच्या उत्सवांत किंवा संन्यासानंतरहि गर्दीच्या प्रसंगीं कांहीं समाजकंटक असतच. अशाच एका उत्सवांत एका बाईचे दागिने, ती स्नानाला गेली असतां, दुसऱ्या एका स्त्रीने चोरले. ती बाई जेव्हां बुवांच्याकडे गाऱ्हाणे घेऊन आली तेव्हां बुवांनी देवांच्या एका गणाला त्या चोरीचा शोध घेण्यास आज्ञा केली. त्याने त्या चोरी करणाऱ्या स्त्रीला भीति दाखवून बुवांच्या समोर आणले. बुवांपुढें सर्व कबूल करून तिने ते चोरलेले दागिने परत केले. पुढें एकदां ब्रह्मावर्तांतहि अशीच एका चांगल्या घरांतील मुलाने केलेली पैशांची चोरी श्रीमहाराजांच्या आज्ञेने एका गणाने पकडली. महाराजांनी त्याला सन्मार्गाचा उपदेश करून पैसे मालकाला परत करविले. कधीकधीं ह्या गणांचे वागणे महाराजांना आवडत नसे. माणगांव सोडून वाडीला जातांना कांहीं बैलगाड्या बाजूने न जातां बुवांना प्रतिबंध करूं लागल्या. तेव्हां बरोबर असलेल्या देवाच्या गणांनी एक गाडी उचलून दूर फेंकली. त्या गाडीवानाला लागले. ते पाहून महाराजांना वाईट वाटले व वाडीला पोंचतांच देवांचे गण त्यांच्या ताब्यांत देण्याचे ठरविले.

**ग्रामदेवता यक्षिणी :** माणगांवची ग्रामदेवता यक्षिणी आहे. माणगांव येथे श्रीदत्तप्रभूंचे आगमन होऊन मंदिराची स्थापना झाली. प्रत्येक शनिवारी पालखीचा मोठा उत्सव होऊं लागला. त्या पालखीत ग्रामदेवतेचाही समावेश असावा अशी साहजिकच इच्छा श्रीस्वामीमहाराजांना झाली. पण यक्षिणीच्या मंदिराच्या व्यवस्थापकांनी याला विरोध दर्शविला. मग बुवांनी यक्षिणीमातेची प्रार्थना केली. त्याबरोबर सर्व व्यवस्थापकांना देवीने स्वप्नदृष्टांत दिला. त्यानंतर मात्र दर शनिवारी नियमाने देवीची पालखी दत्तमंदिराकडे येई व नंतरच देवाची पालखी निघे.

**नर-नारायण :** महाराज हरिद्वारहून हिमालयांत बदरीनारायणाच्या दर्शनाला जात असतां वाटेत अका मोठ्या कड्याजवळ येतांच पुढे वाट न

दिसल्याने एकदम थबकले. तेवढ्यात त्याच कड्यावरून दोन व्यक्ति खाली येतांना दिसल्या. त्यांनी महाराजांना 'इथून परत फिरा, अन्यथा देहपात होईल' असे सांगितले. तेव्हां महाराज म्हणआले, 'देह पडला तरी चालेल. पण ज्या नर-नारायणांच्या दर्शनासाठी इकडे आलो आहे, ते झाल्याशिवाय परत फिरणार नाही.' हे निश्चयाचे बोलणे ऐकतांच त्या दोन व्यक्ति नाहीशा होऊन त्यांच्या ठिकाणी नर-नारायण मुनी प्रकट झाले. महाराजांना या दर्शनाने फार आनंद झाला.

**बदरीनारायण :** बदरीनारायणाची मूर्ति परीसाची आहे अशी मान्.ता आहे. त्याला लोखंड लावून सोने करण्याचा प्रयत्न कुणी करूं नये म्हणून दुरूनच दर्शन होते. महाराज तेथे गेले असता त्यांना मात्र गाभाऱ्यांत जाऊन दर्शन व पूजन करतां आले.

**श्रीतिरुपति बालाजी :** इथेही गाभाऱ्यांत जाऊन दर्शन घेण्यास मनाई आहे. श्रीस्वामीमहाराजांनी तेथे जाऊन, स्पर्शपूर्वक दर्शन व पूजन झाल्यावरच पुढे जायचे असा संकल्प केला. कांही दिवसांतच तेथील पुजाऱ्यांना स्वप्न होऊन ते महाराजांचा शोध घेत त्यांच्या मुक्कामावर आले व देवांच्या आज्ञेप्रमाणे त्यांना सन्मानाने गाभाऱ्यांत नेऊन त्यांच्या श्रीव्यंकटेशाची स्पर्शपूर्वक पूजा करूं दिली.

**श्रीपंढरीनाथ :** श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथून श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने सपत्नीक उत्तरेला जात असतां महाराज पंढरपूरला आले. पांडुरंगाचे दर्शन घेऊन बाहेर पडतांच एका ब्राह्मणाने प्रसाद म्हणून डाळवे देऊं केले. प्रथम बुवांनी ते घेतलेच नाहीत. मग पत्नीच्या सांगण्यावरून प्रसादाचा आदर करण्यासाठी घेऊन न खातां एका फडक्यांत बांधून ठेवले. रात्री स्वप्नांत येऊन विठोबांनी 'प्रसाद कां घेतला नाही?' असे विचारले. बुवांनी आपण बाजाराचे भाजके डाळे खात नसल्याचे सांगितले. 'बरे तर खाऊं नका' असे म्हणून देव दिसेनासे झाले. सकाळी उठून बुवा पाहतात तर फडक्यांतील डाळे नाहीसे झाले होते.

**भगवान शंकर :** नर्मदाकिनारी ॐकारेश्वरजवळ धावरीकंड आहे. हे नर्मदामातेचे योनिस्थान आहे. त्या कुंडांत स्नानाकरतां बुडी मारून वर येतांना महाराजांनी कांही नर्मदेचे बाण (स्वयंभू लिंग) ओंजळीत आणले. तेवढ्यांत तेथे

एक भिल्ल प्रकट झाला व महाराजांना विचारू लागला, 'या बाणाची तुम्हीच पूजा करणार ना?' तेव्हा महाराजांनी संन्याशाला बेल, तुळशी, फुले तोडता येत नसल्याने आपल्याकडून पूजा होणे शक्य नसल्याचे स्पष्ट केले. 'मग ते बाण नेऊं नका, इथेच टाकून द्या' असे सांगून तो भिल्ल दिसेनासा झाला. ते भिल्लवेषांत प्रत्यक्ष शंकरच होते.

**नरसिंह :** बदरीनारायणाच्या वाटेवर असतां महाराजांच्या समोर एकदम एक वाघ आला. त्याने महाराजांच्या खांद्यावरच एक पाय ठेवून मोठी डरकाळी दिली. बरोबरची मंडळी घाबरून दूर पळाली. महाराज शांतपणे त्याला शांतपणे म्हणाले, 'तू नरसिंह परमात्मा आहेस. तुला काय करावयाचे ते आनंदाने कर.' हे शब्द उच्चारतांच तो वाघ गुपचुप आला तसा निघून गेला.

**अश्वत्थामा :** गरुडेश्वरच्या वाटेवर शूलपाणीश्वराच्या निबिड अरण्यांतून जातांना वाट सांपडेना. तेव्हां एका भिल्लाने येऊन त्यांना नर्मदेच्या ऐलतीरावर आणून सोडले व पलीकडे असलेले गरुडेश्वराचे मंदिर दाखविले. तो परत निघतांच महाराजांना कांही संशय येऊन त्यांनी त्याला थोडे दरडावूनच विचारले, 'तूं कोण आहेस, खरे सांग.' त्या वेळी आपण अश्वत्थामा असून या जंगलांत राहतो अशी कबुली त्याने दिली.

आसेतुहिमाचल संचार करतांना स्वामीमहाराजांनी असंख्य तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या. त्या त्या ठिकाणच्या नद्या, क्षेत्रे व देवता यांच्यावर त्यांनी केलेली स्तोत्रे प्रसिद्ध व प्रत्यक्षफलदायी आहेत. सर्व देवतांशी त्यांचा नित्य संवाद होत असे तेव्हां हे अनेक लोकांच्या प्रत्ययास आले आहे. त्यांतील कांही उपलब्ध ठळक घटनाच इथे दिल्या आहेत.

## सरिता आणि स्वामीमहाराज

निसर्ग हें मानवाला सहज गम्य असलेले परमेश्वराचे स्वरूप आहे. ह्या सर्व प्रकृतीच्या रूपाने जगदीश्वरच साकारलेला आहे ही जाणीव कुणालाही सहजच व्हावी अशी आहे. मागील लेखांकांत पाहिल्याप्रमाणे भारतीय ऋषिमुनीनी ह्या स्थावरजंगम सृष्टीच्या मुळाशी असलेल्या देवतांचे ज्ञान करून घेतलेले आहे. आपल्या श्रुतिस्मृतिपुराणांनी ह्या देवतांच्या उत्पत्तीची, स्वरूपाची, शक्तीची व कार्याची वर्णने करून ठेवलेली आहेत व

प.प.श्रीस्वामीमहाराजांसारख्या ज्ञानी महापुरुषांचा ह्या देवतांशी सहज, नित्य संपर्क असतो हें आपण पहात आहोंत.

पंचमहाभूतांपैकी जलतत्त्वाची अधिष्ठात्री देवता वरुण असून सप्तसागर, नद्या, जलाशय आदि सर्व त्याच्या आधिपत्याखाली आहेत. आपल्या पवित्र जलप्रवाहांनी मानवी जीवनाला आधारभूत झालेल्या व आपल्या तीरांवर अनेक संस्कृतींना फुलवणाऱ्या पावक नद्यांचे महत्त्व तर असाधारण आहे. वैदिक संस्कृतींत त्यांच्या देवतारूपांत उपासना सांगितलेल्या आहेत. श्रीस्वामीमहाराजांचा संचार मुख्यतः या नद्याच्या तीरांवरून, त्याच्या जणूं आश्रयानेच झालेला दिसून येतो. श्रीमहाराजांनी ह्या सर्व नद्यांवर स्तोत्रांची रचना तर केलेली आहेच; शिवाय त्या त्या नद्यांच्या प्रदक्षिणा, दशाहार, अर्चना इत्यादि उपासनांचाहि आचार व पुरस्कार केलेला दिसतो. ह्या नद्यांबद्दल सा श्रीमहाराजांना पूज्यभाव व स्नेह होता तसाच या नद्यानाहि श्रीमहाराजांविषयीं आत्मीयता, अभिमान व आदर होता असे त्यांच्या जीवनांतील अनेक घटनांवरून स्पष्ट होते. अशा कांहीं घटनांचा आपण आतां विचार करूं या.

## निर्मला

माणगांवाजवळच्या नदीला आधीं कांहीं नांव नव्हते. एकदां नरसोबाच्या वाडीहून परत येतांना ह्या नदीजवळ येतांच एक दिव्य स्त्री प्रकट झाली व वासुदेवशास्त्रींना म्हणाली, 'आतां तुम्ही माझें नामाभिधान केल्यावांचून पुढें जाऊं नका.' शास्त्रीबुवांनी तिला ओळखून, थोडा विचार करून सांगितले की 'तुझें नांव आम्हीं निर्मला ठेवले आहे'; आणि त्यांनी तिला नमस्कार केला. तेव्हां ती देवता अदृश्य झाली. त्यानंतर शास्त्रीबुवांच्या स्वागतासाठीं आलेल्या मंडळींना त्यांनी आपल्या नदीचे नांव निर्मला असे ठेवल्याचे सांगितले. तेव्हांपासून तेच नांव रूढ झाले.

## नर्मदा.

हिमालयांतील दोन वर्षांपेक्षांहि अधिक असा आपला अज्ञातवास संपवून श्रीस्वामीमहाराज ब्रह्मावर्तास आले. तेव्हां त्यांचा जसा गंगेकाठीं वास आहे तसाच तो आपल्या तीरावरहि असावा असे नर्मदामातेला वाटले. 'तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि' ह्या कोटींतील महाराज असल्याने हें नर्मदामातेचे वात्सल्य स्वाभाविकच होते. नर्मदामातेने ही आपली इच्छा स्वप्नदृष्टान्ताद्वारें श्रीमहाराजांच्या कानांवर घातलीहि. पण देवांच्या आज्ञेशिवाय पाऊलहि न

टाकणाऱ्या महाराजांनी तिकडे थोडें दुर्लक्षच केले. तेव्हां एक विलक्षण घटना घडली. एका त्वचारोगाने आर्त झालेल्या तेथील ब्राह्मणाला कुणी असा सल्ला दिला की स्वामीमहाराजांच्या पायांचे तीर्थ घेतले की तुला बरें वाटेल. महाराज तर पायाचे तीर्थ कुणालाहि देत नसत. तो ब्राह्मण व्याधीने अत्यंत त्रस्त व अगतिक झाला होता. एकदां महाराज लिहिण्यासाठीं पाय मागें घेऊन उपडी मांडी घालून बसले होते. ह्या ब्राह्मणाने त्यांना नकळत मागें जाऊन, त्यांच्या पायांवर पाणी घातले व ते चटदिशी पिऊन टाकले. महाराजांनी चमकून हा प्रकार पाहिला व त्याला असे करण्याचे कारण विचारले. त्याने क्षमायाचना करून आपण अगतिकतेने हा मार्ग अवलंबिल्याचे निवेदन केले. महाराजांनी लगेच उठून गंगेवर जाऊन स्नान केले; पण चित्ताची अस्वस्थता कांहीं जाईना. कांहीं तरी शारीरिक पीडा उद्‌भवणार असे वाटूं लागले. रात्रीं त्यांना स्वप्नांत एक चांडाली शिवली. महाराजांनी उठून देवाचे ध्यान केले. तरीहि सकाळीं उठतांच त्यांच्या सर्व अंगावर फोड आलेले दिसले. त्या ब्राह्मणाचे शरीर मात्र ठीक झाले. महाराजांनी गंगेची पांच श्लोकांनी स्तुति केली. तरीहि त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. त्या रात्रीं श्रीमहाराजांना स्वप्नांत ' हें अनधिकारी माणसाला पायाचे तीर्थ दिल्याचे फळ' असा दत्तप्रभूंचा दृष्टांत झाला; तसेच हें अजाणतां घडल्याने केवळ तीन दिवस नर्मदास्नानाने बरें होईल असे सांगितले.

हा दृष्टांत होतांच महाराज ब्रह्मावर्ताहून निघून मजल दर मजल करीत नर्मदेची नाभी म्हणून प्रसिद्ध असलेल्या नेमावरला आले. तिथें येऊन त्यांनी नर्मदामातेची प्रार्थना केली व आपल्या थोड्या अपराधाची ही केवढी शिक्षा केली? अशी कैफियत करून 'माझ्याशिवाय तुझें महत्त्व वाढवणारा दुसरा कुणी नाहीं काय?' असा सवालहि केला. नेमावरला तीन दिवस मुक्काम करून स्नान केल्यावर तो दुसऱ्याचा भोग संपला. त्या वेळीं महाराजांनी नर्मदामातेचे नर्मदालहरी या नांवाचे केलेले स्तोत्र प्रसिद्ध आहे. हाच नर्मदामाता व श्रीमहाराज यांच्यातील अलौकिक स्नेहाच आरंभ होय. श्रीमहाराजांचे अधिकांत अधिक चातुर्मास नर्मदामातेच्या तीरावर तर झालेच, पण महाराजांनी महासमाधीहि नर्मदेच्या कुशीतच घेतली. नर्मदामातेनेहि आपल्या ह्या लाडक्या अलौकिक पुत्राची तत्परतेने काळजी घेतलेली दिसते.

एकदां ब्रह्माणी घाटावर महाराज चालत असतां पाय घसरून कमरेंत लचक भरली, ती इतकी की त्यांना जागचे उठवेना. अशाच अवस्थेंत भिक्षेची वेळ झाली. कमरेची लचक बरी करण्याचा मंत्र येत असूनहि, 'प्रारब्धकर्माणं

भोगादेव क्षयः' ह्या आपल्या नियमाला अनुसरून महाराजांनी त्याचा प्रयोग केला नाही. मग मात्र नर्मदामातेला राहवेना. एका कुमारिकेच्या रूपाने प्रकटून ती महाराजांना म्हणते, 'महाराज, भिक्षेची वेळ झाली. उठा, मी तुमची लचक बरी करते'. तिने थोडें भस्म मंत्रून महाराजांच्या कमरेस चोळले आणि महाराजांना उभें राहून पाय आपटायला सांगितले. तसे करतांच खरोखरच ती लचक पूर्ण जाऊन त्यांना चालतां येऊं लागले. महाराजांनी लगेच नर्मदामातेला ओळखून तिची स्तुति करतांच ती गुप्त झाली.

नंतर महाराज त्या ब्रह्माणी गांवांत भिक्षेला जायला निघाले त्या वेळीं त्या गांवांत एका गुंड माणसाच्या वर्चस्वाने सर्व अनाचार चालूं असल्याचे समजून आल्याने गांवांत भिक्षा न घेतांच बाहेर येऊन एका झाडाखाली बसून राहिले. पुनश्च कुमारीरूपाने नर्मादामाता प्रकट होऊन महाराजांना भिक्षा न घेण्याचे कारण विचारले. तेव्हां 'अशा धर्मभ्रष्ट गांवांतील भिक्षा घेण्यापेक्षां नर्मदेचे पाणी पिऊन राहणे बरें' असे उत्तर महाराजांनी दिले. तेव्हां त्या मुलीने महाराजांना जवळच आपले  गांव नेमावर असल्याचे सांगून तिथें भिक्षेला येण्यास सांगितले. आपण फक्त दक्षिणी ब्राह्मणांचीच भिक्षा घेत असतों व तीहि किमान तीन घरची असे त्यांनी म्हटल्यावर त्या मुलीने नेमावरला सतरा घरें दक्षिणी ब्राह्मणांची असल्याचीहि माहिती दिली. त्या मुलीच्या सांगण्याप्रमाणे महाराज नेमावरला गेले तेव्हां त्या मुलीची माहिती तंतोतंत खरी निघाली. ती मुलगी मात्र चौकशी करूनहि कुठें सांपडली नाही.

गरुडेश्वरला असतांना एक मोठें पातेले भांडीं घासणाऱ्या गड्याच्या हातून सुटले व नदीच्या प्रवाहांत वाहून जायला लागले. कुणी तरी हें महाराजांच्या कानांवर घातले तेव्हां महाराज नदीच्या कांठीं आले व म्हणाले 'नर्मदामातेला हें पातेले काय करावयाचे आहे? बालगोपाळांच्या जेवणाचा खोळंबा ती कशाला करील?' लगेच ते पातेले पाण्याच्या लाटांनी हळूंहळूं कांठाकडे महाराजांच्या पायांजवळ येऊन लागले. नर्मदामातेनेच आणून दिले!

गरुडेश्वरचीच गोष्ट. एकदां पाऊस खूप झाल्याने नदीचे पाणी फारच चढले.  पुराच्या भीतीने लोक महाराजांकडे आले. महाराजांनी नदीतीरावर येऊन नर्मदामातेची प्रार्थना केली की आतां पूर आल्यास भक्तांना त्रास होईल तरी पूर येऊं नये; व दंडाने नदीच्या पाण्याला लावला. दंडाचा स्पर्श होतांच नदीचे पाणी ओसरायला लागून पुराची भीति टळली.

**कृष्णामाई.**

श्रीदत्तप्रभूंच्या कलियुगांतील दोन्ही अवतारांनी कृष्णानदीविषयीं आपुलकी प्रकट केली आहे. श्रीपादश्रीवल्लभांचे प्रकट वास्तव्य बह्वंशी कृष्णेची नाभी समजल्या गेलेल्या कुरुगड्डींत व्यतीत झाले आहे. तसेच श्रीमन्नृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजाची प्रमुख लीलास्थाने नरसोबावाडी व गाणगापूर कृष्णेकांठींच आहेत. अर्थात् श्रीस्वामीमहाराजांना कृष्णामाईविषयीं विशेष आत्मीयता व आदर होता. वाडीच्या पुजाऱ्यांचा बरींच वर्षें ,महाराजांनी जगन्नाथपंडितांच्या गंगालहरींप्रमाणे एक कृष्णालहरी करावी असा आग्रह होता. पुढें इ.स. १९०५च्या वाडीच्या वास्तव्यानंतर महाराज गाणगापूरला जातांना महाराजांना श्रीकृष्णामाईने साक्षात् दर्शन देऊन कृष्णालहरी करण्याबद्दल आज्ञा दिली. त्या वेळीं अत्यंत उत्स्फूर्तपणे एकामागें एक असे जलदपणे ५१ श्लोक महाराजांच्या मुखांतून बाहेर पडले. तेव्हां 'पुरे' म्हणून कृष्णामाता अंतर्धान पावली.

श्रीकृष्णामातेच्या व महाराजांच्या हार्दिक अनुबंधाचे एक उदाहरण तंजावरच्या (इ.स.१९०७) चातुर्मासानंतर महाराज कृष्णातीराने संचार करता असतां घडले. फाल्गुन शु।।१४ ला महाराज एका छोट्या गांवांत येऊन पोंहोंचले. दुसऱ्या दिवशी पौर्णिमा असल्याने मुक्कामाला जागा पहावी व क्षौराची कांहीं सोय होते कां पहावे या हेतूने गांवकऱ्याजवळ चौकशी केली. त्यांनी कांहीं व्यवस्था करणे तर दूरच, पण महाराजांनाच उलटसुलट प्रश्न विचारून त्यांची मस्करीच आरंभली. ह्या सर्व प्रकाराने निराश व त्रस्त होऊन गांवाबाहेर एका झाडाखाली जाऊन बसले. त्यांनी शेंवटी कृष्णामाईशीच मानसिक संवाद सुरूं केला, :'माते! आपल्याविषयीं आम्ही इतका अभिमान बाळगीत असतां आपणांस या शरूराचा कांहींच अभिमान नाहीं काय? उद्यां या गांवातं जर क्षौराची तजवीज झाली नाहीं तर यापुढें वज्जीव आपण क्षौर करणार नाहीं व दंडत्याग करून इच्छेप्रमाणे आपण कोठेंहि फिरत राहूं. आजपासून आपली आज्ञा पाळण्याचे कांहींच कारण दिसत नाहीं. ' याप्रमाणे कृष्णामातेशी प्रेमकलह करून महाराज तिथेंच झोंपले.

रात्रीं स्वप्नांत कृष्णामाईंनी दर्शन देऊन महाराजांना आश्वासन दिले की आपल्याला आपणांविषयीं पूर्ण अभिमान असून दुसरे दिवशी क्षौरविधीची व्यवस्था होईल. इकडे गांवांतील मुख्य व्यक्तींना एकाच वेळीं स्वप्नांत आपले उग्र स्वरूप दाखवून अशा महान तपस्वी संन्याशाचा छळ केल्याबद्दल

कानउघाडणी केली आणि दुसरे दिवशी त्यांची क्षमा मागून, त्याच्या क्षौराची व्यवस्था करून त्यांची कृपा संपादन न केली तर गांवावर फार मोठे संकट येऊन सर्वांचा नाश होईल असा इशारा दिला. दुसरे दिवशी सर्व प्रमुख गांवकऱ्यांनी हे स्वप्न एकमेकांना सांगून कृष्णामाईंच्या आज्ञेप्रमाणे महाराजांना शरण आले व त्यांची क्षमा मागून आपली सेवा घेण्याची प्रार्थना केली. क्षौराची उत्तम व्यवस्था तर झालीच पण पुढें आग्रहाने महाराजांना पंधरा दिवस ठेवून घेऊन त्यांची सेवा करून अपराधांचे परिमार्जन केले.

रथसप्तमीपासून वाडीला कृष्णामाईंचा उत्सव साजरा होतो. शके १८३१(ई.स.१९०९)च्या उत्सवाला महाराज वाडींत होते. त्या दिवशी कृष्णावेणीची मूर्ति वाजतगाजत दरवर्षीप्रमाणे देवाकडे आणतांना महाराज पाठ सांगतांना उठून बाहेर आले. मूर्तीकडे पाहतांच महाराजांना प्रमाचे भरते येऊन अश्रुधारा सुरूं झाल्या. हातांतले पुस्तक गळून पडले. कृष्णालहरीचा पहिला श्लोक म्हणण्यास सुरुवात केली.

**चतुर्बाहुः श्रीमत्सजलजलदश्यामलतनुः।**
**प्रकाशद्वक्त्रेन्दुः सदुडुगणमुक्तावलिरपि।।**
**तडिद्वासा भास्वत्सुतिलकसन्मौलिरघहृत्।**
**क्षमाध्रस्य ह्यत्रेरपि जयति सूनुः स्वहितकृत्।।१।।**

परंतु सारख्या येणाऱ्या हुंदक्यांनी तो श्लोक कांहीं पुरता झाला नाहीं. यावरून श्रीमहाराजांच्या व श्रीकृष्णामातेच्या अलौकिक प्रेमाची थोडी कल्पना येईल.

**पिनाकिनी.**

शके १८२८ (इ.स.) च्या वाडीच्या मुक्कामानंतर देवांच्या आज्ञेने रामेश्वरला जात असतां महाराजा पिनाकिनी नदीच्या तीरावर आले. अधिक चैत्राची पौर्णिमा होती व क्षौर करावयाचे होते. नदीला पाणी तर गुडघाभरहि नव्हते. तेव्हां स्नान कसे व्हावे. स्थानिक मंडळींनी बुडी मारण्यासारखा खळगा करून देण्याचे ठरविले. क्षौर झाल्यावर महाराज नदींत उतरतांच नदीचे पाणी एकदम वाढूं लागून छातीच्यावर आले. सहज रीत्या बुजी मारून महाराजांना स्नान करतां आले. त्यावेळीं पिनाकिनी नदीच्या स्तुतिपर असा खालील श्लोक महाराजांच्या मुखांतून बाहेर पडला

**याऽधिमासवशाच्चैत्र्यां कृतक्षौरस्य मेऽल्पका।**
**स्नापनाय क्षणाद् वृद्धा साद्धा सेव्या पिनाकिनी।।१।।**

## प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज आणि
## श्रीदत्तप्रभू - मनमोहन.

आतांपर्यंत आपण श्रीमहाराजांचा लोकसंग्रह, त्यांचा शिष्यसंप्रदाय, त्यांचे समकालीन सत्पुरुषांशीं आलेले संबंध आणि त्यांचा देवतांशीं सतत असलेला संपर्क यांचा विचार केला. त्यांतून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं श्रीमहाराजांच्या जीवनांतील या सर्व संबंधांचा आणि एकूणच संपूर्ण जीवनाचा केंद्रबिंदू होते अनंतकोटिब्रह्मांडनायक, भक्तवत्सल, भक्ताभिमानी, राजाधिराज श्रीदत्तमहाराज ! श्रीमहाराजांनीं केवळ श्रीदत्तप्रभूंच्या इच्छेनेंच जणूं जन्म घेतला, त्यांच्याच आज्ञेनें संपूर्ण आयुष्यभर ते जगले आणि त्यांच्याच भक्तीचा प्रचार करून सर्व जीवन शेंवटीं त्यांनाच समर्मण केलें. आपले मातापिता, पत्नी आणि सर्व कुटुंबीय यांच्याशीं वागतांनाहि त्यांनीं श्रीदत्ताज्ञाच प्रमाण मानली. अर्थात् श्रीमहाराजांना समजून घेण्याचा कोणताहि प्रयत्न, त्यांचे सद्‌गुरु आणि इष्टदेव ह्या दोन्ही स्थानीं विराजमान असलेल्या श्रीदत्तप्रभूंच्याबरोबर असलेल्या संबंधांचा विचार केल्याशिवाय अपुराच राहील.

अर्थात्, हा गुरुशिष्य किंवा देवभक्तांचा संबंध इतका गहन आणि नाजुकहि आहे कीं त्याविषयीं विचारसुद्धां करणें धाष्ट्र्याचेंच होणार आहे. अधिकार तर कुणाचाहि असूं शकतच नाहीं; पण मर्यादाभंगाचीहि साहजिकच शंका आहे. तरीहि ज्ञानेश्वरमाउलींच्या "येथ जरी सलगी करूं बिहों तरी कैं निवों पां" न्यायानेंच हें साहस करूं धजत आहों. दत्तभक्तीच्या ह्या गंगौघांत अवगाहन करणें अशक्यच आहे; पण कांठावरच्याच थोड्या जवळिकेनेंहि घडणाऱ्या तुषारसिंचनानें आमचा संसारताप शमेल हाच ह्या अनधिकार सलगीचा हेतु आहे.

श्रीस्वामीमहाराजांचा जन्म थोर दत्तभक्त मातापित्यांच्या पोटींच झाला. पिता श्रीगणेशभटजी अपस्माराच्या आजाराची पर्वा न करतां, घरीं सुशील, संदर, अनुकूल, पतिव्रता अशी कांता असूनहि, सतत गाणगापुरींच गुरुचरित्राचीं पारायणें करीत रहात असत. एकदां बारा वर्षांच्यावास्तव्यानंतर, प्रत्यक्ष दत्तप्रभूंनींच जेव्हां आपल्या प्रसन्नतेची ग्वाही देऊन आपणच तुमच्या पुत्ररूपानें येणार असल्याचा वर दिला तेव्हांच श्रीगणेशभटजी माणगांवीं येऊन संसाराला लागले. त्यानंतर थोड्याच काळानें श्रीमहाराजांचा जन्म झाला.(श्रावण कृष्ण ५,

शके १७७६, इ.स.१८५४). मातुःश्री रमाबाईहि अत्यंत सात्त्विक वृत्तीच्या असून, सतत प्रदक्षिणा, आतिथिसत्कार, नामस्मरण, तीर्थयात्रा इत्यादि स्त्रीसुलभ देवसेवेंत निमग्न असत. सारांश, "अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्। एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम्" या भवगद्वचनानुसार अत्यंत दुर्मिळ असा जन्म श्रीमहाराजांना लाभला.

साहजिकच उपनयनानंतर लगेच बालवासुदेवानें नित्य स्नानसंध्यादि अनुष्ठान व वेदाध्ययन यांबरोबरच नित्य श्रीगुरुचरित्राचीं पारायणें सुरूं केली. असा जन्मजात ओढाच श्रीदत्तभक्तीकडे असला तरी त्यांनीं गृहस्थाश्रमांत प्रवेश करीपर्यंत नित्य दत्तोपासनेचा स्वीकार केला नव्हता. "ब्राह्मणांना नित्य अग्नि व सूर्य ह्यांची उपासना आहेच; इतर आणखी उपासनेची काय आवश्यकता?" असाच त्यांचा विचार होता. पण जन्मजात दत्तभक्तीच्या संस्कारांमुळें त्यांना श्रीनृसिंहवाडीस जाण्याची इच्छा मधूमधून होत असे. परंतु याला मातुःश्रींची संमति मिळेल कां या शेकेनें ते आपला विचार मनांतच ठेवीत.

श्रीमहाराजांनीं द्विसाहस्रींत म्हटल्याप्रमाणें, "इन्द्रियार्थे स्थितौ रागद्वेषौ येन जितौ स तु। दैवीसंपल्लभेन्मोक्षं तदर्थं संभवत्यजः।। गाढं प्रियोऽस्य भगवान्स्तस्यामपि तादृशः।" विषयांच्या ठिकाणीं (पूर्वसंस्कारांनीं) स्थिर झालेले अनुकूल-प्रतिकूल भाव (रागद्वेष) ज्यानें जिंकले त्याला दैवी संपत्तीचा व क्रमानें मोक्षाचाहि लाभ होतो. त्याच्यासाठींच अजन्माहि जन्म घेतो. (कारण) ह्याची भगवंतावर गाढ प्रीति असते व तशीच त्या भगवंताचीहि ह्याच्यावर (गाढ प्रीति) असते. त्यावरून वासुदेवशास्त्रींच्या मनांत नरसोबावाडीला जाण्याची ओढ जेवढी होती तेवढीच दत्तप्रभूंनाहि त्यांच्या येण्याची वाट होती. बुवांच्या मनाचा निश्चय होत नाहीं असें पाहून शेंवटीं दत्तमहाराजांनींच स्वप्नांत ब्राह्मणाच्या रूपानें येऊन विचारलें, "कां हो शास्त्रीबुवा, वाडीला जायचें असें म्हणतां (मनांत) तर एकदां जाऊन कां येत नाहीं? " स्वप्नांतच शास्त्रीबुवा त्या ब्राह्मणाला म्हणाले, "कोण जाणे मातुःश्रींची संमति मिळेल कां" त्यावर तो ब्राह्मण म्हणाला, "आपण विचारून तरी पहा. मातुःश्रींची संमतीहि मिळेल तसेंच सोबतीची आणि पैशांची पण व्यवस्था होईल. " दुसऱ्या दिवशीं वासुदेवशास्त्रींनीं आईजवळ विषय काढतांच "असली तुझी इच्छा तर ये जाऊन, माझी कांहीं ना नाहीं" अशा शब्दांत त्यांची संमति तर मिळालीच पण स्वप्नदृष्टांताप्रमाणें सोबत

मिळाली व वाडीला निघतांच वाटेंत सावंतवाडीला एकानें पत्रिकेची राहिलेली दक्षिणा म्हणून पैसेहि दिले. ह्या सर्व घटनाक्रमानें उत्साहित झालेले शास्त्रीबुवा लवकरच मजल दर मजल करीत वाडीला येऊन पोहोंचले.

वाडीला वासुदेवशास्त्री पहांटे स्नान करून ओल्यानें देवाला पाणी घालायला गेले तर त्यांचा मळकट पंचा पाहून पुजाऱ्यांना ते ब्राह्मण तरी आहेत कां अशी शंका आली व त्यांनीं त्यांना पाणी घालूं दिलें नाहीं. लगेच देवांनीं गोविंदस्वामींना (ब्रह्मय्यास्वामी) पोथी वाचायचें सोडून मंडपांत काय चाललें ते पहावयास सांगितलें. "त्या दुरून आलेल्या ब्राह्मणाला पुजारी पाणी घालूं देत नाहींत," हा देवांचा निरोप ऐकतांच गोविंदस्वामी पोथी सोडून उठले व त्यांच्या माडीवरून खालीं येऊन, खिन्न मनानें घाटाच्या पायऱ्या चढणाऱ्या वासुदेवशास्त्रींना चिरपरिचिताप्रमाणें संबोधून त्यांच्याजवळ आपला दंड दिला व सोबत मंडपांत जाऊन पुजाऱ्यांची शंका निरसन करून त्यांची श्रीपादुकांवर पाणी घालण्याची व्यवस्था केली. वासुदेवशास्त्रींना वाडीच्या मार्गावरच स्वप्नदृष्टांतांत श्रीगोविंदस्वामी हे अधिकारी पुरुष असून त्यांचें दर्शन घ्यावें अशी देवांची आज्ञा झाली होती.

वाडींतल्या या पहिल्याच खेपेस बुवांचें महिनाभराचें वास्तव्य झालें. बुवांना दर्शन देण्याची भगवंतालाच उत्सुकता असावी. त्याकरितांच शेजारतीनंतर कट्ट्यावर न येण्याचा नियम मोडण्याबद्दल समज देण्याच्या निमित्तानें श्रीदत्तप्रभूंनीं वासुदेवशास्त्रींना दर्शन दिलें. याच मुक्कामांत मिरजेच्या शंकरभटजींकडून पोथी आणून गुरुचरित्राचा सप्ताह पण करून घेतला.

यानंतर श्रीगोविंदस्वामींनीं शास्त्रीबुवांना ते करीत असलेल्या पंचायतनपूजेबरोबर श्रीदत्तपादुकांचेंहि पूजन करण्याची सूचना केली. पण तिकडे बुवांनीं दुर्लक्ष केलें; पण पुन्हां देवांचा दृष्टांत झाल्यानें त्यांनीं पादुकांची नित्यपूजा सुरूं केली. अशा रीतीनें गोविंदस्वामीना शास्त्रीबुवा गुरुस्थानीं मानूं लागले. यानंतर बुवा वाडीला जाऊन चांद्रायणाचें कठोर व्रत आचरून दत्तजयंतीला परत वाडीला आले. तेव्हां गोविंदस्वामींनीं त्यांना दत्तोपासना स्वीकारण्याची सूचना केली. यावर शास्त्रीबुवांनीं "ब्राह्मणांची अग्नि व सूर्य यांची नित्य उपासना असतां निराळी काय करायची" असें उत्तर दिलें. त्यावेळीं प्रत्यक्ष दत्तप्रभूंनींच बुवांना दत्तमंत्राचा उपदेश दिला. त्याच वेळीं शेजारींच झोंपलेल्या

गोविंदस्वामींनीं "शास्त्रीबुवा, मंत्र मिळाला ना? आतां याचें सर्व सांग विधान उद्यां तुम्हांला सांगूं" असें जागेवरूनच म्हणून दुसरे दिवशीं त्या विधानाची पोथी शास्त्रीबुवांना दिली. त्यानुसार मंत्रजप करण्याची व उपनिषद्‌भाष्य वाचण्याची आज्ञाहि त्यांनीं बुवांना दिली.

अशा रीतीनें दत्तप्रभू क्रमाक्रमानें शास्त्रीबुवांना आपल्याकडे आकर्षीत होते. कधीं स्वप्नदृष्टांतांतून, कधीं गोविंदस्वामींकडून, कधीं मौनीस्वामींच्या माध्यमांतून तर क्वचित् प्रत्यक्ष दर्शनानें ते शास्त्रीबुवांशीं आपलें नातें दृढ करीत होते. पण एवढ्यानें चार-सहा महिन्यांत कधींमधीं बुवा वाडीला जात; पण तेवढ्यांनें सद्‌गुरुनाथांचें समाधान झालें नाहीं. त्यांना आपल्या शिष्याला लवकरांत लवकर पूर्णतेला नेऊन त्याच्याकडून धर्मसंस्थापनेचें कार्य करून घ्यायचें होतें. याकरितांच कीं काय, देवांनीं शास्त्रीबुवांकडे माणगांवलाच सात वर्षें येऊन राहण्याचें ठरविलें व संन्यासाच्या विचारांत असलेल्या बुवांना श्री मौनीस्वामींकडून व नंतर स्वप्नद्वाराहि हा आपला मानस कळविला.

ही आज्ञा घेऊन बुवा माणगांवला परतत असतां वाटेंत कागलच्या बाजारांतून जात असतां सहज एका सोनाराच्या दुकानांत मूर्ति पहात होते. लगेच तू मूर्तिकार बाहेर येऊन त्यांना हवी तशी मूर्ति करून देतो असें म्हणाला. त्याला तसा दृष्टांतच झाला होता. पैशांचीहि चिंता तुम्ही करूं नका. फक्त मूर्ति कशी हवी तें सांगा असें त्याचें बोलणें ऐकून शास्त्रीबुवांनीं त्याला तें सर्व सांगितलें. तिथें आठ दिवस मुक्काम केला व तेवढ्या काळांत तयार झालेली सुंदर मूर्ति घेऊन ते माणगांवला निघाले. सात अंगुळें, उंचीची, सिद्धासनस्थ, द्विभुज, वराभयकर अशा त्या पितळेच्या मूर्तीचा खर्च त्या काळांत २०-२५ रु. झाला. शास्त्रीबुवांनीं जवळचा एक रुपया त्या ओताऱ्याला दिला. पण देवांना त्यांना ह्या कर्जांत ठेवायचें नव्हतें. त्या वेळीं तिथें जमलेल्या कांहीं कारकून मंढळींनीं वर्गणी करून त्या मूर्तीचे पैसे त्या सोनाराला देऊन टाकले!

मूर्ति तर मिळाली. आतां तिची सोय केली पाहिजे असा विचार करीत बुवा घरीं येत असतां त्यांच्या घराच्या पश्चिमेची एक जागा त्यांना मूर्तिस्थापनेला योग्य वाटली. पण ती जागा आपली नसल्यानें बुवा स्वस्थ राहिले. तरी दत्तप्रभु थोडेच स्वस्थ राहणार? त्या जागेच्या विधवा मालकिणीला ती जागा ब्राह्मणाला दान देण्यासंबंधीं स्वप्न झालें वत्या स्वप्नाचा अर्थ

विचारायला ती नेमकी बुवांच्या मातुःश्रींकडेच आली. साहजिकच रमामातुःश्रींनीं ती जागा वासुदेवानें आणलेल्या मूर्तीच्या स्थापनेसाठीं देण्याचें सुचविलें. त्याप्रमाणें त्या स्त्रीनें ती जागा मंदिरासाठीं दिला व पुढें देवळाच्या खर्चासाठीं आणखीहि थोडी जवळची जमीन दिली.

अशा रीतीनें जागेचा प्रश्न सुटल्यावर बुवांनीं लागलीच मंदिराच्या बांधकामाला सुरुवात केली. त्यासाठींहि दगड, विटा इ. साहित्य भराभर जमून सात दिवसांतच देऊळ बांधून तयार झालें. तेव्हां देवांनींच समोर एक जागा दाखवून तिथें विहीर खोदायला सांगितली. तीहि तीन दिवसांत बांधून झाली. या पूर्वाभिमुख देवळाचें गर्भगृह शास्त्रीबुवांनीं स्वहस्तें विटा तयार करून बांधलें. अशा रीतीनें मंदिर सिद्ध होतांच वैशाख शुक्ल ५, शके १८०५ रोजीं कागलच्या दत्तमूर्तीची स्थापना त्यांत यथाविधि करून नित्य यथासांग पूजाअर्चा सुरुं केली.

श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनाच्या या कालखंडांत श्रीदत्तप्रभूंनींच त्यांना आपल्याकडे ओढलें असें दिसतें. त्यांचें मनमोहन रूपच विशेषेंकरून श्रीमहाराजांच्या अनुभवाला आलेलें आढळतें. शास्त्रीबुवांना दत्तोपासनेंत स्थिर करून, पदोपदीं, प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीत्या त्यांच्या शंकांचें व अडचणींचें निवारण करून, श्रीदत्तप्रभूंनीं शास्त्रीबुवांच्या चित्तांतच नव्हे तर गांवांतहि घर केलें. देवच भक्ताचा अनुनय करीत असल्याचें चित्र या काळांत आपल्याला दिसतें. यानंतरच्या काळांत मात्र श्रीदत्तप्रभु व श्रीमहाराज यांच्या संबंधांतले कांहीं वेगळेच पैलू प्रकट झालेले आपल्याला दिसतात..

।। श्रीगुरुःशरणम्।।

## प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामीमहाराज व श्रीदत्तप्रभू अर्च्य-अर्चक भाव.

मागील लेखांत आपण प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती (टेंबे)स्वामीमहाराज व त्यांचें परम आराध्य अनंतकोटिब्रह्मांडनायक, भक्तवत्सल भक्ताभिमानी राजाधिराज श्रीदत्तप्रभू यांच्या परस्परसंबंधांतला एक पैलू पाहिला. अनेकजन्मसंसिद्ध अशा आपल्या प्रिय भक्ताला तो परमपिता आपल्याकडे कसे आकर्षतो व बुद्धियोगाचें दान करून त्याला आपल्या भक्तीच्या वाटेवर अग्रेसर करतो तें आपण थोडक्यांत पाहिले. तसेंच वाडीहून येतांना कागलच्या मूर्तिकाराकडून हवी तशी दत्तमूर्ति करून घेऊन श्रीवासुदेवशास्त्रीनी(तेव्हां प्रचलित संबोधनानुसार बुवानी) माणगांवला येऊन त्या मूर्तीची यथाविधि स्थापना स्वनिर्मित मंदिरांत कशी केली तेंहि पाहिले.

अशा रीतीने मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झल्यावर ह्या दिव्य गुरुशिष्यांच्या संबंधातला प्रकर्षाने आविर्भूत झालेला दुसरा पैलू म्हणजे अर्च्य-अर्चक भाव जाणवतो. यांतूनच श्री थोरल्या महाराजांनी मूर्तिपूजेचा एक आदर्शच आपल्यासमोर उभा केला. प्रतिमापूजन हा वैदिक धर्माचा एक महान विशेष आहे. घरांघरांतून, असंख्य क्षेत्रांतून, तीर्थस्थानांतून विधिवत् स्थापन केलेल्या विविध प्रतिमांचें पूजन शेकडो वर्षांपासूनच काय पण हजारो वर्षांपासून परंपरेने चालत आले आहे. ह्या मूर्ती पिढ्यान् पिढ्या कोट्यवधि भक्तांच्या श्रद्धेचे स्थान झालेल्या आहेत. ह्या असंख्य भक्तांची जीवने दैवी प्रकाशाने उजळून टाकली आहेत. भारतांतील आध्यात्मिक परंपरांचा आधार आणि स्रोत असलेलीं हीं मंदिरे आपल्या संस्कृतीचा जणूं कणाच आहेत. मूर्तिभंजकांच्या हजार वर्षांच्या राजवटींतूनहि टिकून राहिलेले हे दीपस्तंभ आजहि भारतीय आबालवृद्ध जनतेचे मार्गदर्शन करीत आहेत. तेवढ्यासाठींच स्वामी विवेकानंदांनी ह्यांना आध्यात्मिक ऊर्जास्रोत (spiritual powerhouses) असें म्हटले आहे. 'काष्ठपाषाणादिक मूर्तींचे पूजक' असा उपहास करणाऱ्या परधर्मीयांनाहि ह्या स्थानांतून हृदयपालट करणारे अनुभव आलेले आहेत. पण ह्या सर्व परंपरांमागें असलेले शास्त्र मात्र आज दुर्लक्षित झालेले दिसते. त्यामागचा शास्त्रीय विचार न कळल्याने ही सगळी अंधश्रद्धा आहे असे म्हणणाऱ्यांची संख्या वाढत आहे. सर्वव्यापी, निराकार आणि निर्गुण परमात्माच भारतीय अध्यात्माचा आणि तत्त्वज्ञानाचा पाया आहे. बऱ्याच लोकांना प्रतिमापूजा ह्या भूमिकेशी विसंगत वाटते. ह्याविषयीं प.प.श्रीस्वामीमहाराज द्विसाहस्रीच्या २३ व्या अध्यायांत

म्हणतात-

**स्थूलाक्षराल्लिपिज्ञानं शिशोरिव परात्मनः।**
**गुरूक्तार्चाकल्पनया हृत्स्थैर्याद्‌बोध उद्‌भवेत्।।२३।।**
**सतोऽम्ब्वाद्येऽपि बिम्बस्य प्रतीतिर्न मलान्विते।**
**तथात्मनो न मलिने प्रतीतिः सा तु निर्मले।।२४।।**

लहान मुलाला मोठ्या अक्षरांच्या साह्याने लिपिज्ञान होते त्याचप्रमाणें गुरूक्त स्थूल मूर्तीच्या पूजनाने चित्त स्थिर झाल्यावर सूक्ष्म (ईश्वरी) ज्ञान प्रकट होते. ह्याविषयीं दृष्टांत देतात की जलादिकांत (किंवा आरशांत) आपले (प्रति)बिम्ब उमटले असले तरी त्या जलाच्या (वा आरशाच्या) मालिन्यामुळे ते (स्पष्ट) दिसत नाही. तेच जल वा आरसा स्वच्छ केला की स्पष्ट दिसायला लागते. तसेच जन्मजन्मांतरांच्या वासनारूपी मलिनतेमुळे झांकोळलेले परमात्मज्ञान चित्तशुद्धीनंतर प्रकाशते. ह्याचाच अर्थ असा की मूर्तिपूजा ही चित्तशुद्धिद्वारा परमेश्वराच्या दर्शनाला कारणीभूत होते. जड इंद्रियांना अगोचर अशा परमेश्वराची उपासना सर्वसाधारण मनुष्याला फार कठिण आहे. त्याने सगुण साकार परमेश्वराचीच आराधना करावी. त्यानेहि तीच गति मिळते हा विचार गीतेच्या १२ व्या अध्यायांतहि आला आहे.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहमद्‌भिरवाप्यते।।५।।**

अर्थात् पूजेसाठीं प्रतिमा कशी असावी, तिची स्थापना कशी करावी, पूजन कसे करावे ह्या सर्वांची विस्तृत, अनेकविध विधाने आपल्या स्मृतिपुराण-तंत्रादि ग्रंथांत आलेली आहेत. ह्या सर्वांचे अभ्यासक वरचेवर कमी होऊन हे ज्ञान लुप्तप्राय झाल्यानेच की काय श्रीस्वामीमहाराजांच्या द्वारा मूर्तिपूजेचा यथार्थ आदर्श श्रीदत्तप्रभूंनी आपल्यापुढे ठेवला आहे. मूर्तिपूजेचे एक प्रमुख उद्दिष्ट, त्या मूर्तीच्या माध्यमांतून त्या त्या देवतेशी संपर्क साधणें हा आहे. त्यासाठीं पूजनीय प्रतिमेंत त्या देवतेचा आविष्कार होणे नितान्त आवश्यक आहे. हा दैवी आविर्भाव होण्यासंबंधीं एक आधारभूत श्लोक असा आहे.

**अर्चकस्य तपोयोगाद् अर्चनस्यातिशायनात्।**
**आभिरूप्याच्च बिम्बस्य देवः सान्निध्यमृच्छति।।**

शिला, काष्ठ, लोह, लिपित, लिखित, वालुका, मनोमयी, मणिमयी अशा अष्टविधा प्रतिमांमध्यें देवतेचे सान्निध्य येण्यासाठीं तीन मुख्य गोष्टींचे महत्त्व सांगितले आहे. अर्चकाचे तप, अर्चनाचे सातत्य आणि प्राचुर्य, व मूर्तीचे सौंदर्य हे तीन घटक होत. पैकीं श्रीमहाराजांना इष्ट असलेली मूर्ति तर प्राप्त झाली होती व अर्चकहि स्वतः महाराज तपोमूर्तीच होते. उरली ती अर्चनाची

समृद्धता. तेव्हां बुवांनी मूर्तीच्या स्थापनेनंतर पूर्वीपेक्षांहि अधिक उत्साहाने आणि तत्परतेने अनुष्ठान चालूं ठेवून व मूर्तीच्या पूजनाला आरंभ केला.

बुवा देवळांतच राहूं लागले. पहाटे चार वाजतां उठून प्रातःस्मरण, योगाभ्यास, प्रातर्विधि व स्नानसंध्या उरकून श्रीदत्तमूर्तीची पूजा करावयाची. पूजेसाठीं लागणारी फुले तुळशी इत्यादि स्वतः तोडून आणायचीं. देवळाच्या पाठीमागे त्यासाठीं कांहीं झाडे लावली होती. त्यांची मशागत विद्यार्थ्यांकडून करून घ्यायचे. पुष्पादिकांचे चयन करतांना ".....**वर्ज्यं पर्युषितं सुमम्। सच्छिद्रं जन्तुयुक् शीर्णं कीटाद्यात्तं स्वयं च्युतम्**।।१८:१३८।।" या द्विसाहस्रीतील त्यांच्याच वचनाप्रमाणें, शिळीं, सच्छिद्र, कीटादींनी खाल्लेली किंवा आपोआप पडलेली फुले देवपूजेसाठी वर्ज्य होती.

आरंभी रोज रुद्राच्या एकादष्णीने अभिषेकाचा नियम होता. पुढे कामाचा वाढता व्याप लक्षात घेऊन देवांनीच एकच आवर्तन करण्याची आज्ञा केली. तरीहि  वेळ अपुराच पडल्याने देवांनी केवळ पुरुषसूक्तानेच अभिषेक करायला सांगितले. पूजादि सर्व कर्मे श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच होत असत. कांहीहि शंका आली तर ती देवांनाच विचारायची. त्यांचे समाधान स्वप्न वा जाग्रतींत आदेश मिळून व्हावयाचे. पूजेत सर्व उपचार यथाशास्त्र, यथाविधि सपर्पण करण्याचा बुवांचा कटाक्ष होता. एक वर्षभर रोज नवे जानवे तयार करून देवाला वाहण्याचा नियम अविच्छिन्न चालविला. बुवा माणगांवी नसताना, त्यांचे बंधू वे.मू. हरीभटजी पूजा करीत. पुढे बुवांनी माणगांव सोडल्यानंतरही पूजेअर्चेचे कार्य हरीभटजींनीच चालविले.

सुरुवातीला ते भोजनासाठीं घरीं जात. पण माणगांवीं पहिला गुरुद्वादशीचा उत्सव झाल्यावर तेहि बंद करून त्यांनी सकाळीं कोरान्न भिक्षा मागून स्वतः अन्न शिजवावे. त्यासाठी लागणारे जळणहि स्वतःच गोळा करायचे. त्या अन्नांतूनच नैवेद्य, वैश्वदेव, गोग्रास, अतिथि यांचे विभाग करून उरलेल्या अन्नाने भोजन करावे. भोजनोत्तर भांडी स्वतःच घासावी. अशा रीतीने 'स्वयंदासास्तपस्विनः' या वचनाचे जणू प्रात्यक्षिकच चालले होते.

दुपारच्या वेळीं विद्यार्थ्यांचे शिक्षण, फुलझाडांची मशागत, कुणाचे कांही प्रश्न असल्यास त्यांचे समाधान करून बुवा पुराण सांगत. संध्याकाळीं स्नानसंध्या करून देवापुढे धूप घातला जाई. यानंतर आरती. मंत्रपुष्प व शेजारती करून देवांना पलंगावर निजविण्यांत येई. मग सवडीप्रमाणे ग्रंथवाचन, योगाभ्यास झाल्यावर बुवा देवळांतच झोंपत. बुवांच्या पत्नी सकाळी देवळांत येऊन सारवण-रांगोळी करून जात व पुन्हां दुपारीं जेवणाच्या आधी देवदर्शन

करून तीर्थप्रसाद घेऊन जात. याव्यतिरिक्त त्यांचा व बुवांचा संपर्क नव्हता. माणगांव सोडण्याच्या आधीं वर्षभर गृहस्थाश्रम करण्यास देवांची आज्ञा झाल्यावरच त्या रात्रीं देवळांत झोंपायला येऊं लागल्या.

देवळांत ठेवलेल्या कागलच्या मूर्तीव्यतिरिक्त एक **उत्सवमूर्ति** पालखीसाठी सावंतवाडीस केली होती. तेथेच पालखी चवरी, मोरचल, काठ्या इत्यादि पालखीचे सामानहि करून आणले. ह्या उत्सवमूर्तीच्या अर्चाविधीच्या (प्राणप्रतिष्ठा) वेळी आणावकर समंधाच्या माध्यमातून असा शास्त्रार्थ कळला की माणगांवच्या देवळांतील यथावत् पूजनामुळे तसेच बुवांच्या तपाचरणाने तिथे देवाचा वास असल्याने वेगळा अर्चाविधि करण्याची गरज नाही. त्यानुसार फक्त कागलच्या मूर्तीला या नव्या मूर्तीचा स्पर्श करून महापूजा केली. दर शनिवारी व उत्सवप्रसंगी ह्या उत्सवमूर्तीची पूजा होत असे. (ही उत्सवमूर्तीच सध्यां माणगांवच्या देवळांत आहे.)

याशिवाय देवांच्या आज्ञाने एक छोटीशी **प्रवासी मूर्ति** माणगांवच्याच एका सोनाराकडून करून घेतली. प्रवासांत सर्व उपचार करण्यातील बुवांची अडचण लक्षात घेऊन 'मला फक्त स्नान घालून भस्म लावले की पुरे. बाकीचे उपचार नसले तरी चालतील' असे देवांचे सांगणें झाले. याखेरीज देवळांत ठेवलेला व पालखीच्या वेळीं डोक्यावर घ्यायला असे **दोन पादुकाजोड**हि होते.

सावंतवाडीचे पोलीस अधिकारी कंटक यांनी देवाला एक **सोन्याचा मुकुट** केला. त्यांनी तसा नवस केला होता व पैसेहि काढून ठेवले होते. फिरतीवर जावे लागल्याने ते कार्य लांबले. देवांनी बुवांच्या मार्फत ते फिरतीहून आल्यावर त्यांना स्मरण देऊन मुकुट करवून घेतला. नारोपंतांनी एक **चंदनी पलंग** देवाला निजायला केला.

देवालयासमोर एक **औदुंबर वृक्ष** स्वयंभूच प्रकट झाला. तो मोठा झाल्यावर त्याला पार बांधून पादुकांची स्थापना केली. तेथेहि नित्य पूजा होई. लोकांचे अभिषेक, पूजा इत्यादि या पादुकांवरच होत. देवालयांतील मूर्तीशी इतरांचा संबंध नसे. तसेच २५-३० कुत्री व २-४ गाईहि देवळांत होत्या व त्यांच्या सेवेला एक सेवेकरी पण होता.

एकंदरींत माणगांवच्या मंदिराची सर्व व्यवस्था वाडी, औदुंबर, गाणगापूर इत्यादि दत्तसंस्थानांप्रमाणे झाली. नैमित्तिक उत्सवहि थाटामाटाने चालू होते. दर शनिवारी पालखीचा सोहळा अत्यंत हृद्य व प्रेक्षणीय होत असे. चार-पाच हजारांपर्यंत भक्तजन त्यांत सहभागी होत. स्तोत्रे, पदे इत्यादींच्या घोषांत तीन प्रदक्षिणा होण्यास ५-७ तास लागत. भक्तांनी समर्पिलेल्या पेढे, बर्फी, नारळ, खारीक, उदबत्ती, कापूर वगैरे वस्तूंचे डीगच्या ढीग पडत. ते

सर्वांना प्रसाद म्हणून वाटले जात. धान्यादि विशेष आल्यास भंडाराहि व्हायचा. बुवांचे मात्र या सर्व व्यावहारिक बाबींकडे फारसे लक्ष नसे. ते काम सावंतवाडीचे नारोपंत उकिडवे यांच्याकडे होते. आणावकर, सबनीस वगैरेहि त्यांना साह्य करीत. बुवा फक्त पूजा-अर्चा वगैरे नित्य नियमांकडेच लक्ष देत. देवापुढे येणाऱ्या उत्पन्नांतील रुपयापेक्षां अधिक उत्पन्न वाडीला पाठविले जाई; माणगांवचे देवस्थान वाडीच्या अंतर्गत आहे अशीच बुवांची भावना होती. रुपयाच्यापेक्षा कमी उत्पन्नच माणगांवच्या खर्चासाठीं ठेवले जाई. बुवांच्या घरची आर्थिक ओढगस्त असूनहि देवापुढील वस्तूंचा वा द्रव्याचा लोभ बुवांना यत्किंचित् नव्हता. मात्र सर्व मंडळींच्या आग्रहाने दत्तमूर्तीपुढील उत्पन्नाचा चौथा हिस्सा घरी दिला जाई.

देवळांत गृहस्थाच्या घरासारखे सर्व सणवार साजरे होत. स्त्रियांसाठीं हळदी-कुंकू, ओटी भरणे वगैरे असे कार्यक्रम बुवा हौसेने करवून घेत. रात्री देवापुढे भजन होई. त्या वेळीं बुवा प्रेमभराने नाचत असत.

बुवांच्या अर्चनांत यत्किंचत्हि न्यूनता येऊं नये यासाठी प्रत्यक्ष दत्तप्रभूच दक्ष होते. बुवांच्या कांटेकोर नजरेतूनहि क्वचित् एखादी गोष्ट सुटली तरी दत्तप्रभू ती लगेच दाखवून देत. एकदा पूजा झाल्यावर 'सूत, सूत, काढून टाक' असा आवाज आला. त्या वेळी नाही तरी दुसरे दिवशी निर्माल्य काढतांना एका फुलांत गुंतलेले सूत पाहिल्यावर बुवांना त्याचा अर्थ समजला. नंतर प्रासादशुद्धि केली. एकदा बुवांनी फार श्रम झाल्याने नित्यक्रम थोडक्यांत आवरला तेव्हां ते देवांना न आवडून वुवांना विंचू चावला. तेव्हांपासून बुवांनी नित्यक्रमांत कधीहि ढिलाई केली नाही.

देवळांत अस्पृश्य स्त्रियांना मज्जाव होता. पण एकदा एक पिशाचपीडित सेवेकरी स्त्री देवळांत प्रदक्षिणा घालतांनाच अस्पृश्य झाली. ह्याच्या परिणामीं देवळांत सर्वत्र साप, विंचू इत्यादींचा प्रादुर्भाव झाला. २-४ दिवस त्रास झाल्यावर उदकशांति केल्यावर उपशम झाला.

एकदा बुवा पूजेला देवाजवळ गेले असतां 'शिवाशिव' एसा शब्द आल्याने बाहेर जाऊन पुन्हा आल्यावरहि बुवांना अशौच असल्याबद्दल देवांचे स्पष्ट सांगणें झाले. पुढे विचारणा केल्यावर त्यांच्या दशाहांतील एका आप्त महिलेचा मृत्यु झाला होता. पण दत्तजयंतीचा उत्सव बंद पडेल या भीतीने त्यांना भेटायला गेलेल्या सीतारामभटजींनी (बुवांचे बंधू) ही बातमी माणगांवीं कळविली नव्हती. शेंवटी तो उत्सव राहिलाच.

एकदां एका शिकरणांतील नरोटीचा तुकडा नैवेद्याच्या वेळीं देवांनी

काढायला सांगितला. मंडळींना तो तुकडा संपडायला शिकरण हळूंहळूं दुसऱ्या पातेल्यांत ओतावी लागली. नारोपंतांनी आणलेले आंबे आंबट आहेत हे देवांनी नैवेद्य दाखवितांनाच सांगितले. पहिल्या गुरुद्वादशीला पुरणपोळ्यांचा नैवेद्य दाखवतांना तूप घालायचें राहिले तेव्हां बुवांच्या घशांत घास अडकल्यासारखे होऊन बराच त्रास झाला. आणखी एका प्रसंगी तुपाशिवाय नैवेद्य दाखवला गेल्याने बुवांच्या पाठींत बुक्क्यांचा मार बसला होता. दिवाळीच्या वेळी देवाला सर्वांनी दहीपोह्यांचा नैवेद्य दाखविला; त्यांत बुवांच्या घरचे पोहे इतर कुणाच्या तरी नजरचुकीने कोरडेच मिसळले गेले. तेव्हां देवांनी बुवांना 'आज आम्हांला कोरडे पोहे कां खाऊं घालतां' असे विचारले. परिणामीं प्रत्यक्ष चूक नसतांहि बुवांच्या मातुश्रींचा गळा सुजला. देवांची क्षमा मागतांच तो त्रास कमी झाला.

पुढें संन्यासाश्रमांतहि वाडीला पादुकांवर लोकांनी दिवाळीत कढत पाणी घातल्याने स्वामीमहाराजांच्या मूत्रद्वारे रक्तस्त्राव झाला होता. त्यानंतर वाडीला देवावर घालण्यापूर्वी पाणी फार कढत नाहीं याची खातरजमा करण्यांत येऊं लागली. तसेच कुरुगड्डीला महाराज समाधींत असतांना त्यांच्या हातांत देवांनी मृत चिमण्या, पक्ष्यांची अंडीं, विष्ठा इत्यादि पदार्थ टाकून आपल्या समाधीच्या दुरवस्थेची जाणीव करून दिली होती. नंतर महाराजांनी देवळाच्या छताची दुरुस्ती करून सगळा बंदोबस्त केला. यावरून योग्य अर्चक असेल तर देवहि त्याचे 'न्यून ते पुरते' करून घेतो हे स्पष्ट होते.

अशा रीतीने, अत्यंत तत्परतेने, भक्तिप्रेमाने, अनासक्तीने, शास्त्रोचित रीत्या होणाऱ्या निरंतर अर्चनाने तेथे ईश्वरी अस्तित्वाची प्रचीति नित्य येत असे यांत काय आश्चर्य? शनिवारच्या पालखीच्या कार्यक्रमाचे वर्णन मागे आले आहेच. ग्रामदैवत यक्षिणीची पालखीहि या उत्सवांत सहभागी होत असे. प्रथम तेथील व्यवस्थापकांचा याला विरोध होता; पण बुवांनी देवीची प्रार्थना केल्यावर व्यवस्थापकांना देवीने दृष्टांत देऊन आपली स्वारी शनिवारच्या पालखीला नेण्यास सांगितले.

श्रीमंत किंवा गरीब, आर्त वा अर्थार्थी, क्वचित् जिज्ञासू अशी सर्व लोकांची तेथे सेवा करतांच कार्यसिद्धि होऊं लागली. (यांतील कांहीं उदाहरणे आपण 'लोकसंग्रह' या लेखांत पाहिली आहेत.) त्यामुळे तेथील प्रसिद्धी वाढून लोकांची खूपच गर्दी होऊं लागली. उत्सवासारख्या प्रसंगी दहा दहा हजार मंडळीं जमायला लागलीं. बुवांच्या स्वतःच्या साधनेलासुद्धां वेळ मिळेना. तेव्हां बुवाच्या प्रार्थनेवरूनच देवांनी दोन वर्षांनी 'हा बाजार बंद केला'.

अर्थात्च आसपासच्या कांहीं मंडळींना याचा हेवा वाटून त्यांनी

बुवांप्रमाणे प्रसिद्धि मिळावी ये हेतूने तेथे तेथे दत्तमंदिरांची स्थापना केली. पण अर्चकाचा तपोयोग, भावाची शुद्धता किंवा अर्चनाची प्रचुरता यांचा अभाव असल्याने देवाचे सान्निध्य तर दूरच पण त्या दांभिक मंडळींना तुरुंगवास, वेड लागणे इत्यादि शिक्षा झाल्या. असेच एक मंदिर माणगांवांतीलच साधल्यांचे होते. त्यांच्या सुनेच्या प्रसूतींत बाधा येऊन ती आसन्नमरण झाली तेव्हां मात्र ते आर्त होऊन बुवाना शरण आले. बुवा अनुष्ठान आवरून त्याच्याकडे जातांना वाटेवरच देवांनी, 'आता जाऊन उपयोग नाही मागे फिरा' असें सांगितले. तेव्हां साधल्यांना बुवांनी निरोप देला. साधले घरी पोहोचण्यापूर्वीच सून मृत्यु पावली होती.

माणगांवच्या देवस्थान अतिशय जाग्रत असल्याचे सांगतांना बुवांनी तेथे देवाबरोबर 'त्यांचे गणच फक्त असून, योगिनी आदि परिवार देवता नाहीत त्यामुळे सगळ्यांचीच कामे इथे त्यांच्या इच्छेप्रमाणें होणार नाहीत' असेहि सांगितले होते. माणगांवच्या उत्सवांतील गर्दीचा फायदा घेऊन कांहीं लोक चोरीचा प्रयत्न करीत. अशा कांही प्रसंगीं बुवांनी देवाच्या गणांच्या मदतीने चोरी पकडून चोरलेले जिन्नस मालकाला परत देववावेत. माणगांव सोडून वाडीला जाताना वाटेत ह्याच गणांनी बुवांची वाट अडविणारी एक बैलगाडीच उलटविली. गाडी मोडून त्या गाडीवानाला दुखापत झाली. तेव्हां वाडीला जाताच ह्या गणांना देवांच्या स्वाधीन करण्याचा बुवांनी निश्चय केला.

अशा प्रकारे सात वर्षे माणगांवमध्यें नित्यश्रीर्नित्यमंगलम् असें श्रीदत्तप्रभूचे वास्तव्य असंख्य भक्तजनांनी अनुभवले. चांद्रमानाने सात वर्षे होतांच बुवांना माणगांव सोडण्याची आज्ञा झाली. देव व कुटुंब बरोबर घेण्यास सांगितले. त्याप्रमाणे पूजेतील कागलची मूर्ति बुवांनी बरोबर नेली. माणगांवीं उत्सवमूर्तीने तिची जागा घेतली व वे.मू.हरीभटजी तिची पूजाअर्चा करूं लागले. अर्थात् तेथील देवस्थानाचे महत्त्वहि कमी झाले. कालांतराने टेंबे यांच्या सर्वच कुटुंबियांचा क्रमाक्रमाने अंत झाला. महाराजांनी भाकीत केल्याप्रमाणे घराच्या ठिकाणी धर्मशाळा झाली. देवळाचे बांधकाम महाराजांच्या परमभक्त इंदूरच्या महाराणी सौ.इंदिराबाई होळकर यांनी पुरे केले आणि शके १८६० मध्ये वैशाख शु।।१३ ला श्रीक्षेत्र काशी येथील श्रीब्रह्मानंदसरस्वती यांच्या हस्ते श्रीदत्त, श्रीशंकाराचार्य, श्रीसरस्वती व प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामी महाराज यांच्या मूर्तींची स्थापना केली. तेव्हांपासून या देवस्थानाचा कारभार विश्वस्तमंडळाकडे आहे.

श्रीस्वामीमहाराजांनी माणगांव सोडतांना पूजेतील कागलच्या

मूर्तीशिवाय प्रवासी मूर्ति बरोबर घेतली होती. संन्यासानंतरहि ह्या दोन्ही मूर्ती त्यांच्याजवळच होत्या. पहिल्या चातुर्मासानंतर महाराज सारंगपूर या गावां आले असतां, तेथील गोविंदरावांनी मोठी मूर्ति महाराजांना पूजेसाठी मागितली. तेव्हां महाराजांनी त्यांना 'यांतील कोणतीही मूर्ती तुमच्या उपयोगी नाही' असे सांगितले. तसेच ह्या मूर्ती जिथे जाईल त्या घराचा व गांवाचाही नाश होईल अशी धोक्याची सूचनासुद्धां दिली. तरी पण महाराजांच्या आज्ञेकडे दुर्लक्ष करून गोविंदरावांनी एक लहान देऊळ बांधून ती मूर्ति त्यांत नेऊन ठेवली. परिणामस्वरूप लवकरच त्यांचा मुलगा वारला. पुढे गोविंदरावही आजारी पडले. त्यानंतर कांही वर्षांनी, मूर्तीने आपल्या बढवाईच्या श्रीवासुदेव दत्तमंदिरांत पोंचविण्याचा स्वप्नदृष्टांत त्यांना दिला. त्याच वेळी बढवाईच्या मंदिरांतील लक्ष्मणबुवा पुजाऱ्यांनाही सारंगपुराहून ही मूर्ती आणण्याबद्दल स्वप्न झाले होते. त्याप्रमाणे त्यांनी ती मूर्ति सारंगपुराहून आणून बढवाईच्या दत्तमंदिरांत ठेवली.

दुसरी प्रवासी मूर्ति शके १८२५ पर्यंत श्रीस्वामीमहाराजांजवळ होती. तिची फारच जपणूक महाराजांना करावी लागे. शके १८१९च्या पेटलाद येथील चातुर्मासानंतर दिवाळींत ह्याच मूर्तीने अभ्यंगस्नानाचा हट्ट धरला व महाराजांनी तिकडे दुर्लक्ष केल्यावर ती मूर्ति नैवेद्याच्या वेळीं रुसून नदींत जाऊन बसली. मोठ्या मिन्नतवारीने तिला बाहेर काढून महाराजांनी तो अभ्यंगस्नानाचा हट्ट पुरविला. ही हकीकत पुढे आपण इतरत्र पाहणार आहोंत.

ब्रह्मावर्तास एका अभिमानी शास्त्रीबुवांच्या आग्रहाने ती मूर्ति गंगेच्या पाण्यांत सोडून दिली. परंतु कांठावर येतांच, '**ही मूर्तीच आम्हांला सोडत नाही**' या महाराजांच्या म्हणण्याप्रमाणें ती मूर्ति महाराजांच्या पुढ्यांत आलेली त्या शास्त्रीबुवांनी पाहिली व त्यांचा अभिमान गेला. १८२५ साली ब्रह्मावर्तींच महाराज या मूर्तीची कांहीं सोय करावी असा विचार करत होते तेवढ्यांत ती मूर्ति रुसून गंगेंत जाऊन बसली. महाराजांनी एक उपाधि कमी झाल्याने सुटकेचा निःश्वास टाकला न टाकला तोंच गंगेकडून लहान मुलाच्या रडण्याचा आवाज आला. ऐकून महाराज तिथे पाहतात तर ती मूर्ति हजर!

यानंतर मूर्तीची व्यवस्था करण्याचा विचार महाराजांनी सोडला. एकदा ह्या उपाधीला त्रासून ते सहज म्हणाले, 'ही मूर्ति कोणी चोरून कां नेत नाहीं'. हे ऐकून त्या वेळीं जवळ असलेल्या वेंकटय्या (धाकटे व्यंकटबुवा ब्रह्मचारी) नांवाच्या भक्ताने ती मूर्ति खरेच चोरली. हें महाराजांच्या लक्षांत येतांच महाराजांनी त्याला 'नुसती मूर्ति मिळाली म्हणजे काम झाले असे नाही. ती नीट

जपली पाहिजे. फुकटचा हत्ती मिळाला तरी तो पोसण्याची शक्ति नसेल तर काय उपयोग?' असा सावधगिरीचा इशारा दिला. त्याच वेळीं महाराजांनी असेंहि सांगितले की "**ही मूर्ति जेथे जाईल त्याच्या सर्वस्वाचा नाश होईल. कारण आपणाइतकी पाळणूक कोणाकडूनहि होणार नाही.**". त्यानुसार वेंकटय्या मंडलेश्वर येथे त्या मूर्तीची पूजा करीत आमरण राहिला. त्याच्या मृत्युनंतर मूर्तीची हकीकत अज्ञात आहे.

वरील वृत्तान्तावरून प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती- स्वामीमहाराजांनी अर्चनाभक्तीची श्रेष्ठ आदर्श आपल्यासमोर कसा ठेवला याची थोडीफार कल्पना येईल. त्यासाठी लागणारी तपःपूतता, भावशुद्धता, निरलसता आणि अनन्य शरणागति आपल्या जीवनांत अंशतः तरी यावी हीच श्रीस्वामीचरणीं प्रार्थना करून ह्या लेखाचा समारोप करूं या.

# प.प.श्रीमद्वासुदेवानन्दसरस्वती स्वामीमहाराज आणि श्रीगुरुदेव दत्त - गुरुशिष्य संबंध

श्रीवासुदेवशास्त्रींची परमार्थसाधना पूर्णत्वाला नेऊन त्यांना योगसिद्धीच्या परमोच्च धीशिखरावर आरूढ करून, वेदान्ताचे अन्तिम साध्य जो आत्मसाक्षात्कार, तो करतलामलकवत् उपलब्ध करवून, त्यांच्या जीवनाच्या धर्मसंस्थापनेच्या उद्दिष्टाच्या अधिकाराची म्हणजेच संन्यासाश्रमाची, प्रतिष्ठापना करणे हाच, माणगांवला सात वर्षांचे वास्तव्य करण्यांत श्रीदत्तप्रभूंचा मुख्य उद्देश्य असावा. एकीकडे माणगांव एक महान् दत्तस्थान झाले होते आणि तिथे नित्यश्रीर्नित्यमंगलम् असे श्रींचे वास्तव्य हजारो भक्तजनांना अनुभवास येत होते तर दुसरीकडे त्याच वेळी श्रीमहाराजांची साधना प्रखरतर, प्रखरतम अशा अवस्थांतून परिणत होत चालली होती. हे सर्व श्रीदत्तप्रभूंच्या प्रत्यक्ष मार्गदर्शनाखाली चालले होते. श्रीमहाराज एक कारणिक पुरुष होते हे त्यांच्या जीवनपटावरून स्पष्टच आहे. अर्थात् त्यांची पूर्वजन्मीची साधना मोठीच असणार. त्यामुळेच अगदी लहान वयांतच श्रीदत्तकृपेची सांवली त्यांना लाभली. एवढेच नाही तर श्रीदत्तप्रभूंचे सान्निध्य माणगांवच्या मंदिराच्या निमित्ताने प्राप्त झाले. असे असले तरी माणगांवच्या ह्या सात वर्षांत त्यांच्याकडून अत्यंत कठोर तपश्चर्या व साधना श्रीदत्तप्रभूंनी करून घेतलेली दिसते. तिची पूर्ण कल्पना आपल्याला येणे अशक्यप्राय आहे. तरीहि त्या वेळी घडलेल्या घटना, जेवढ्या ईश्वरी इच्छेने आपल्यापर्यंत पोंचल्या आहेत त्यावरून थोडाफार मागोवा घेण्याचा हा प्रयत्न आहे.

मागील अंकांत श्रीमहाराजांनी माणगांवच्या मंदिरांत अर्चनभक्तीचा जो आदर्श निर्माण केला त्याचा विचार आपण केला. हा सर्व कार्यक्रम श्रीदत्तप्रभूंच्या वारंवार होणाऱ्या आदेशांनुसारच होत असत. आदेश कधी स्वप्नांत, कधी जागेपणीं तर कधी ध्यानावस्थेत असे अनेक प्रकारांनी व्हायचे. कांहींहि संशय आला की बुवांनी श्रींना विचारावे. लगेच उत्तर मिळत असे. साक्षात् श्रीदत्तप्रभूच मार्गदर्शन करीत असल्याने श्रीमहाराज परमार्थमार्गांत वेगाने अग्रेसर होत असल्यास आश्चर्य ते काय?

## सद्गुरू ज्ञानदाता

श्रीमहाराजांच्या पूर्वाश्रमांत ते फारसे माणगांवच्या बाहेर गेलेले

आढळत नाहीत. वाडीलाच काय ते जाणे वरचेवर होई. वेदाध्ययन माणगांवांतच वे.मू.तात्याभटजी उकिडवे व शेजारीच राहणारे वे.मू. भास्करभटजी ओळकर याच्याकडे झाला. तीव्र धारणाशक्तीने त्यांना ८-९ संथांतच सर्व मुखोद्गत होत असे. उत्तम आचार, मेध्य आहार व निष्ठेने केलेले परिश्रम ह्यामुळे वेदाभ्यास पूर्ण होण्यांत कांही अडचण नव्हती. पण पुढे प्रसंगोपात्त प्रकट झालेले वेदार्थाचे ज्ञान, वेदमंत्रांची सिद्धि व ऋग्वेदाच्या सर्व अंगोपांग व क्रम-जटा-घनादि विकृतींवरील प्रभुत्व ह्यांची उपलब्धि त्यांना कशी झाली याबद्दल अनुमानच करावे लागते. ह्याविषयीं माणगांवीं घडलेली एक घटना सूचक आहे.

माणगांवच्या दत्तमंदिरांत प्रसंगोपात्त बाहेरगांवचे वैदिकहि मंत्रपाठासाठी येत. त्या वेळी महाराजंच्या सूचनेप्रमाणे सर्व मिळूनच मंत्र म्हणत. चर्चारूपाने पठण केल्यास मत्सरादि दोषांचा प्रादुर्भाव होण्याची शक्यता असल्याने महाराजांनी ही पद्धत ठेवली होती. अशाच एका प्रसंगीं महाराजांनी सावंतवाडीचे नारोपंत उकिडवे यांना पुरुषसूक्ताचा सविस्तर अर्थ सांगितला. त्याचे नारोपंतांना आश्चर्य वाटून त्यांनी महाराजांना स्पष्टच विचारले की 'आपल्या भागांत असा अर्थ सांगणारी मंडळी दुर्मिळ असता व तुम्हीहि फारसे कुठे बाहेर गेलां नसतां, तुम्हाला वेदाचा अर्थ कसा समजतो?' यावर महाराजांनी त्यांना पुढील हकीकत सांगितली.

एकदा महाराज नरसोबावाडीहून परततांना एका गांवीं मुक्काम झाला. तेथे एक संन्यासी पूजा करीत होते. मंत्रपुष्प झाल्यावर महाराजांनी एक ऋग्वेदाचा अध्याय म्हटला. तो त्या स्वामीमहाराजांना आवडला व त्यांनी महाराजांना कीं, 'वेदार्थ समजण्याविषयी तुम्ही कांही अभ्यास केला आहे काय? नसल्यास ती दिशा आपण दाखवून देऊं'. ते मान्य करून महाराजांनी तेथे मुक्काम वाढवला. त्या स्वामींनी ऋग्वेदाच्या पहिल्या तीन अध्यायांचा अर्थ वैदिक परंपरेनुसार उत्तम सांगितला. तेवढ्या दिग्दर्शनावरून महाराजांना पुढे वेदांतील कुठल्याहि भागाचा अर्थ सहजच लक्षांत येऊं लागला. यावरून असे स्पष्ट होते कीं, 'निष्ठापूर्वक सदाचाररत सद्भक्ताला ईश्वर कोणत्याहि रूपाने भेटून घरबसल्या दिव्य ज्ञान देऊन कृतार्थ करतो.'

## चालविसी हातीं धरोनियां-

श्रीमहाराजांचा योगाभ्यास नित्य नियमाने श्रीदत्तप्रभूंच्या मार्गदर्शनाखाली चालूं होता. एकदा त्यांत कांहीं स्खलन झाल्याने श्रीमहाराजांना सारखी उचकी लागली. तेव्हां श्रीदत्तप्रभूंचा आदेश झाला की

कापशी गांवांतील एका मोजणीदारांकडे जावे. त्यांच्या घराजवळ पिंपळाचे झाड असल्याची खूणहि श्रीमहाराजांना त्यांनी सांगितली. त्याप्रमाणे श्रीमहाराज कापशीला त्या मोजणीदारंकडे गेले व आपल्या उचकीचे कारण व त्यावरील उपाय विचारण्यास श्रीदत्ताज्ञेने आपण आल्याचे त्यांना निवेदन केले. परंतु त्या मोजणीदारांनी आपण योगाच्या विषयी अनभिज्ञ असल्याचेच प्रकट केले. श्रीमहाराजांनीहि आपण देवाच्या आदेशाने आलो असून निर्णय झाल्याखेरीय परतणार नाही असा निश्चय व्यक्त करून कापशीलाच मुक्काम केला. त्या रात्रीच मोजणीदारांना देवांचा दृष्टांत झाला. दुसरे दिवशी त्यानी महाराजांना आदराने एकान्तात नेऊन त्यांना उचकीचा उपाय समजावून दिला. तसेच पुढे महाराजांच्या योगाभ्यासांला उपयुक्त असे एक कबीर-धर्मदाससंवादात्मक योगविवरणाचे पुस्तकहि त्यांना दिले.

खेचरीचा अभ्यास करतांना जिह्वाछेदनेच्या वेळी देवांनीच एक वनस्पति महाराजांना दाखविली. त्यामुळे जिह्वाछेदन सुलभ व शीघ्र होऊन खेचरीमुद्रा सिद्ध झाली. अशा रीतीने महाराजांचा योगाभ्यास लवकरच पूर्णतेला पोहोचून त्यांना अनेक योगसिद्धी प्राप्त झाल्या. त्यांच्या प्रभावाने महाराज कोणीहि व्यक्ति भेटायला आली की तिचे येण्याचे कारण ओळखून सांगत. असा प्रकार साधारण वर्षभर चालला. शेवटी देवांनी "हा काय बाजार मांडला आहेस? पुरे कर" असे सांगितल्यावर महाराजांनी तो बंद केला व पुन्हां सिद्धींकडे ढुंकूनहि पाहिले नाही.

## वज्रादपि कठोराणि....

श्रीदत्तप्रभूंचे अनुशासन फार कडक होते. आज्ञेचे पालन कांटेकोरपणे झाले नाही की लगेच शिक्षा होत असे. आजारपण आले तरी देवाच्या आज्ञेनेच घेतले तर औषध घ्यायचे, तेहि वैद्याकडील शुद्धच घ्यायचे. एकदा महाराजांना ज्वराचा त्रास सुरूं झाला. तो बरेच दिवस चालू राहिला. त्या वेळी श्वशुर बाबाजीपंत गोडे यांनी आग्रहाने बळेच महाराजांना "हे वैद्याकडचे शुद्ध औषध आहे" असे खोटेंच सांगून घ्यायला लावले. झाले! महाराजांना लगेच जोराची वान्ति होऊन ते निश्चेष्ट होऊन पडले. सर्वजण घाबरले. बाबाजीपंतांनी खोटे सांगितल्याबद्दल देवांची क्षमा मागीतल्यावरून महाराज उठून बसले. नंतर स्नान करून प्रायश्चित्त म्हणून पंचगव्य घेऊन पवमानाच्या आवृत्त्या केल्या.

असेच एकदा एक मुंबईचे शास्त्रीबुवा आले असतां त्या वेळी महाराजांना होत असलेल्या मलावरोधासाठी तूप खाण्याचा सल्ला दिला.

त्याप्रमाणे एक दिवस बुवांनी तूप खाल्ले मात्र की महाराजांना अतिसाराचा तीव्र उपद्रव सुरू झाला. तो पुढे वर्षभर चालू होता. त्यामुळे सारखे स्नान करावे लागे. अशक्तपणा एवढा आला की चालणेहि कठिण झाले. तशांतच नारायणस्वामींच्या उत्सवासाठी वाडीला जाण्याची देवांची आज्ञा झाली. महाराज गांवांतून बाहेर पडून मार्गस्थ होतांच एक मनुष्य भेटला व त्यानी त्यांची ती अवस्था पाहून त्यांना अतिसारावर औषध दिले. तेव्हां ते घ्यावे न घ्यावे असा विचार करीत असतांच देवांची औषध घेण्याची आज्ञा झाली. महाराज यावर देवांना म्हणाले, "प्रारब्धकर्माचे फल भोगलेच पाहिजे. आपल्याला औषध नको. वाडीस जाऊन येईपर्यंत विकार बंद राहिला म्हणजे झाले." पण देवांची स्पष्ट आज्ञा 'औषध घतलेच पाहिजे' अशी झाल्याने महाराजांनी औषध घेतले व वाडीहून परत येईपर्यंत अतिसार थांबला. माणगांवी येतांच तो पुन्हां सुरूं झाला. एके दिवशी देवांचे शब्द ऐकायला आले की, "तूप खाऊन बरे वाटले की नाही?", तेव्हां कुठे महारजांना कळले की देवांच्या आज्ञेशिवाय तूप खाल्ल्याची ही शिक्षा आहे. पुढे देवांच्या सांगण्याने दही खाल्ल्याने अतिसार कमी झाला तरी कोणा ब्राह्मणाने केलेल्या अभिचारप्रयोगाचे निमित्त होऊन तो आयुष्यभर महाराजांना सोसावा लागला.

मातुःश्रींचा महाराज अत्यंत आदर करीत. आई समोर दिसतांच साष्टांग नमस्कार करीत. कधीहि त्यांची अवज्ञा करीत नसत. कधीकधी देवांच्या आज्ञेविरुद्ध आईचा आग्रह झाला की त्यांचा नाइलाज होत असे. एकदा मातुःश्रींच्या तीव्र इच्छेने व इतर बंधूंनी नकार दिल्याने, महाराज त्यांच्याबरोबर महाशिवरात्रीसाठी गोकर्णाच्या यात्रेला देवांचा आज्ञा नसतांनाहि निघाले. देवांना हे न आवडून, सावंतवाडीच्या वाटेवरच महाराजांना फुरसे चावून पाय चांगलाच सुजलावठणकूं लागला. महाराजांनी त्यावर देवाचे तीर्थ घलणे व समाधी लावणे हे उपाय केले. त्याने थोडा उतार पडायचा. पण समाधी उतरली की पुन्हां वेदना वाढायच्या. कुणीतरी त्यावर लेप लावला. त्याने सूज आणि वेदना अधिकच तीव्र झाल्या. हा क्लेशदायक क्रम दोनतीन दिवस चालला. तोंपर्यंत सावंतवाडीलाच मुक्काम झाला. शेवटी मुलाच्या वेदनांनी कष्टी होऊन व 'आतां कांही महाशिवरात्रीच्या आधी गोकर्णाला जाणे होत नाही' असा विचार करून मातुःश्रींनी माणगांवीं परतण्याचा निर्णय घेतला. माणगांवी परत येतांच स्वप्नांत देवांनी महाराजांना  दुखावलेला पाय दाबून त्यांत घुसलेला दाताचा तुकडा काढून टाकला. एकदोन दिवसांनी पाय हळूंहळूं पूर्ववत् ठीक झाला.

वरील प्रसंगानंतर मातुःश्रींनी वासुदेवाला देवाच्या आज्ञेविरुद्ध कांही

आग्रह करायचा नाही असा निश्चयच केला. तरीहि एकदा कांही प्रसंगाने लाडू केले होते. आपल्या हातचा लाडू वासुदेवाने थोडा तरी खावा अशी त्या माउलीची साहजिकच इच्छा झाली. मातृप्रेमाच्या आग्रहाखातर महाराजांनी लाडूचा तुकडा तोंडात टाकला तेव्हां घास घशांतच अडकून त्यांचे डोळे पांढरे झाले. आईने पश्चात्तापाने देवांची क्षमा मागितली व पुन्हा मुलाला कोणताहि आग्रह करणार नाही असे कबूल केले तेव्हां कसाबसा तो घांस घशाखाली जाऊन महाराजांना बरे वाटले. उज्जयिनीला दंडग्रहणाचे वेळी श्रीगुरुस्वामींच्या आग्रहाने देवांच्या आज्ञेविरुद्ध मठभिक्षा घेतली तेव्हांहि महाराजांना अशाच उलट्या सुरूं झाल्या. शेवटी गुरुस्वामींनी देवांची क्षमा मागून 'पुन्हा वासुदेवानंदांना आपल्या आज्ञेविरुद्ध कांहीं सांगणार नाही' असे कबूल केल्यावर उलट्या थांबल्या. आणखीहि कांही प्रसंग आपण पुढे योग्य त्या स्थळी पाहणार आहोंत.

## शिष्यकैवारी

इतकी कठोर शिस्त लावणारे दत्तप्रभू, आपल्या या प्रिय शिष्याला यत्किंचित्‌हि न्यूनता येऊं देत नसत. याचे एक उदाहरण असे आहे. वाडीला असतांना तेथे सकाळी पादुकांना पाणी वाहण्याचा नियम महाराज कसोशीने पाळीत. पुजारी मंडळींनी एकदा हा नियम मोडायचे ठरवून रोजच्यापेक्षां लवकर पूजा करण्याचा डाव रचला. पण देवच कैवारी असल्याने त्यांनी महाराजांना स्वप्नांत महाराजांना लवकर उठून पाणी घालायला सांगितले. तेव्हां पुजाऱ्याना पश्चात्ताप होऊन त्यांनी महाराजांना सर्व हकीकत सांगितली. तेव्हां कुठे देवाच्या आज्ञेचा संदर्भ महाराजांच्या लक्षांत आला.

महाराजांच्या योगाभ्यासासंबंधी वाडीच्याच एका शास्त्रीबुवांनी माणगांवी येऊन आक्षेप घेतले व वादविवादास सुरुवात केली. महाराजांनी आपला कांही शास्त्राभ्यास झाला नसल्याने उत्तरपक्ष करण्यास आपण असमर्थ असल्याचे सांगतांच ते शास्त्रीबुवा 'जितं मया'च्या अभिनिवेशाने दुसऱ्या गांवीं गेले. तिथे ज्या धर्मशाळेत त्यांनी मुक्काम केला तिथे त्यांना एक ब्रह्मचारी भेटला व त्याने योगाभ्यासाचे महत्त्व अनेक शास्त्रीय ग्रंथांच्या आधारें सोपपत्तिक पटवून दिल्याने त्या शास्त्रीबुवांचे समाधान झाले. दुसरे दिवशी त्या ब्रह्मचाऱ्याचा शोध घेत ते परत माणगांवी आले व महाराजांना त्यांनी ती हकीकत निवेदन केली. महाराज म्हणाले, 'अहो! ते प्रत्यक्ष दत्तमहाराज होते. तुम्ही त्यांचे पाय धरण्याचे विसरलांत.'

गुरु म्हटले की परीक्षा आलीच. श्रीदत्तप्रभूंनीहि महाराजांची मधूनमधून परीक्षा पाहिलेली आहे. एकदा ध्यानाच्या वेळी एक माणूस पालखी घेऊन आला व त्यांना म्हणाला, 'आपले इहलोकीचे वास्तव्य संपले आहे. पालखींत बसा.' महाराज शांतपणे त्या पालखीत बसतांच ते दृश्य एकदम नाहीसे झाले,

पुढे एकदा ध्यानांतच देवांचे 'तुला कुष्ठरोग होणार आहे ' असे सांगणे झाले. ध्यानानंतर त्यानुसार एक हात व एक पाय बधिर झाले. तीनचार दिवसांनीहि बरे न वाटल्याने महाराजांनी देवांना विचारले तेव्हां, 'तुमचा निश्चय कसा आहे ते पाहिले' असे उत्तर मिळाले. तो विकार अर्थात्च मावळला.

## वेदान्ताभ्यास

अशा प्रकारे परीक्षून, तावूनसुलाखून, श्रीदत्तप्रभूंनी आपला हा शिष्योत्तम सिद्ध केला व त्याच्या जीवनकार्याची पायाभरणी केली. ती पूर्ण होतांच महाराजांना माणगांव सोडण्याची आज्ञा झाली. त्या आज्ञेप्रमाणे 'देव व कुटुंब बरोबर' घेऊन महाराज वाडीला आले व तेथे एक वर्ष वास्तव्य केले. सौ.अन्नपूर्णामाउली प्रसूत झाल्या पण मूलगा जन्मतःच मृत झाला. त्यानंतर ब्रह्मानंदांच्या माडीवर अतिथिसत्कारपूर्वक गृहस्थाश्रम केला.

वाडींतील वास्तव्यांत श्रीदत्तप्रभूंनी श्रीगोविंदस्वामींच्या माध्यमांतून त्यांचा वेदान्ताचा अभ्यास पूर्ण करवून घेतला. महाराजांना दशोपनिषदे सांगून त्यांनी आपला शालिग्राम व उपनिषदांच्या पोथ्या महाराजांना दिल्या. त्यानंतर महासमाधीच्या आधी श्रीगोविदस्वामींनी महाराजांकडून मनन वाचून घेतले व त्यांतील रहस्यार्थ समजावून सांगितला. यानंतर थोड्याच दिवसांत श्रीगोविंदस्वामींचे निर्याण झाले. त्यांचा समाराधना विधि श्रीमौनीस्वामींच्या आज्ञाने महाराजांच्या हस्तेच पार पडला.

## संन्यासाश्रम

पुढे लवकरच वाडी सोडून उत्तरेकडे जाण्याची आज्ञा झाली. श्रीमहाराजांनी एका पत्रात लिहिल्याप्रमाणे, "श्रींचे आज्ञेने उत्तरखंडी जाणे होत असतां गोदावरीतीरीं वैशाख वद्य १४ शुक्रवार दुपारी सौभाग्यवतीला देवाज्ञा झाली." पत्नीचे क्रियाकर्म होतांच चौदाव्या दिवशी रात्री श्रीदत्तप्रभूंनी श्रीगोविंदस्वामींच्या रूपाने येऊन प्रणवाचा उपदेश करून त्याचा जप करण्याची आज्ञा केली. तसेच 'माधुकरीचे अन्नच घ्यावे, मठभिक्षा नको' असाहि आदेश

दिला. दुसऱ्या दिवशी गोदातीरीं तेथील ब्राह्मण मंडळींना बोलावून प्रायश्चित्तविधि केला. त्या प्रसंगी सर्व लोकांसमक्ष प्रेषोच्चार करविण्यासाठी कोणी स्वामी असते तर बरे होते असा विचार महाराजांच्या मनांत येतांच नदीपलीकडून एक संन्यासी अचानक आले आणि त्यांनी महाराजांच्याकडून प्रेषोच्चार करवून त्यांना संन्यास दिला. सर्व विधि आटोपण्याच्या गडबडीत ते संन्यासी भिक्षेच्या वेळेपर्यंत कुठे गेले ते कुणालाच कळले नाही. बराच शोध करूनहि ते न सांपडल्याने सगळ्यांना आश्चर्य तर वाटलेच पण महाराजांना खेदहि वाटला. त्या दिवशी ब्रह्मवृंदाच्या आग्रहाने माधुकरी न करतां तेथेच भिक्षा केल्याने महाराजांना अतिसाराचा त्रास सुरू झाला. देवांची प्रार्थना केल्यावर तो थांबला. ह्या घटनेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की 'अनाश्रमी न तिष्ठेत' या शास्त्रवचनाला अनुसरून गृहस्थाश्रम संपतांच श्रीमहाराजांनी चतुर्थाश्रमांत प्रवेश केला.

यानंतर महाराजांनीं देवांच्या आज्ञेने उज्जयिनी येथील नारायणानंदसरस्वती यांच्याकडून दंड घेतला. हे समर्थसंप्रदायांतील असून दत्तावतार श्रीनृसिंहसरस्वती यांच्या वंशांतील होते. यांची समाधि चाफळ येथे आहे. दंडधारण केल्यावर श्रीमहाराजांना आज्ञा झाली कीं "सर्वत्र वर्णाश्रमलोप झाला आहे. तरी सर्व भरतखंडांत पायींच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करावी. " अशा प्रकारे श्रीदत्तप्रभूंच्या व श्रीस्वामीमहाराजांच्या संबंधांत एक नवा पैलू "परमेश्वर व प्रेषक" असा निर्माण झालेला दिसतो. त्याचा विचार आपण पुढील लेखांत करूं.

।। श्रीगुरुः शरणम्।।

## प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज आणि
## नरसोबाची वाडी

**भेटिलागी माझे मन उतावीळ। कई मी पाउले पाहीन डोळां।।१।।**
**ऐसे कृष्णातीर वृक्ष औदुंबर। ऐसा जगदोद्धार देव कोठे।।२।।**
**धन्य तेथे जन भावार्थी सज्जन। वैकुंठचि जाणा प्रत्यक्ष हे।।३।।**
**स्वर्गीचे सुरवर वांछितातित जन्म। पाहाया चरणयुग्म अखंडित।।४।।**
**पाहुनियां वासु श्रीदत्तपादुका। आल्हादुनी देखा नाचतसे।।५।।**
**श्रीमद्दत्तात्रेय येथे नांदताहे। नरसिंहयति ये यतिरूपे।।।६।।**

### पहिली भेट

या श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामीमहाराजाच्या पदांतीलच अवस्था पूर्वाश्रमांतील तरुण वासुदेवशास्त्रींची झाली होती. श्रीदत्तप्रभूंच्या एकांतिक भक्तीचा वारसा त्यांना पित्यांपासूनच मिळाला होता. बालवयाचा काळ वेदाध्ययनाच्या परमतपांत कसा निघून गेला ते समजलेसुद्धां नाही. माणगांवच्या बाहेर क्वचित्च पाऊल टाकले. सहा महिने गोव्याला नीलकंठशास्त्रींकडे ज्योतिषाच्या अध्ययनासाठी गेले खरे; पण वडिलांच्या आजारपणाने परतावे लागले. प्रापंचिक जबाबदाऱ्या लहान वयांतच अंगावर पडल्या. पितृछत्र हरपल्यावर मोठ्या बहिणींची लग्ने व लहान भावांच्या मुंजी त्यांनींच केल्या. त्यांना थोडे आर्थिक स्थैर्य येते न येते तोंच गृहस्थाश्रमाची जबाबदारी गुरुजनांच्या आग्रहाने स्वीकारावी लागली. या सगळ्या धकाधकीच्या जीवनांत वाडीला जाण्याची ऊर्मि कितीहि मनांत आली तरी ती तशीच दाबून टाकावी लागे. सरस्वती, शिवा, भद्रा, कुंभी आणि भोगवती या पंचनद्या कृष्णावेणीला येऊन मिळतात त्या संगमांत कधी न्हाईन आणि देवदुर्लभ निर्गुण पादुकांवर पाणी घालून त्यांना डोळे भरून कधी पाहीन असा ध्यासच शास्त्रीबुवांना लागला होता. पण प्रपंचाच्या धांदलींतून वेळेची आणि पैशांची सवड कशी मिळणार? आणि अशी सवड मिळाली तरी मातुःश्रींची संमति कशी मिळेल? अशा विचारांतच शास्त्रीबुवा गप्प राहायचे. पण आतां वाडीच्या नरसोबाचाच जणूं धीर निघेना. आपल्या ह्या प्रियभक्ताच्या भेटीची त्यांनाही तेवढीच ओढ लागली होती. एके दिवशी त्यांनी शास्त्रीबुवांना स्वप्नांत एका ब्राह्मणाच्या रूपाने येऊन विचारले, "कां हो शास्त्रीबुवा, वाडीला जायचे म्हणतां तर जात कां नाही?" बुवांनी आईच्या परवानगीचे कारण सांगतांच तो ब्राह्मण

म्हणतो, "तुम्ही विचारून तरी पहा. आईची परवानगी मिळेल आणि सोबतीची व पैशांचीहि व्यवस्थाहि होईल. " या स्वप्नाने उल्हसित झालेल्या बुवांनी उजाडतांच आपला मानस आईच्या कानांवर घातला. आणि आश्चर्य म्हणजे त्या माउलीने कांहीहि आढेवेढे न घेतां होकारहि दिला. लगेच बुवा वाडीला जाणार असल्याची बातमी गांवांत पसरली आणि एक शेजारचे गृहस्थ त्यांच्याबरोबर जायला निघाले. होते तेवढे पैसे घेऊन बुवा निघाले. वाटेत सावंतवाडीला आणावकरांनी त्यांच्या मुलाच्या पत्रिकेची राहिलेली दक्षिणा म्हणून अडीच रुपये दिले. अशा रीतीने स्वप्नदृष्टांताप्रमाणे सर्व झाल्याने उत्साहित झालेल्या बुवांनी वेगाने वाडीची वाट धरली. बोरगांवच्या मुक्कामांत त्यांना पुन्हां एक स्वप्नदृष्टांत झाला. त्यांत अशी आज्ञा झाली की वाडीला एक मोठे अधिकारी सत्पुरुष श्रीगोविंदस्वामी नांवाचे आहेत, त्यांचे दर्शन घ्या. अशा रीतीने मजल दर मजल करीत बुवा वाडीला पोहोंचले. त्यांच्या आसुसलेल्या मनाला त्या मनोहर पादुकांच्या दर्शनाने झालेला आनंद आपल्या कल्पनेत आणणेहि कठिण आहे. दर्शन घेऊन वर येतांच बुवांनी प्रथम श्रीगोविंदस्वामीची चौकशी करायचा विचार केला. एवढ्यांत गोविंदस्वामीच ब्रह्मानंदांच्या माडीवरून उतरून अगदी जुनी ओळख असल्याप्रमाणे विचारूं लागले, "काय वासुदेवशास्त्री केव्हां आलांत? चला माडीवर, स्नान वगैरे करून या."

त्या क्षणापासूनच जणूं गोविंदस्वामीनी (यांनाच ब्रह्मैयास्वामी असेहि म्हणत) वासुदेवशास्त्रींचा शिष्यत्वाने स्वीकार केला. अनोळखी वासुदेवशास्त्र्यांना जेव्हां वाडीच्या पुजाऱ्यांनी त्यांना पादुकांवर पाणी घालूं दिले नाही तेव्हां दत्तप्रभूंच्या आज्ञेने पोथी वाचण्याचे थांबवून गोविंदस्वामी स्वतः शास्त्रीबुवांना घेऊन मंडपांत गेले व त्यांना पादुकांवर पाणी घालण्याची व्यवस्था केली. त्यांचे मार्गदर्शन तेव्हांपासून शास्त्रीबुवांना वरचेवर होऊं लागले व त्यांच्या सांगण्यामागे दत्तप्रभू आहेत असे अनुभवहि शास्त्रीबुवांना आल्याने ते श्रीगोविंदस्वामींना गुरुस्थानीं मानूं लागले.

वासुदेवशास्त्री वाडीला प्रथम आले (इ.स. १८७९) तेव्हां त्यांचे वय २३ वर्षांचे होते व त्या वेळीं त्यांचा मुक्काम वाडींत महिनाभर झाला. ह्याच काळांत बुवांकडून गुरुचरित्राचा सप्ताह करून घेतला, त्यांना रात्री दक्षिणद्वारासमोर दर्शन दिले तसेच दत्तपादुकांची पूजा रोज करण्याची आज्ञा केली. त्याच मुक्कामांत एकदा देवांनी बुवांना पार्थिवपूजा करण्यास सांगितले. बुवांनी प्रथम

ते मनावर घेतले नाही; पण पुन्हा तसेंच सांगणे झाले. बुवांनी आपल्याकडे विधान नाही असे म्हणतांच तें विधान कवीश्वरबुवांकडे मिळेल, असे उत्तर मिळाले. त्याप्रमाणे ते विधान मिळवून बुवांनी कांहां दिवस पार्थिवपूजा केली. पुढे देवांनीच सांगितल्यावर बंदहि केली. ह्या घटनेवरून बुवांचे व वक्रतुंडमहाराजांच्या हार्दिक संबंधांना या प्रथम भेटींतच आरंभ झाला असे दिसून येते. "समानशीले व्यसनेषु सख्यम्" या न्यायाने हे ऋणानुबंध उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेले.

**पुनश्च वाडी** यानंतर बुवा माणगांवीं परतले. त्यावेळीं त्यांनी चित्तशुद्धीसाठी अत्यंत कठोर अशा चांद्रायण व्रताचे आचरण केलें. ते पूर्ण होतांच दत्तजयंतीच्या उत्सवांत ते वाडीला आले. त्या वेळी ३।४ महिने मुक्काम झाला. ह्याच मुक्कामांत शास्त्रीबुवांना प्रत्यक्ष दत्तप्रभूंकडून मंत्र मिळाला व श्रीगोविंदस्वामींच्या मार्गदर्शनाने त्याचे अनुष्ठान त्यांनी सुरूं केले. त्याचबरोबर गोविंदस्वामींनी त्यांना उपनिषद्भाष्य रोज वाचण्याची आज्ञाहि केली.

ह्याच मुक्कामांत शास्त्रीबुवांना संन्यास घेण्याची इच्छा झाली. पण वाडींतील दुसरे अधिकारी सत्पुरुष श्रीमौनीस्वामी यांनीं त्यांना "अद्यापि कांहीं दिवस तुमचे माणगांवीं वास्तव्य होणार आहे" असे सांगितले. कांहीं दिवसांनीच वासुदेवशास्त्रींना श्रीदत्तप्रभूंचा दृष्टांत झाला कीं प्रभू स्वतःच माणगांवीं येऊन सात वर्षे राहणार आहेत. त्यानंतर लगेच शास्त्रीबुवा वाडीहून माणगांवला गेले. जातांना त्यांना कागलच्या एका सोनाराने हवी तशी मूर्ति करून दिली व तिच्या मोबदल्याचीहि अकल्पितपणे सोय झाली. अशाच तऱ्हेने माणगांवला गेल्यावर देवळासाठीं जागा दानांत मिळणे, बांधकामाचे साहित्य लोकांनी आणून टाकणे, आर्थिक शक्ति नसलेल्या लोकांनी श्रमदान करणे इत्यादि अनुकूल घटना घडून माणगांवचे मंदिर बांधून झाले व अल्पावधींतच नांवारूपालाहि आले. माणगांवचा व्याप इतका वाढला तरी वाडीच्या भेटीची शास्त्रीबुवांना नेहमीच ओढ असायची. वासुदेवशास्त्री वर्षांतून दोनतीन वेळां दत्तजयंति, गुरुद्वादशी व नारायणस्वामींच्या उत्सवाला येत असतच. माणगांवच्या देवळाचा उद्गम वाडीच्या स्थानांतूनच आहे अशीच त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे माणगांवीं देवापुढे येणाऱे एक रुपयापेक्षा अधिक द्रव्य वाडीला पाठविले जायचे.

**वाडीत गृहस्थाश्रम** देवांनी सांगितलेला सात वर्षांचा काळ चांद्रमानाने

पूर्ण झाला व बुवांना माणगांव सोडायची आज्ञा झाली. कांहीं तासांतच सर्व मोह सोडून अंगावरच्या वस्त्रानिशींच बुवा, गरोदर पत्नीला घेऊन वाडीला आले. पत्नीचे बाळंतपण दुर्गामावशीच्या मदतीने गोखल्यांच्या ओंवरींतच झाले. दैववशांत मुलगा जन्मतःच मृत झाला. त्या दारूण पुत्रशोकाने व्याकुळ अशा आपल्या पत्नीला त्यांनी अध्यात्माचा उपदेश केला. कांहीं दिवसांनी बुवांनी ब्रह्मनंदाच्या माडीवर सपत्नीक राहून, कोरान्न भिक्षा मागून अतिथिसत्कारपूर्वक गृहस्थाश्रम केला. हा जवळजवळ एक वर्षाचा काळ बुवा वाडीचेच झाले.

श्रीगोविंदस्वामींनी बुवांना या काळांत अध्यात्मशास्त्र व वेदांत यांतील गूढ रहस्ये समजाविली व आपल्याजवळच्या उपनिषदांच्या पोथ्या व शाळिग्राम त्यांना दिले. कांहीं दिवसांनी गोविंदस्वामींचा अंतकाळ आला. त्या दिवशी बुवा दिवसरात्र स्वामींच्या जवळच होते. श्रीगोविंदस्वामींची समाराधना श्रीमौनीस्वामींच्या आज्ञेने बुवांनीच केली.

या काळांत वाडीकरांचा व बुवांचा ऋणानुबंध विशेष दृढ झाला. बुवांच्या ब्राह्मण्याविषयी संशय करणारे, त्यांची परीक्षा पाहणारे वाडीचे पुजारी आतां त्यांच्यावर स्नेह करूं लागले. श्रीगोविंदस्वामी व श्रीमौनीस्वामी यांच्या खालोखाल बुवांना मानूं लागले. मौनीस्वामींच्या बालसुलभ लहरी स्वभावाने एकदां देवावरची सुरूं असलेली संततधार थांबवायची आज्ञा त्यांनी केली. तेव्हां त्या संकटांतून मार्ग काढायला त्यांनी बुवांकडेच धांव घेतली. अर्थात्च नंतर जेव्हां देवांच्या आज्ञेने बुवा पत्नीसह वाडी सोडून जायला निघाले तेव्हां वाडीच्या मंडळींनी त्यांना थांबविण्याचा फार प्रयत्न केला. पण देवांच्या आज्ञेपुढे बुवांचा इलाज नव्हता. शेवटचा उपाय म्हणून सर्वांनी मौनीस्वामींची प्रार्थना केली. मौनीस्वामींना बुवांच्या भावी कार्याच्या व्यापकतेची जाणीव असल्याने त्यांनी बुवांना "कोल्हापूरला दोन दिवसांपेक्षां जास्त राहूं नका" अशी संदिग्ध आज्ञा करून जणूं देवांच्या आज्ञेला अनुमोदनच दिले.

बुवा वाडीहून गेल्यावर कांहीं दिवसांतच गंगाखेड मुक्कामी पत्नीच्या मृत्यूनंतर चौदाव्या दिवशी त्यांनी संन्यासग्रहण केल्याची बातमी आली. याच काळांत वाडीत श्रीरामशास्त्री कवीश्वर (भारती) यांचा साग्निचित ज्योतिष्टोम याग झाला. त्या वेळीं सर्वांना बुवांची (आतां वासुदेवानंद) फार आठवण झाली. कवीश्वर मंडळींचा तर बुवांशीं विशेष ऋणानुबंध होता. तो एका स्वतंत्र लेखाचाच विषय आहे.

याच काळांत वाडीचे लक्ष्मण दीक्षित यांचे चिरंजीव नारायण हे मिरजेला कांहीं इंग्रजी शिक्षण घेऊन उपरती झाल्याने बुवांच्याकडे शिकण्यास येऊं लागले. संध्येपासून सर्व आचारधर्माचे शिक्षण त्यांना बुवांनी दिले. त्याप्रमाणे निष्ठेने आचरण करीत ते वाडींतच राहिले. हेच पुढे श्रीस्वामीमहाराजांकडून दंड घेऊन प.प.श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित)स्वामी महाराज म्हणून प्रसिद्ध झाले. प.पू. ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर यांचे ते गुरु होत.

## संन्यासोत्तर पहिली भेट (१९०४)

अशा रीतीने १८९१ इ.स.(शके १८१३)ला वाडी सोडल्यावर मात्र पुढे चौदा वर्षे श्रीस्वामीमहाराज उत्तरेकडेच संचार करीत होते. शके १८२६ चा ब्रह्मावर्ताचा चातुर्मास झाल्यावर लवकरच महाराजांना आज्ञा झाली की "वाडीची व्यवस्था फारच बिघडली आहे. तेथे अनाचार चालू आहे. तरी तेथे जाऊन व्यवस्था करावी आणि आपली छाटी मिळेपर्यंत तेथे रहावे." अशा रीतीने महाराजाचे पाय दक्षिणेकडे वळले. भेलशाला आल्यावर त्यांचा शोध घेत ब्रह्मावर्तापर्यंत फिरून आलेले त्यांचे प्रिय शिष्य नारायण दीक्षित त्यांना भेटले. त्यांची पत्नी प्लेगने निवर्तली होती व त्यांना प्लेग झाल्याने दीक्षितांनी आतुर संन्यास घेतला होता. महाराजांच्या दर्शनाने त्यांच्या चित्ताला शांति मिळाली. त्यांना रेल्वेने पुढे पाठवून महाराज पायी हुशंगाबादमार्गे वाडीकढे निघाले.

चौदा वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर श्रीस्वामीमहाराज वाडीला येत होते. त्या वेळीं फाल्गुन महिना होता. संन्यासानंतर वाडीला येण्याची ही महाराजांची पहिलीच खेप. यावेळी ४८ दिवस मुक्काम झाला. श्रीनारायणस्वामींची पुण्यतिथि करून वैशाख वद्य १ ला महाराजांनी पूर्वसंकेतानुसार वाडी सोडली. या काळांत महाराजांची केव्हांही सहज समाधि लागत असे. नित्यकर्माव्यतिरिक्त सर्व जिज्ञासू मंडळींना त्यांच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे शिक्षण देण्याचे काम चाले. पहाटे योगप्रक्रिया, सकाळी ब्रह्मकर्म, भिक्षा झाल्यावर ज्योतिष, वैद्यक, मंत्र, तंत्र इत्यादि, दुपारी चारनंतर श्रीमद्भागवतांतील वेदस्तुति व ब्रह्मस्तुति, द्विसाहस्रीच्या टीकेतील कठिण विषय, पुन्हा सायंसंध्येनंतर कांहीं अध्यात्मिक विषय असा दिनक्रम सुमारे दीड महिन्यावर चालू होता. आर्त, अर्थार्थींची तर गर्दी सततचीच होती. मध्यरात्रीनंतर फक्त २।३ तास काय ती झोप मिळे. पण महाराजांनी कधीहि कुणाचाहि कंटाळा असा केला नाही. या काळांत अनेक लोकांच्या कामना पूर्ण झाल्या, बाधा दूर झाल्या, प्रपंच मार्गी लागले.

या मुक्कामांतच श्रीदीक्षितस्वामींची श्रीमहाराजांकडून दंडग्रहणाची

उत्कट इच्छा, अत्यंत कठोर परीक्षेनंतर पूर्ण झाली.

याच मुक्कामांत एके दिवशीं पालखी चालूं असतांना श्रीमहाराज नित्याप्रमाणे श्रींचे दर्शन करून महाराज वर येत असतां अचानक समाधि लागून हातांतला कमंडलु खाली पडला; पण तो कुठेहि भंगला नाही. महाराज तसेच श्रीनारायणस्वामींच्या देवळांत येऊन बसले. त्याच उन्मनी अवस्थेत महाराजांच्या मुखांतून करड्या आवाजांत चारी फडांतील पुजारी मंडळींना बोलावण्याची आज्ञा बाहेर पडली. त्यानुसार जमलेल्या पुजारी मंडळींना सांगण्यांत आले की "तुमच्या चालू आचरणाचा श्रींना कंटाळा आला असून त्यांत कांहीं सुधारणा करण्यासाठी आपणास इकडे आणले आहे." तसेच पुजाऱ्यानी आचरण सुधारले नाही तर भयंकर शिक्षा होईस अशी ताकीदहि मिळाली. सर्व पुजाऱ्यांनी क्षमा मागून आपल्याकडून पूर्वजांप्रमाणे सेवा करून घ्यावी अशी प्रार्थना केल्यावर कांहीं वेळाने महाराज पूर्वस्थितीवर आले. देवांनी श्रीमहाराजांना माध्यम करून पुजाऱ्याना सुधारण्याचा हा पहिलाच प्रसंग. यानंतरहि असे अनेक प्रसंग झालेले महाराजांच्या चरित्रांत दिसतात.

ह्याच मुक्कामांत वाडीत वेदपाठशाळेची स्थापना झाली व पं.धुडिराज कवीश्वर यांची अध्यापक म्हणून नियुक्ति झाली. यानंतर वार्षिक संप्रोक्षण विधि करून दोन महारुद्र करण्यांत आले व सांगतेच्या वेळी पुजाऱ्यांनी श्रींची एक छाटी महाराजांच्या अंगावर घातली. तेव्हां पूर्वीच्या दृष्टांताची खूण पटून त्यानुसार महाराजांनी वाडी सोडण्याचे ठरविले. पुढे चारच दिवसांनी श्रीनारायणस्वामींचा उत्सव होता म्हणून तोपर्यंत महाराज थांबले. यानंतर महाराज शिरोळ, पंढरपूर, अक्कलकोट मार्गे गाणगापूरला गेले. गाणगापूरच्या वाटेवरच, वाडीच्या मंडळींच्या इच्छेप्रमाणे श्रीकृष्णालहरीची रचना झाली.

## करुणात्रिपदी

यानंतरचा महाराजांचा चातुर्मास कयाधू नदीच्या तीरावर नरसी येथे झाला. या चातुर्मासाच्या काळांत वाडीत एके दिवशी पालखीच्या प्रसंगी पुजाऱ्याच्या हातून उत्सवमूर्तीच खाली उतरली. या घटनेने धास्तावलेले पुजारी महाराजांचा मागोवा घेत गाणगापूरमार्गे नरसीला आले व त्यांनी महाराजांना ही घटना विदित केली. महाराजांनी देवांना ह्याबद्दल विचारले असता पुजाऱ्यांवर त्याच्या अनाचरणाने व महाराजांच्या अवज्ञेने आपण रुष्ट असल्याचे व त्यांना शासन करणार असल्याचे देवांनी स्पष्ट केले. तेव्हां महाराजांनी पुजारी

मंडळींना त्यांचे आचरण सुधारण्याची सूचना केली अन्यथा भयंकर परिणाम होतील असेही सांगितले. तसेच झाल्या अपराधांबद्दल देवांची क्षमा मागून रोज करुणात्रिपदीने प्रार्थना केली. अशा रीतीने पुजाऱ्याच्या निमित्ताने सर्व जगाला करुणात्रिपदी या प्रासादिक व प्रभावी स्तोत्राचा लाभ झाला.

## वाडीला २री भेट

नरसीनंतर ब्रह्मावर्ताला जाऊन महाराज परत दक्षिणेकडे आले व नर्मदाकिनारी बढवाई येथे चातुर्मास केला. त्यानंतर महाराज मजल दर मजल करीत आश्विन वद्य ६ शके १८२८ (इ.स. १९०६) या दिवशी अनपेक्षित पणे वाडीस येऊन पोंचले. पुन्हा पूर्वीप्रमाणे सर्व कार्यक्रम सुरू झाले. यावेळी सकाळी श्रीनारायणस्वामींची पूजा झाल्यावर, तेथील धर्मशाळेंतच जीवनमुक्तविवेक व सदाशिवब्रह्मेंद्रकृत ब्रह्मसूत्रवृत्ति हे विषय महाराज सांगत. वाडीतील प्रख्यात पुराणिक श्री. वक्रतुंडमहाराज कवीश्वर हेही येत असत व निरूपणाला सुरुवात करण्यापूर्वी महाराज ते आले असल्याची खातरजमा करीत. पहांटे श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांना संन्यासाश्रमाच्या आचाराचे शिक्षण दिले जाई.

या मुक्कामांत गुरुद्वादशीच्या उत्सवास कोल्हापूर सरकारकडून प्रतिबंध झाला व चिंताग्रस्त वाडीकर महाराजांना शरण आले. महाराजांनी त्यांना सालाबादप्रमाणे कोठीपूजन करण्यास सांगून उत्सव निर्विघ्न पार पडेल असे आश्वासन दिले. तसेच पुढे घडले.

दिवाळीच्या दिवशी गरम पाण्याने स्नान केल्याचे निमित्त होऊन महाराजांना लघ्वीवाटे रक्त पडू लागले. महाराजांनी जेव्हां देवांना याचे कारण विचारले तेव्हां देवांनी आपल्यावर कसे कढत पाणी न पाहतां घातले जाते ते महाराजांच्या निदर्शनास आणले. तेव्हापासून पादुकांवर घालण्यापूर्वी पाणी सारखे करण्याची काळजी घेतली जाते. याच मुक्कामांत वैजनाथ नांवाच्या ब्रह्मनिष्ठ पुरुषाच्या महापूजेच्या निमित्ताने गुरुचरित्रांतल्या भास्कर ब्राह्मणाच्या कथेची आठवण करून देणारा अन्नपूर्तीचा चमत्कारहि झाला.

या मुक्कामांत कार्तिकी पौर्णिमेनंतर मोळ्याच्या वनभोजनांत पुराणाचार्य श्रीवक्रतुंडबुवा कवीश्वर यांनी भविष्यपुराण आदि पुराणांतील वचनांच्या आधारे महाराज हेच कलियुगांतील तिसरा दत्तावतार योगिराज होत असे प्रतिपादन श्रद्धापूर्वक केले. वक्रतुंडबुवा हे एक महान साक्षात्कारी गाणपत्य होते. ते

महाराजांपेक्षां वयाने पंधरा वर्षांनी वडील होते. ह्यानंतर पुढच्याच वर्षी वक्रतुंडबुवांनी गणेशचतुर्थीच्या दिवशींच गणेशमूर्तीच्या साक्षीनेच देह ठेवला.

याच वेळीं वाडी क्षेत्राचे माहात्म्य प्रकट करणारी एक घटना घडली. मागच्या वेळी कुरुंदवाडचे राजे बाळासाहेब यांच्या मुलाच्या द्वितीय पत्नीस मुलगा होण्यासाठी नारायण नागबळी करण्यास सांगितला होता. त्याप्रमाणे तो त्यांनी केला. पण मुलगीच झाली. याचे कारण महाराजांना विचारतां आपल्या सांगण्याप्रमाणे तो विधि वाडीत न करतां कुरुंदवाडच्या घाटावर केल्याचा तो परिणाम आहे असे महाराजांनी स्पष्ट केले.

अगणित लोकांच्या आर्तीचे हरण करणारा, तसेच त्याच्या कामना पूर्ण करणारा आणि जिज्ञासूंचा मोक्षमार्ग प्रशस्त करणारा हा दोन महिन्यांचा मुक्काम संपवून देवांच्या आज्ञाप्रमाणे महाराज जेव्हां रामेश्वरला निघाले तेव्हां वाडीकर शोकविह्वळ झाले. सर्व लोक त्यांनी जाऊं नये म्हणून प्रार्थना करूं लागले. त्यांचे प्रस्थान अटळ असल्याचे स्पष्ट होतांच त्यांना लवकरच परत येण्यासाठीं विनवूं लागले. सर्व मंडळींना दत्तप्रभूंची सेवा अनन्य भावाने करीत एकीने राहून नित्य दिगंबराचे भजन करण्यांतच कल्याण असल्याचा उपदेश करून महाराजांनी वाडी सोडली.

## वज्रादपि कठोराणि...

यापुढचा महाराजांचा चातुर्मास तंजावरला झाला. त्या वेळीं वाडींत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. मंडळींनी महाराजांना या संकटांतून सुटण्याचा उपाय एका पत्राद्वारे विचारला. महाराजांनी गी कैफियत दत्तप्रभूंपुढे ठेवतांच त्यांनी स्वच्छ सांगितले की, "गंगातीरावरून या लोकांना सन्मार्ग दाखविण्याकरितां तुम्ही दोन वेळां वाडीला येऊनसुद्धा तेथील लोकांनी आपले आचरण सुधारले नाही. सबब यांना या वेळी चांगलीच शिक्षा आम्ही करणार आहोंत. तुम्ही आतां मध्ये पडण्याचे कारण नाही. "महाराजांनी हा आदेश वाडीकडे पोंचविला व "या वेळीं वाडींत अनेक माणसे मृत्युमुखी पडतील, कांहीं दिवस वाडी सोडावी" असे सांगितले. आणि तसेच झाले. प्लेग, कलह आदि उत्पातांनी जीवित व वित्त यांची हानी झाली. लोक परागंदा झाले. विशेषतः महाराजांची टवाळी करणाऱ्यांना अधिक त्रास झाला. असा इतिहास आहे.

## वाडीची अंतिम भेट

इतके सर्व होऊनहि महाराजांची निंदा व आपले अनाचरण यांपासून परावृत्त न होण्याने वाडीवरची संकटांची मालिका चालूंच राहिली. अशा वारंवार येणाऱ्या संकटांच्या प्रसंगीं वाडीच्या सश्रद्ध मंडळींनी पुन्हा महाराजांकडच धांव घ्यावी, असे घडे.

पौष शुद्ध १३ (इ.स.१९०९) या दिवशी संध्याकाळी महाराज वाडीला पोंचले. महाराज येणार असल्याची बातमी अगोदर कळाल्याने श्रीदीक्षितस्वामी आदिकरून वाडीची मंडळी स्वागतासाठी अर्जुनवाडपर्यंत गेली होती. त्यांनी महाराजांना वाजतगाजत वाडीला आणले.

इतक्या सर्व अनुभवांनंतरही वाडीच्या कांहीं पुजाऱ्यांत महाराजांविषयी पूर्ण श्रद्धा नसावी असे दिसते. मागच्या खेपेला महाराजांबरोबर त्यांचे प्रमुख शिष्य श्रीगांडाबुवा होते. ते गुजराती ब्राह्मण असून महाराज त्यांचेबरोबर भिक्षा घेत. यावर आक्षेप घेऊन पुजारी मंडळींनी महाराजांनाच प्रायश्चित्त घेण्यास सांगितले व त्याशिवाय देवाला स्पर्श करण्यास मनाई केली. तेव्हापासून महाराजांनी देवांना शिवण्याचेच बंद केले ! दुरूनच दर्शन घेत. या तिसऱ्या वेळीं महाराज आले तेव्हां कन्यागत पर्व असल्याने पुजाऱ्यानी महाराजांना महापूजेला बसण्याची विनंति केली. तेव्हां महाराज बोलले, "तुमच्याच सांगण्यावरून देवाला शिवायचे बंद केले. आतां पुन्हां शिवणार नाही." यावर पुजारी मंडळींनी अशी तक्रार केली कीं "आपण देवाला शिवत नसल्याने तिथे देव आहे की नाही अशी सर्वांना - आमच्या घरच्या मंडळींनासुद्धां, शंका येते. तेव्हां आमचे नुकसान होतें." यावर महाराज किंचित् राहावून परखडपणे म्हणाले की, "आमच्या राहण्याने तुमचे नुकसान होत असेल तर आम्ही जाण्याकरितां देवावर संतत धार धरा. पण देवांच्या आज्ञेखेरीज आपण जाणार नाही."

पवनीच्या चातुर्मांत महाराजांच्या पुढे आलेला उर्वरित सर्व पैसा ("देवाचा खजिना") महाराजांनी वाडीला पाठविला होता. त्यांतून महाराजांच्या आज्ञेने संहिता स्वाहाकार पुजारी मंडळींनी केला. दहा दिवसांच्या समारंभांत हजारों लोक जेवले, सर्व वैदिक शास्त्री मंडळींना पुष्कळ दक्षिणा वाटली. अशा रीतीने पुनश्च तिसऱ्या खेपेला आर्त, अर्थार्थी आणि जिज्ञासू अशा त्रिविध भक्तांचे इहपर कल्याण करून वाडीत ब्रह्मविद्येचा सुकाळ करीत महाराज चार महिने वाडीत राहिले. कितीतरी चमत्कार घडले. विस्तरभयास्तव त्यांचा इथे

उल्लेखहि करतां येत नाही. वाचकांनी मूळ चरित्रग्रंथांतच ते पहावे अशी विनंति आहे. तेव्हां किंचित् उपरोधानेच दत्तप्रभूंनी विचारले, "आणखी किती दिवस वाडीत रहावयाचे आहे?" तेव्हां आपली इच्छा नसून आज्ञा होतांच निघणे होईल असे महाराज उत्तरतांच शृंगेरीस जाण्याची आज्ञा झाली व श्रीमहाराजांचा हा तिसरा व शेवटचा मुक्काम संपुष्टांत आला. महाराजांच्या ह्याच मुक्कामांत महाराजांच्या मार्गदर्शनाने पं. धुंडिराजशास्त्रींनी केलेल्या अनुष्ठानांच्या फलस्वरूप असा प.पू. ब्रह्मश्री दत्तमहाराजांचा जन्म झाला व श्रीस्वामीमहाराजांनी त्यांना मांडीवर घेऊन त्यांना सत्कारपूर्वक आशीर्वाद दिला. त्या वेळी, बहुधा याच घरांतील अडचणीने महाराजांनी कवीश्वरांकडे भिक्षा घेतली नसावी. आणि म्हणूनच महाराजांना भिक्षा घालण्याची आपली उत्कट इच्छा पूर्ण करण्याकरितां महाराजांपाठोपाठ धुंडिराजशास्त्री धारवाडपर्यंत गेले. तिथे महाराजांनी त्यांचे हृद्गत जाणून त्यांना एके दिवशीं स्वयंपाक करायला सांगून अत्यंत प्रेमाने त्यांची भिक्षा ग्रहण केली.

वाडीचे क्षेत्रस्थान व तेथील निर्गुण पादुका आणि देवाचे परिवारभूत अर्चक ह्या सर्वांविषयीं महाराजांच्या मनांत अतीव आदर होता. वाडीच्या पुजाऱ्यांच्याविषयी त्यांच्या मनांत असलेला आदर कधींच कोणत्याच कारणाने यत्किंचित्हि ढळला नाही. इंदूरला आपल्याऐवजी नवागत वाडीच्या पुजाऱ्यांची हत्तीवरून मिरवणूक त्यांनी काढल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. वाडीच्या स्तुतिपर त्यांचा अभंग वर दिलाच आहे. याशिवाय महाराजांनी वाडीच्या वर्णनपर एक संस्कृत चंपू लिहिला आहे. या ‘नृसिंहवाटिकावर्णनम्’ मध्यें ते म्हणतात

**स एव परमकारुणिको भगवान् जगद्गुरुः केवलयुक्त्या मुक्त्या इह हि परस्परं विवदतामसतां शास्त्राणां मतानि निराकुर्वन् स्वभक्तानां विमलदृष्ट्यैव स्वपदपर्यालोचनान्मुक्तिरिति श्रुतितात्पर्यमुपदेष्टुमिव सच्चिदानन्दं पदमिह प्रकटीकार।।२९।।**

तोच परमकरुणामय दत्तप्रभू परस्परविरोधी शास्त्रमतांचे निराकरण करून आपल्या भक्तांना शुद्धांतःकरणाने केवळ आपल्या पदाचे अवलोकनाने मुक्तीची प्राप्ति होते ह्या श्रुतितात्पर्याचा उपदेश करण्यासाठींच ह्या पादुकांच्या रूपाने प्रकट झाला आहे. त्या दत्तप्रभूंच्या पदकमली ही तुच्छ लेखनसेवा समर्पित असो.

।। श्रीगुरुःशरणम्।।

# प.प. श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आणि श्रीदत्तप्रभू : प्रेषक आणि प्रेषित.

गेल्या अंकांत आपण श्रीदत्तप्रभूंनी माणगांवांत सात वर्षे वास्तव्य करून श्रीमहाराजांची साधना कशी सर्वांगांनी पूर्णत्वाला नेली; तसेच उपासना, अष्टांगयोग व वेदांत या विषयांत त्यांना प्रवीण कले; आणि संसाराच्या सर्व बंधनांतून मुक्त करून परमहंसपदावर स्थिर करून आसेतुहिमाचल भारतांत परिभ्रमण करून शिथिलप्राय झालेला धर्मसेतु दृढ करण्याची आज्ञा दिली. येथूनच या देवभक्तांमधील एका नव्या नात्याची सुरुवात झाली असे म्हणतां येईल. आतां श्रीस्वामीमहाराज हे श्रीदत्तप्रभूचे प्रेषित झाले. इतके दिवस वृद्धिंगत केलेल्या समर्पणवृत्तीला आतां परिपूर्णता आली. यापुढील उर्वरित पाव शतकाचे आयुष्य श्रीमहाराज केवळ श्रीदत्तप्रभूंच्याच आज्ञेने, त्यांच्याच कार्यासाठी जगले. वैयक्तिक इच्छा शिल्लकच नव्हती. विशेष म्हणजे ही भूमिका प्रत्यक्ष देवांनीच वठवून घेतली असे दिसते.

## संचार

श्रीमहाराजांचा सर्व संचार श्रीदत्ताज्ञेनेच होत असे. त्यांत यत्किंचित्‌हि बदल देवांना खपत नसे. लगेच शिक्षा होई. उदाहरणार्थ, महत्पूरचा (११वा) चातुर्मास झाला की लगेच ब्रह्मावर्ताला जाण्याची आज्ञा झाली. पण महाराजांनी विचार केला की लवकरच ग्रहण आहे तेव्हां क्षिप्रास्नान करूनच निघावे. त्याच रात्री एका अत्यंत विषारी नागाचा त्यांना दंश झाला. औषध घेणे तर वर्ज्यच होते; सर्व भक्त चिंताग्रस्त झाले. श्रीमहाराजांनी लगेच समाधि लावली. समाधींतून व्युत्थान होतांच पुन्हां विषाचा जोर वाढे व तीव्र वेदना सुरूं होत. तेव्हां महाराजांनी पुनश्च समाधींत जावे. असा क्रम दोन दिवस सतत चालल्यावर विषाचा संवेग थोडा कमी झाला. डोके मात्र फारच जड पडले होते. तेव्हां दंशस्थानाची तपासणी करतां सर्पाचा दांत त्या जखमेत मोडून घुसलेला दिसला. तो काढल्यावर थोडा आराम पडला. पुढे दहावे दिवशी महत्पूर सोडल्यावरच विष पूर्णपणे उतरून महाराजांना बरे वाटले.

असाच प्रसंग नरसीच्या चातुर्मासानंतर भेलशाला दत्तजयंती केली तेथे झाला. (१९०५). दत्तजयंतीचा उत्सव होतांच लगेच पुढे जाण्याची आज्ञा झाली. स्थानिक भक्तमंडळींनी उत्सवाच्या सांगतेची सर्व तयारी केली असल्याने त्यांनी

आग्रह केला. श्रीमहाराजांनी 'देवांची आज्ञा आपल्याला मोडतां येत नाही' असे सांगूनहि तेथील लोकांनी श्रीमहाराज थांबले नाहीत तर 'गांवांत चूल पेटणार नाही व सहस्त्रभोजनाचे सर्व सामान गंगार्पण करूं' असे सांकडे घातले. तेव्हां मात्र महाराजांना राहणे भाग पडले. फक्त त्या दिवशी ग्रामांतर करून महाराज दुसरे दिवशी परत भेलशाला आले. तो सहस्त्रभोजनाचा बेत उत्तम पार पडला. मात्र त्याच रात्री ध्यानावस्थेत श्रीमहाराजांच्या गालावर एक जोराची थप्पड बसली व एक डोळा व एक कान काम करीनासे झाले. ही आज्ञा तंतोतंत न पाळल्याची देवांनी शिक्षा केली हे जाणून महाराजांनी हा आज्ञाभंग सर्व ब्राह्मणवृंदाच्या समाधानासाठी झाल्याचे श्रींच्या निदर्शनास आणून 'यावरहि आपणांस रोष असेल तर राहिलेला कान व डोळाहि घालवून टाकावा म्हणजे 'पुन्हा चूक होण्याची भीति नाही' अशी प्रार्थना केली. हे ऐकून दत्तप्रभू हंसले व गुप्त झाले. तो डोळा व कान अर्थात्‌च पूर्ववत् चांगले झाले.

अशा नित्य दत्तप्रेरणेने श्रीमहाराजांचा संचार आसेतुहिमाचल झाला. फक्त काश्मीरला मात्र, श्रीदत्तप्रभूंच्या आग्रहाकडे दुर्लक्ष करून व प्रसंगीं त्यांच्याशी विरोध पत्करूनही श्रीमहाराज गेले नाहीत. त्या देवाभक्तांच्या मतभेदाची हकीकत इतरत्र येणारच आहे. असे कांही अपवाद वगळतां श्रीस्वामीमहाराजांचा सर्व संचार श्रीदत्ताज्ञेनेच सतत चालू होता. ह्या सर्व संचारांत संन्यासाश्रमाचे नियम किती कडकपणाने पाळले जात होते याचे वर्णन इतरत्र आले आहेच. हे वर्णन आपल्याला खरेसुद्धां वाटू नये असे आहे. स्थूल शरीराकडे पूर्ण दुर्लक्ष करून संन्यासाश्रमाचा एक अलौकिक दैदीप्यमान आदर्श श्रीमहाराजांनी सर्वांपुढे ठेवला. हाच त्यांच्या धर्मसंस्थापनेच्या कार्याचा पाया होता. केवळ त्यांच्या दर्शनानेच नास्तिकाचे आस्तिक, आस्तिकांचे मुमुक्षु आणि मुमुक्षू, मुमुक्षूंचे साधक आणि साधकांचे सिद्ध झाले. हाच लोकसंग्रह! श्रीस्वामीमहाराजांच्या लोकसंग्रहाची माहिती आपण आधीच्या एका लेखांत पाहिली आहेच.

श्रीमहाराजांच्या परिभ्रमणांत हरिद्वार येथे तिसरा चातुर्मास करून महाराज हिमालयांत गेले व शके १८१८ (इ.स. १८९६) च्या वैशाख पौर्णिमेस हरिद्वार येथेच ६वा चातुर्मास केला असे वर्णन त्यांच्या चरित्रांत आहे. हा दोन वर्षांचा काळ त्यांनी हिमालयांत कुठे काढला याची कांहींच माहिती उपलब्ध नाही. श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या चरित्रांतह त्यांनी कांही काळ व्यासमहर्षींच्या आश्रमांत काढला असे वर्णन आहे. असेच वर्णन रामानुजाचार्य व मध्वाचार्य

यांच्यासारख्या कांहीं आचार्यांच्या चरित्रांतहि आले आहे. यावरून असा एक तर्क करतां येतो कीं श्रीस्वामीमहाराजांचेहि वास्तव्य या कालांत व्यासमहर्षींच्या आश्रमांत झाले असावे. श्रीदत्तसंप्रदायाच्या ह्या आचार्यांनाहि पूर्वीच्या आचार्यांप्रमाणे व्यासमहर्षींचे मार्गदर्शन लाभले असावे असे म्हणणे सयुक्तिक ठरेल.

सर्व ठिकाणी श्रीमहाराजांच्या पुढें लोक फळे, वस्त्रे आदि वस्तू आणि बऱ्याच वेळां द्रव्यहि ठेवत. पैशांखेरीज इतर वस्तू महाराज लगेच वाटून टाकीत. त्यांचा संग्रह किती नगण्य होता याचे वर्णन पूर्वी पाहिलेच आहे. नरसोबाच्या वाडीत पैशांवर पुजाऱ्यांचा अधिकार होता. इतर ठिकाणी मात्र तो 'देवाचा खजिना' होता. त्याचा विनियोग देवांच्या आज्ञेनेच होई. मुख्यतः जमलेल्या भक्तमंडळींच्या भोजनासाठी व धार्मिक कार्यांसाठी त्यांचा उपयोग होई. एकदां चिखलद्याला (चातुर्मास २२ इ.स. १९०२) गुरुपौर्णिमेच्या स्वयंपाकाकरितां महाराजांनी नर्मदेच्या पुजाऱ्याच्या जागेत देवाच्या खजिन्यांतून एक छप्पर बांधविले. त्याच दिवशी महाराजांना देवांचा दृष्टांत झाला 'आमच्या पैशांतून बांधलेल्या जागेत पुजाऱ्याने राहतां कामा नये. तरी ते छप्पर तूं पाडून टाक.' महाराजा म्हणाले 'आजचा दिवस जाऊं दे उद्यां पाहू.' परंतु हे दत्तप्रभूंना पटले नाही. ते छप्पर त्यांनी त्या रात्रीच पाडून टाकले.

## ग्रंथरचना

शरणागत, भक्त व शिष्य यांना वैयक्तिक मार्गदर्शन, अध्यापन आणि उपदेश यांशिवाय श्रीमहाराजांकडून श्रीदत्तप्रभूंनी विपुल आणि विविध ग्रंथरचनाहि करून घेतली. या ग्रंथांतून स्वामीमहाराजांनी प्राचीन दत्तपरंपरेची तात्त्विक बैठक विशद केली, अनेक पुराणांतून विखुरलेले श्रीदत्तचरित्र एका दत्तपुराणांत संकलित केले, दत्तसंप्रदायाची आचारसंहिता स्पष्ट केली, मराठी गुरुचरित्राचे अन्यप्रांतीयांसाठी संस्कृत भाषांतर (गुरुसंहिता) केले, द्विसाहस्रीच्या माध्यमांतून दत्तसंप्रदायाला सप्तशतीच्या तोडीची हवनीय संहिता दिली, श्रीदत्तमाहात्म्यासारखा सिद्ध प्रासादिक ग्रंथ जनसामान्यांसाठी प्रकट केला, त्रिशति गुरुकाव्य व दत्तचंपू यांसारखी श्रीनृसिंहसरस्वती व श्रीदत्त यांच्या चरित्रपर, नाना रत्नालंकारांनी नटलेली खंडकाव्ये रचली, व साधक-भक्तांचा भक्तिभाव पुष्ट करणारी विपुल प्रासादिक स्तोत्रे, पदे, भजने, कीर्तनाख्याने इत्यादि संस्कृत व मराठी भाषांतून लिहिली.

हे सर्व ग्रंथलेखन श्रीदत्तप्रभूंच्या प्रत्यक्ष आज्ञेने झाले आहे. श्रीमहाराजांच्या खडतर, व्रतनिबद्ध आणि फिरस्त्या संन्यासी जीवनांत एवढे प्रचंड वाङ्मय लिहिता येण्यासारखी स्वस्थता त्यांना कशी मिळूं शकली हे एक न उलगडणारे कोडेच आहे. देवांची आज्ञा व्हायची आणि महाराज लिहायला लागायचे. श्रीमहाराजांचा सर्वांत मोठा ग्रंथ समश्लोकी गुरुचरित्र (गुरुसंहिता) होय. ब्रह्मावर्ताच्या एका चातुर्मासांत (इ.स. १९०३) प्लेगची सांथ आली होती व बहुतेक सर्व मंडळी गांव सोडून रानांत वस्तीला गेली होती. अशा वेळी देवांनी सांगितले की गुरुचरित्र संस्कृत भाषेत करायचे आहे. कामाचा विस्तार लक्षांत घेता साहजिकच 'एवढे काम कधी व कसे होईल' हा प्रश्न महाराजांच्या मनांत उभा राहिला. तेव्हां देंवांनीच ग्रंथ कसा करावयाचा, त्यांतील कोणता अनावश्यक भाग गाळायचा इत्यादि दाखविले व पुढे असे आश्वासनहि दिले की सध्यां कांही पाठ वगैरे नसल्याने वेळ मिळून रोज शें-दोनशे श्लोक होऊन काम अवघ्या सवा महिन्यांत पूर्ण होईल. तसेच सर्व झाले. एवढा प्रचंड काव्यग्रंथ इतक्या थोड्या काळांत लिहून होणे हाच एक मोठा अलौकिक चमत्कार आहे. याच काळांत महाराजांना प्लेगहि झाला होता. श्रीमहाराजांचे सर्वच वाङ्मय हे असे उत्स्फूर्त आहे. श्रीकृष्णालहरीचे ५१ श्लोक एकामागे एक असे वेगाने मुखांतून बाहेर पडले व त्या वेळी समोर प्रकटलेल्या श्रीकृष्णामातेने पुरे म्हणतांच ते थांबले असे वर्णन आहे.

द्विसाहस्त्री संहिताहि पूर्वाश्रमी अवघ्या बारा दिवसांत रचली गेली. तीवरील टीका प्रभास व द्वारका क्षेत्रांत मूळ ग्रंथ जवळ नसतांहि झाली याचे श्रीस्वामीमहाराजांनाहि आश्चर्य वाटले. यावरून श्रीमहारजांचे वाङ्मय हे आर्ष स्तरावरील होते याची खात्री पटते.

असे असले तरी स्वामीमहाराजांना आपल्या मनाने कांही लिखाण मात्र श्रीदत्तप्रभूंनी कधीच करूं दिले नाही. इ.स. १९००त मंडलेश्वरीं महाराजांचा मुक्काम असतां सर्वत्र पुनर्विवाहाबद्दल वाद चालूं होता. त्याच्या खंडनपर एखादा लेख महाराजांनी लिहावा असा कांहीं मंडळींचा आग्रह पाहून महाराजांनी लिहायला सुरुवात केली. लगेच 'लेखणी खाली ठेव' असा देवांचा आदेश झाला. महाराजांनी तो लेख लिहायचा तर थांबवलाच; पण इतरहि कांहीं लिहायचे बंद केले. बऱ्याच दिवसांनी एकदा महाराजांनी चाळा म्हणून एका काडीने कागदावर कांही श्रीदत्त इत्यादि अक्षरे लिहित असतां, न लिहिण्याचा नियम स्मरून थांबले. तेव्हां देवांनी खुलासा केला की लिहिण्याची

मनाई त्या लेखापुरतीच होती व अशा रीतीने महाराजांनी पुन्हां लिहिण्यास सुरुवात केली.

एकदां भुसावळ मुक्कामी कांही भक्तमंडळींनी महाराजांना विनंति केली कीं 'आपल्याजवळ असतांना आमचे विचार सन्मार्गावर स्थिर असतात; पण घरी गेल्यावर मनाची चलबिचल सुरू होते. इतरांना ते विचार समाधानकारक रीत्या पटवतां येत नाहीत. यासाठी आपण आम्हांला एक लेख लिहून द्यावा ज्यायोगे आमच्या मनाची स्थिरता टिकून दुसऱ्याचेहि समाधान आम्ही करूं शकूं.' या लोकांच्या इच्छेला मान देऊन महाराजांनी लेख लिहिण्यास सुरुवात केली तेव्हां लगेच त्यांना ताप यायला लागून लिखाण बंद पडले. पुढे दोन वेळां ते लिखाण सुरू केले की असाच ताप येऊन ते बंद पडले. तिसऱ्या वेळीं मात्र तो ताप कांहीं हटेना व देवांचे शब्द कानीं आले 'तुला याच स्थितींत ठेवले म्हणजे लिहिण्याचे चाळे सुटतील.' तेव्हा कुठे महाराजांच्या लक्षांत आले की देवाला लेख लिहिणे आवडत नाही. तेव्हा लिहिलेले कागद फाडून टाकून महाराजांनी लिहिणेच बंद केले. मग मात्र महाराजांची प्रकृति बरी झाली. श्रीमहाराजांचे सर्व लिखाण केवळ श्रीदत्ताज्ञेनेच झाले याचा अर्थ या गोष्टींवरून स्पष्ट होईल.

## श्रीदत्तोपासनांचे आविष्करण

श्रीदत्तगुरूंचे प्रेषित म्हणून श्रीस्वामीमहाराजांनी केलेले एक मुख्य कार्य म्हणजे विविध दत्तोपासना प्रकट करून साधकांना उपलब्ध करून देणे. त्यांची भावी पिढींतल्या दत्तोपासकांना सर्वांत अमोल देणगी म्हणजे 'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' हा महामंत्र ! कोणत्याहि जातीच्या, लहानथोर स्त्रीपुरुषांना हा मंत्र जपतां येतो व त्याद्वारां श्रीदत्तप्रभूंची कृपा संपादन करतां येते. हा सिद्ध मंत्र म्हणजे श्रीस्वामीमहाराजांनी मानवमात्रांना उघडून दिलेले श्रीदत्तभक्तीचे महाद्वारच होय.

त्याचप्रमाणे श्रीदत्तपुराणाच्या माध्यमांतून महाराजांनी श्रीदत्तमालामंत्राच्या अनुष्ठानाचे मार्दर्शन केले आहे. श्रीसत्यदत्तव्रताचेहि प्रकाशन महाराजांनी केले आहे. तसेंच श्रीदत्तप्रभूंच्या सोळा अवतारांच्या कथा व उपासनापद्धतीहि त्यांनी ग्रथित केल्या आहेत. सर्व प्रकृतीच्या दत्तभक्तांना ही उपासनेची नानाविध दालने खुली करून देणारे एकमेव प्रेषित श्रीस्वामीमहाराजच झाले आहेत असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

# दत्तस्थानांचे पुनरुज्जीवन

श्रीदत्तप्रभूंचे प्रेषित या नात्याने श्रीस्वामीमहाराजांनी केलेले आणखी एक महत्त्वाचे कार्य दत्तस्थानांशी संबंधित आहे. **पीठापूर** ह्या आंध्रांतील गांवी श्रीपादश्रीवल्लभाचे जन्मस्थान असूनहि तेथील लोकांनाच ते ठाऊक नव्हते. मुक्त्यालाच्या चातुर्मासानंतर श्रीमहाराजांचा संचार गोदावरीतीराने होत असतां, शके १८३० (इ.स.१९०८) च्या पौष वद्यांत ते पीठापूरला गेले. त्या वेळीं त्यांनी स्थानिक मंडळींना ती पवित्र जन्मभूमि दाखवून देऊन तिथे श्रीपादश्रीवल्लभांच्या पादुकांची स्थापना केली व नित्य पूजा-अर्चा सुरूं केली.

तसेंच कृष्णेची नाभी म्हणून प्रसिद्ध असलेले **कुरुगड्डी** हे बेट श्रीपादश्रीवल्लभांचे समाधिस्थानहि उपेक्षितच होते. शके १८३३ (इ.स.१९११) चा चातुर्मास तेथे करून श्रीमहाराजांनी तेहि प्रकट केले. त्यांना श्रीदत्तप्रभूंची तशी स्पष्ट आज्ञाच झाली होती की, 'या स्थानी चातुर्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येऊन हे स्थान प्रसिद्ध होईल.' तेथील पुजाऱ्यालाहि एक महिना आधी आपले 'एक परमभक्त संन्यासी येथे येणार आहेत; त्यांची उत्तम व्यवस्था ठेवावी' असा दृष्टांत दिला होता. वैशाख वद्य ६ पासून दिवाळीपर्यंत महाराज तिथे होते. हजारो भक्तमंडळी सर्व देशभरांतून ह्या काळांत आलीं व तें स्थान सुप्रसिद्ध झाले. त्या मुक्कामांत एकदां महाराज समाधींत असतांना त्यांच्या हातांत मृत चिमण्या, पक्षांची अंडीं, विष्ठा इत्यादि गलिच्छ पदार्थ पडले. ते टाकून देतांच देव म्हणाले, 'हे असले पदार्थ रोज आमच्या अंगावर पडतात, ते आम्ही कसे सहन करतो ते तुम्हांला कळावे म्हणून तुमच्या हातांत टाकले.' दुसऱ्या दिवशीं खरोखरच वटवाघळांनी मारलेली एक मृत चिमणी देवांच्या पादुकांवर पडलेली महाराजांनी पाहिली. तेव्हां ती जागा स्वच्छ करून देवळाच्या छताची व भिंतींची डागडुजी करून सर्व बंदोबस्त केला. रायचूरकर मंडळींना तेथे येणाऱ्या लोकांसाठीं एक धर्मशाळा बांधायला सांगितली. अशा रीतीने या जाग्रत दत्तस्थानाचा जीर्णोद्धार महाराजांनी केला.

श्रीनरसोबावाडी ही दत्तप्रभूंची राजधानी. श्रीमहाराजांचे मूळ श्रद्धस्थान! दत्तप्रभूंनी महाराजांना पुनःपुन्हा वाडीला आणून वाडीच्या पुजाऱ्यांना मार्गदर्शन करविले. संन्यासापूर्वी शके १८१३ (इ.स. १८९१) मध्ये महाराजांनी देवांच्या आज्ञेने वाडी सोडली व उत्तरेकडे प्रयाण केले. त्यानंतर त्यांचा संचार १५ वर्षे उत्तरेकडेच झालेला दिसतो. ब्रह्मावर्ताचे तीन सलग चातुर्मासांचे वास्तव्य संपूर्ण होत असतांनाच महाराजांना देवांची आज्ञा झाली की, 'नरसोबाच्या वाडीची

व्यवस्था फार बिघडली आहे. तेथे अनाचार चालू आहे; तरी तेथे जाऊन व्यवस्था करावी आणि आपली छाटी मिळेपर्यंत तेथे राहावे.' मध्यंतरींच्या काळांत वाडींतील कांहीं भक्तमंडळी महाराजांकडे येत होतीं व त्यांना वाडीला येण्याची प्रार्थनाहि करत होती. आतां देवांची आज्ञाच झाल्याने महाराज पिछोरा, रावेर, भेलसा, होशंगाबाद मार्गे मजल दरमजल करीत वाडीला येऊन पोहोंचले. अठ्ठेचाळीस दिवस मुक्काम झाला. या मुक्कामांत महाराजांना बसल्याबसल्या समाधि लागायची, ती तासन् तास! असेच महाराज एकदां पालखीच्या वेळीं पादुकांचे दर्शन घेऊन पायऱ्या चढून वर येतांना समाधींत गेले. हातांतला कमंडलु एकदम पडल्याने ते लोकांच्या लक्षांत आलें. मात्र कमंडलु कोठेहि भंगला नाही. महाराज तसेच वर येऊन नारायण स्वामींच्या मंदिरांत येऊन बसले. महाराजांची अवस्था पाहून साहजिकच मंडळी गोळा झाली. थोड्या वेळांने महाराजांची आवेशयुक्त वाणी झाली, 'चारी फडांतील पुजारी मंडळींना हांका मारा.' ताबडतोब सर्व पुजारी जमा झाले. महाराजांच्या मुखांतून श्रीदत्तप्रभूच बोलत होते, 'तुमच्या चालू आचरणाचा श्रींना कंटाळा आला असून त्यांत कांहीं सुधारणा करण्याकरतां आपणांस इकडे आणले आहे. तुम्ही तुमच्या पूर्वजांप्रमाणे वागत नाही. तुमचे आचरण बिघडले आहे. ते तुम्ही सुधारावे; नाही तर ....... भयंकर शिक्षा होईल.' यावर सर्व पुजारी मंडळींनी क्षमायाचनापूर्वक 'आम्हां बाळगोपाळांकडून पूर्वजांप्रमाणे योग्य इष्ट सेवा करवून घ्यावी अशी प्रार्थना केली. थोड्या वेळाने महाराज पूर्वस्थितींत आल्यावर मंडळींनी त्यांना याविषयीं विचारले असता 'आपणहि तुमच्यासारखेच एक आहो' असे उत्तर आले. पण तेव्हांपासून बहुतेक पुजाऱ्यांनी महाराजांच्या मार्गदर्शनाप्रमाणे आचरण करण्यास सुरुवात केली व अडीअचणीमध्ये त्यांनाच विचारूं लागले. अशा रीतीने वाडीच्या देवस्थानाची व्यवस्था उत्तरोत्तर सुधारून सर्व दत्तभक्तांचा एक आधार स्थिर व विशद झाला. अर्थात् पुजाऱ्यंतील कांहीं लोक याला अनुकूल नव्हते. त्यांनी श्रीस्वामीमहाराजांची निंदा केलीच. याच मुक्कामांत श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामी यांना दंड मिळाला. श्रीस्वामीमहाराजांकडून दंड घेतलेले ते एकमेव संन्यासी होत. यांना वाडींतच राहण्याची आज्ञा करून तेथील मंडळींना त्यांच्या सांगण्याप्रमाणे वागायला सांगितले.

यानंतर महाराज गाणगापूर-हुमनाबाद-गंगाखेड मार्गे नरसीला आले व तेथेच चातुर्मास केला. मध्यंतरींच्या काळांत वाडीच्या आसपास प्लेगची साथ सुरू झाली. श्रीनृसिंहसरस्वती दीक्षित स्वामींच्या आज्ञेने तेथील पुजाऱ्यांनी

'दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा' या मंत्राचे अहोरात्र भजन सुरूं केले व तसे श्रीमहाराजांना कळविले. महाराजांनी त्याला अनमति देऊन वाडीवरील संकट टळेल असे आश्वासनहि दिले. पुढे पालखीच्या वेळीं गुंडोपंत खोंबारे या पुजाऱ्यांच्या हातून उत्सवमूर्ति खाली उतरल्याने पुजारी मंडळी अतिशय भयभीत होऊन महाराजांचा शोध करीत नरसीस आलीं. त्यांचे म्हणणे ऐकून महाराजांनी देवांना खाली येण्याचे कारण विचारले तेव्हां देवांनी क्रोधयुक्त मुद्रा करून सांगितले की, 'पुजारी लोक तूं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें वागत नाहीत. उलट तुझी निंदा करतात. माझ्या पादुकांवर अशुद्ध पदार्थ घालतात. तरी पंच नेमून परभारे व्यवस्था ठेवली पाहिजे. त्या देशाच्या लोकांची वागणूक बिघडल्यामुळे त्या देशाचाच कंटाळा येतो. नाकांतील घाण बंद होत नाही. म्हणून त्यांना शासन झाले पाहिजे.' महाराजांनी हे देवांचे म्हणणे पुजाऱ्याना सांगून आपले वर्तन सुधारण्याबाबत ताकीद दिली. अन्यथा भयंकर परिणाम होतील असें बजावून त्यांना झाल्या अपराधांबद्दल देवांती क्षमा मागून रोज करुणात्रिपदीने प्रार्थना करण्यास सांगितलें. पालखीच्या वेळीं रोज करुणात्रिपदी म्हणण्याचा हा नियम, श्रीमहाराजांनी घालून दिलेल्या इतर नियमांप्रमाणेंच अजूनहि वाडींत चालू आहे.

यानंतरचा मुक्काम वाडींत शके १८२८ (इ.स. १९०६) च्या गुरुद्वादशीच्या वेळीं दोन महिन्यांचा झाला. त्या वेळीं शेंकडो भक्तजनांच्या कामना पूर्ण झाल्या व शेकडो आर्तांची आर्ती दूर झाली. शेकडो मुमुक्षूंना गीताभाष्य, उपनिषद्भाष्य, ब्रह्मसूत्रवृत्ति, कृष्णालहरी, शतश्लोकी इत्यादि वेदान्तविषयक ग्रंथांवर महाराजांचे निरूपण ऐकण्याची देवदुर्लभ संधि मिळाली. श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींना महाराजांच्या पादुकांचाहि लाभ झाला. ह्या पादुका सध्यां अमरापूर येथे श्रीदीक्षितस्वामींनी स्थापिलेल्या श्रीवासुदेवानंदसरस्वतीपीठांत आहेत.

ह्याच मुक्कामांत दिवाळींत भक्तमंडळींनी श्रीस्वामीमहाराजांना ऊन पाण्याने स्नान घतले तेव्हां लघ्वींतून रक्त पडूं लागले. देवांना विचारतांच ते म्हणाले, 'एक दिवस कढत पाणी घातली ही तर तुमची ही अवस्था! मग पुजारी रोज आमच्यावर कढत पाणी घालतात; तर आमची काय दशा होत असेल?' हे ऐकून चौकशी करतां महाराजांना समजले की एका मोठ्या हंड्यांत पाणी उकळत ठेवून त्यांतील पाणी किती कढत आहे हे न पाहतांच लोक देवावर घालतात. तेव्हां महाराजांनी पुजाऱ्यांना सांगितलें कीं 'ह्या तुमच्या

अपराधाची आपल्याला शिक्षा झाली आहे. तेव्हा देवापुढे नारळ ठेवून इतःपर व्यवस्थित पाहून पाणी घालू अशी प्रार्थना करा' त्याप्रमाणे पुजाऱ्यंनी करतांच महाराजांचा त्रास कमी झाला.

इतके सर्व होऊनहि बरीच पुजारी मंडळी महाराजांची निंदा करतच होते व आपल्या वर्तनांतहि त्यांनी सुधारणा केली नाही. यामुळे वारंवार संकटाचे प्रसंग येऊन वाडीचे पुजारी महाराजांनाच सांकडे घालत. अशाच एका वेळीं पवनी येथील चातुर्मासांत (इ.स.१९०९) वाडीची मंडळी संकटांनी त्रासून महाराजांकडे आलीं होतीं. त्यांनी जेवणाच्या पंक्ति बसल्या असतांच महाराजांनी वाडीला येण्याचे वचन दिले तरच जेवण करण्याचा सत्याग्रह केला; अन्यथा उपाशींच वाट फुटेल तिकडे जाण्याची धमकीहि दिली. त्या वेळीं देवांनी पवनीचा चातुर्मास संपतांच वाडीले जावे अशी आज्ञा दिली खरी. पण त्याच दिवशी भाष्यपाठ चालू असतां महाराजांच्या मुखांतून देवांनी तीव्र नाराजी प्रकट केली. पवनीचा चातुर्मास संपल्यावर देवांच्या आज्ञेप्रमाणे महाराज वाडीला निघाले; पण वाटेंतच पुन्हां परत फिरण्याची आज्ञा झाली. तेव्हां मात्र महाराजांनी वाडीच्या पुजाऱ्यांना वचन दिले असल्याने आतां परत कसे फिरतां येईल? असा उलट प्रश्न केला. देवांचा विरोध व त्यामुळे उत्पन्न झालेला संधिवात, रक्तपात व ताप इत्यादि सर्व सहन करूनहि महाराज वाडीला गेलेच. त्या वेळीं चार महिने मुक्काम झाला. ह्या मुक्कामांत वाडीवर महामारीचे संकट येणार होते ते श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञाने पादुकांवर महारुद्राभिषेक केल्याने टळलें. अशा रीतीने वाडीच्या स्थानाची व्यवस्था ठेवण्याची जबाबदारी श्रीस्वामीमहाराजांनी पार पाडलेली दिसते.

अशा रीतीने प्राचीन दत्तस्थाने प्रकाशांत आणणें, त्यांचा जीर्णोद्धार करणे व त्यांची व्यवस्था लावून देणे यांखेरीज अनेक ठिकाणी महाराजांनी दत्तमंदिरांच्या स्थापनाहि केल्या. माणगांव व गरुडेश्वर हीं दोन ठळक उदाहरणे आहे. राजमहेंद्रीचा त्रिमुखी भक्तवत्सल दत्त, वांजरातीराजवळ लातूरजवळ टेंबीचा दत्त अशी अनेक दत्तमंदिरे महाराजांनी स्थपन केली व श्रीदत्तात्रेयोपसनेला गति दिली. त्यांतील बऱ्याच स्थानांची माहिती अप्रकाशितच आहे. त्या त्या ठिकाणी त्या मंदिरांतून दत्तोपासना मात्र अविरत चालू आहेत असे दृष्टोत्पत्तीस येते.

सारांश व्यक्ति, समाज, ग्रंथ व मंदिरे हीच संप्रदायांचा आधार असतात. ह्या सर्व घटकांची पुनर्बांधणी व जोपासना करून दत्तसंप्रदायच नव्हे तर सनातन वैदिक धर्माचाहि शिथिलप्राय झालेला सेतू दृढ करण्याचे महान् कार्य या दत्तप्रभूंच्या प्रेषिताने आपल्या देहाची माया न ठेवतां व जिवाचीहि पर्वा न करतां केली. शतकानुशतके येणाऱ्या पिढ्यांची दत्तोपासनेची वाट प्रशस्त करून जागोजागीं जणूं मार्गदर्शक स्तंभ उभे केले. श्रुति आणि स्मृति या दोन वैदिक धर्माच्या रुळांची शिथिलता आपल्या ग्रंथरचनेच्या आणि उपदेशांच्या माध्यमांतून दूर करून, श्रीदत्तसंप्रदायरूपी संयत्र (एंजिन) आपल्या प्रखर तपस्येने कार्यान्वित करून, त्यांत भक्तिप्रेमाचे इंधन भरपूर भरून, या आगगाडीच्या ज्ञान, योग, कर्म, उपासना इत्यादि डब्यांत त्या त्या वर्गाच्या साधकांना स्थानापन्न करून सर्वांना मोक्षमार्गावर अग्रेसर केले; जुनी-नवी दत्तस्थाने जणूं या मार्गावरची छोटीमोठी स्थानकेच होत. श्रद्धेचे तिकीट असणाऱ्यांना श्रीदत्तचरणाच्या मुक्कामाला नेणाऱ्या या वासुदेवयतिरूप आगगाडींत आपल्याला सर्वांना स्थान लाभावे हीच श्रीचरणी प्रार्थना.

## प.प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामिमहाराज आणि श्रीदत्तप्रभू : भक्तिप्रेमाचे नवरंग

भक्तीचे आचार्य देवर्षि नारदमुनींनी भक्तीची व्याख्या 'अस्मिन्परमप्रेमरूपा' अशी केली आहे. परमेश्वराच्या ठिकाणी निखळ आसक्ति हेच भक्तीचे स्वरूप त्यांनी प्रतिपादिलेले आहे. ह्या आसक्तीचे आविष्कार अनेकविध असू शकतात हेहि त्यांनी ८२व्या सूत्रांत स्पष्ट केले आहे. "गुणमाहात्म्यासक्ती - रूपासक्ति - पूजासक्ती - स्मरणासक्ति - दास्यासक्ति - सख्यासक्ति - कान्तासक्ति - वात्सल्यासक्ति - आत्मनिवेदनासक्ति - तन्मयासक्ति - परमविरहासक्तिरूपा दशधाप्येकधा भवति." सागराला मिळणारी सरिता जशी अनेकमुखांनी विभागून जणूं आपल्या मीलनाचा आनंद प्रतिगुणित करते, तसाच भक्त आपले प्रेम विविध भावांनी विकसित करतात. अर्थात् बहुतेक भक्त यांपैकी एक-दोनच भावांचा परिपोष करतांना दिसतात. श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी श्रीदत्तप्रभूंविषयीं हे सर्वच भाव वेळोवेळी प्रसंगानुरूप प्रकटलेले दिसतात. त्यांची **गुणमाहात्म्यासक्ति** त्यांच्या सर्व वाङ्मयांतून अभिव्यक्त झालेली आहे. तशीच **रूपासक्ती**हि. श्रीमहाराजांच्या **पूजासक्ती**चा विचार आपण इतरत्र केला आहेच.

'स्मरण तुझे मज नित्य असावे' हेच मागणे निर्धाराने मागणाऱ्या स्वामीमहाराजांची **स्मरणासक्ती** ही त्यांच्या जीवनाचा स्थायीभावच होती. हा आंतरिक स्थितीचा विषय असल्याने त्याची बाहेरून कल्पना येणे अशक्य आहे. श्रीमहाराजांचे मन श्रीदत्तप्रभूंच्या स्मरणाने सदैव तुडुंबलेले असे. एखादा शब्द किंवा ध्वनि मात्र या प्रच्छन्न प्रवाहाच्या उद्रेकाला पुरेसा होई. तो उद्रेक सात्त्विकभावांच्या रूपाने श्रीमहाराजांच्या अंगांगातून प्रकट होत असे. ब्रह्मावर्ताला एकदां समासचक्राचे अध्यापन चालू असतां 'कृष्णश्चासौ सर्पश्च कृष्णसर्पः' हा समास सांगतांनांच श्रीमहाराजांची समाधि लागली होती. तसेच १९०६ साली वाडीच्या मुक्कामांत सायंकाळी संगमावर कृष्णालहरीचे निरूपण चालूं असतांना देवापुढे धूप पडला. तेव्हांचा घंटानाद कानांवर पडतांच महाराजांचा कंठ भरून आला, वाचा स्तब्ध झाली, नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. थोड्या वेळाने या अवस्थेंतून बाहेर आल्यावर महाराज बोलले, "दयासागर प्रभू या ठिकाणी भक्तकार्याकरितां येऊन राहिला आहे, ही केवढी भाग्याची व आनन्दाची गोष्ट आहे ! प्रभूचे भक्तवात्सल्य अवर्णनीय आहे."

भजन-कीर्तनाच्या श्रवणांनीसुद्धां श्रीमहाराजांचा भाव उद्दीपित होत असे व बऱ्याच वेळां समाधीहि लागत असे. केव्हां-केव्हां ही समाधि अवस्था तासन् तास उतरत नसे. नरसोबावाडीच्या मुक्कामांत ही अवस्था पाहण्याचे भाग्य अनेक लोकांना लाभले आहे. वाडीजवळ सदलगे गांवी एकदा एकाने संत तुकाराममहाराजांचा "नमू आदिरूपा ॐकारस्वरूपा। विश्वाचिया रूपा पांडुरंगा"हा अभंग म्हटला. तो अभंग ऐकतांनाच श्रीमहाराजांचे देहभान नाहीसे होऊन समाधि लागली ती तीन तास ! समाधींतून व्युत्थान झाल्यावर महाराजांनी त्या अभंग गाणाऱ्यास नारळ-प्रसाद दिला व 'तुकाराम साधूची योग्यता मोठी आहे; ती त्यांची अभंगवाणी कानांवर पडतांच अनुभवास येते'असे उद्गार काढले.

श्रीमहाराजांचे संपूर्ण जीवनच **दास्यासक्ती**चे प्रात्यक्षिक आहे. आपण आधी पाहिल्याप्रमाणे महाराजांचा सर्व संचार, लेखन, मुक्कामाची ठिकाणे व मुदती, एवढेच काय नित्य आहार-विहारहि श्रींच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष आज्ञेशिवाय झाला नाही. स्वामीचे मनोगत जाणून त्याचप्रमाणे आचरण करण्याचे सर्वश्रेष्ठ दास्यलक्षण श्रीमहाराजांच्या चरित्रांत प्रभावीपणे प्रकट झाले आहे.

महाराजांची दत्तप्रभूंविषयक **सख्यभक्ति** त्यांनी माणगांव सोडतांना प्रकटली. दत्तप्रभूनी चांद्रमानाने सात वर्षे पूर्ण होतांच माणगांव सपत्नीक सोडण्याची आज्ञा केली खरी; पण त्याच वेळी माणगांवच्या देव्हाऱ्यांतील मूर्ति व छोटी प्रवासी मूर्ति हे आपले दोन्ही विग्रह बरोबर घेण्याची आज्ञा केली. महाराजांनी आपल्याला प्रवासांत ह्या दोन्ही मूर्तींची पाळणूक करणे कठिण असल्याचे सांगितले तेव्हां आपल्याला 'थंड पाण्याने स्नान व भस्म लावले की पुरे' असे सांगून महाराजांच्याविषयींचे सख्य प्रकट केले.

त्याचप्रमाणे संन्यास घेतल्यावरहि श्रीमहाराजांना सोडायची ह्या मूर्तींची तयारी नव्हती. संन्याशाला फुले, तुळशी इत्यादि तोडतां येत नसल्याने आपल्याकडून यथासांग सेवा घडणार नसल्याचे महाराजांनी स्पष्ट करूनहि त्यांच्याबरोबरच राहण्याचा आग्रह देवांनी धरला. एवढे सख्यभक्तीचे उदाहरण क्वचित्च पहायला मिळेल. ब्रह्मावर्ताला एकदा एक शास्त्रीबुवा महाराजांचे नांव ऐकून त्यांच्या दर्शनाला आले. स्वतःला वेदान्ती समजणारे ते शास्त्रीबुवा असल्याने त्यांना महाराजांची ही मूर्तिपूजा रुचली नाही. ते महाराजांना म्हणाले, 'आपण

संन्यासी आहांत; ही मूर्तिपूजा कशासाठी करतां? ' श्रीमहाराज उत्तरले की शास्त्रीबुवांसारख्या अधिकारी पुरुषांना मूर्तिपूजेची आवश्यकता नाही हे खरे असले तरी ही मूर्तीच आपल्याला सोडत नाही त्याला काय करणार? यावर ते शास्त्रीबुवांनी त्याना सुचविले की ही मूर्ति आपणच गंगेत सोडली म्हणजे झाले ! महाराजांनी ते म्हणणे मान्य करून दुसऱ्या दिवशीच त्यांना घेऊन गंगेला गेले व प्रवाहाच्या मध्यांत जाऊन त्या शास्त्रीबुवांच्या समक्षच ती मूर्ति गंगेच्या प्रवाहांत सोडून दिली. उभयतां कांठवर येऊन पाहतात तर काय? नुकतीच पाण्यांत सोडलेली मूर्ति महाराजांच्या पुढ्यांत उपस्थित ! हा चमत्कार पाहिल्यावर शास्त्रीबुवांचा निर्गुण उपासनेचा अभिमान गळून पडला व महाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी नित्य मूर्तिपूजेला आरंभ केला. असे हे श्रीमहाराजांचे व देवांचे सख्य होते.

ह्या सख्यभक्तीचा एक हृद्य उत्कर्ष चिखलदा येथे १८९७च्या दिवाळीत श्रीस्वामीमहाराजाच्या अनुभवास आला. नरकचतुर्दशीच्या आधल्या दिवशी देवांनी महाराजांना दृष्टान्ताद्वारे आपल्याला दिवाळीनिमित्त अभ्यंगस्नान हवे असल्याची मागणी केली. तेव्हां महाराजांनी रोखठोक देवांना सांगितले कीं "आपण संन्यासी असल्याने अग्नीला स्पर्श करूं शकत नसल्याने ऊन पाणी कोठून आणणार? तसेच सुगंधी तेलही आपल्याकडे नाही" असे सांगून अभ्यंगस्नानाची सोय करण्यास स्वतःची असमर्थता प्रकट केली. त्याचबरोबर माणगांवाहून निघतांना रोज थंड पाण्याने स्नान व भस्म यापेक्षां अधिक उपचारांची आवश्यकता नसल्याच्या बोलीचे देवांना स्मरणहि करून दिले. तरी रोजच्याप्रमाणे साध्या गार पाण्याने स्नान मिळेल असे बजावून दिले. दुसऱ्या दिवशी महाराजांनी स्वतःच्या स्नानानंतर मूर्तीलाहि थंड पाण्याने आंघोळ घालून भस्मलेपन केले व नित्याच्या क्रमाला लागले.

देवांना मात्र आपला मंगलस्नानाचा हट्ट स्वामीमहाराजांनी असा दुर्लक्षिलेला आवडला नाहीं. ते रूसून नर्मदेच्या पाण्यांत जाऊन बसले. दुपारी भिक्षा घेऊन, हातपाय धुवून आचमन करून नैवेद्य दाखविण्यास महाराज मूर्तीजवळ गेले मात्र, एकदम मोठा स्फोट झाल्यासारखा आवाज झाला; आणि दत्तप्रभूंचे आवेशायुक्त शब्द कानांवर पडले, "आज दिवाळी असून मला मंगलस्नान घातल्यावांचून नैवेद्य दाखवतोस काय? मी इकडे नर्मदेत बसलो आहे. मला नैवेद्य नको कांहीं नको." हे ऐकून आणि ती मूर्ति खरोखर जागेवर नसल्याचे पाहून महाराज कळवळले आणि नर्मदेच्या दिशेने धावले. तेवढ्यांत तिकडून लहान

मुलाच्या रडण्याचा आवाज आला. त्याचा मागोवा घेत ते नदीवर गेले तेव्हां पाण्यांत लख्ख प्रकाश पडला व ती मूर्ति दिसूं लागली. प्रेमभराने देहभान विसरून महाराजांनी नदींत उडी मारली व अलगद ती मूर्ति उचलून हृदयाशीं धरून महाराज कांठावर आले. एवढ्यांत महाराजांना भिक्षेच्या वेळीं अचानक नदीकडे जातांना पाहून ग्रामस्थ मंडळी तिथे आली. पाहतात तर ओल्याचिंब कपड्यांत महाराज मूर्ति छातीशीं धरून स्फुंदत आहेत. मंडळींनी चौकशी केल्यावर महाराजांना भाव आवरीत सर्व हकीकत सांगून प्रभूंचा हट्ट सर्वांना विदित केला. अर्थात् सर्व मंडळींनी अभ्यंगस्नानाचे सर्व उत्तम साहित्य आणून दिले व महाराजांनी भावविभोर अंतःकरणाने त्या मूर्तीची महापूजा केली. त्या वेळीं त्याच्या मुखांतून उत्स्फूर्तपणे खालील अभंग बाहेर पडला. -

**मित्र मित्र जरी भांडती। तरि पुन्हां एक होती।।१।।**
**दंपतीचा हो कलह। लवमात्र न तुटे स्नेह।।२।।**
**देवभक्तांचे भांडणें। पराभक्तीचे ते ठाणे।।३।।**
**वासु म्हणे हा विनोद। देतो दत्ता परमानंद।।४।।**

ज्ञानोत्तर सख्यभक्तीचे असे दिव्य दर्शन ज्यांना झाले ते धन्य होत!

सख्यभक्तीबरोबरच यांत **वात्सल्यभक्ती**चाहि समावेश आहे. देवांनी बाल्याचा अंगीकार केला आहे. आणखी एका प्रसंगीं नरसीच्या चातुर्मासांत (इ.स.१९०५) या अलौकिक वात्सल्यभक्तीचे दर्शन एका भाग्यवान् माउलीला झाले. ऐन दुपारची वेळ होती व महाराज माध्याह्नस्नानासाठी नदीवर गेले होते. त्याच वेळी त्या गांवची एक स्त्री नदीवर पाणी आणण्याकरितां गेली होती. तिला अचानक स्वामीमहाराज एका झाडाखाली बसलेले दिसले. त्यांच्या मांडीवर एक सुंदर सहा महिन्याचे बाळ होते. आपल्या डाव्या हाताचा अंगठा तोंडांत धरून ते बालक महाराजाकडे पहात आहे आणि महाराजहि अनिमिष नेत्रांनी त्याच्याकडेच पहात आहे. कुणालाच आजूबाजूची शुद्ध नाही. ते दृश्य पाहून ती माउली हरखून गेली व पाणी आणायचे विसरून त्या विलोभनीय दृश्याकडे एकटक पहात राहिली. असाच कांहीं काळ गेला आणि एकदम महाराजांची दृष्टि त्या बाईकडे गेली; त्याबरोबर ते बालक अदृश्य झाले व ती स्त्री बेशुद्ध पडली. महाराजांनी तिच्याजवळ जाऊन तिच्या तोंडांत पाणी घालून तिला सावध केले आणि सांगितले कीं "तूं फार पुण्यवान् आहेस. ही हकीकत कोणाला सांगूं नकोस; जा." अर्थात् एवढा संयम कांहीं तिला शक्य झाला नाही व तिच्या तोंडून ही गोष्ट सर्व लोकांना कळली.

**कान्तासक्ती**चा आविष्कार श्रीमहाराजांच्या प्रकट जीवनांत दिसत नाही. महाराज चतुर्थाश्रमी आणि वर्णाश्रमाच्या मर्यादा कटाक्षाने पाळणारे असल्याने मधुराभक्ती किंवा कान्तासक्ती यांचा अभाव साहजिकच आहे. **आत्मनिवेदनासक्ती** मात्र त्यांच्या संपूर्ण जीवनाचा स्थायीभावच होती आणि त्याचेच पर्यवसान असलेल्या तन्मयासक्तीचे दर्शन मात्र त्यांच्या ठिकाणी होते.

**मर्त्यो यदा त्यक्तसमस्तकर्मा निवेदितात्मा विचिकीर्षितो मे।**
**तदाऽमृतत्वं प्रतिपद्यमानो मयाऽऽत्मभूयाय च कल्पिते वै।।**

श्रीमद्‌भागवत:११।२९।३४

सर्व स्वकर्मे माझ्या ठायी समर्पित करून आत्मनिवेदन करणारा मनुष्य माझ्या कृपेने अमृतत्व पावून माझ्याशी एकरूप होतो. म्हणजेच मी आणि तो एकच होऊन जातो. 'गोविंद गोविंद मना लागलिया छंद। मग गोविंद ते काया भेद नाही देवा तया' या तुकारामांच्या उक्तीनुसार तो परमेश्वरस्वरूप - दत्तस्वरूपच होतो. नेमकी हीच अवस्था आपल्याला श्रीस्वामीमहाराजांच्या ठिकाणी प्रत्ययाला येते.

ग्वाल्हेरच्या आळंदीकरांची पत्नी पिशाचग्रस्त झाली असतां, सर्व प्रयत्न निष्फल झाल्याने ते गाणगापूरला श्रीदत्तचरणी शरण गेले. तेथे त्यांना प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंचाच दृष्टान्त झाला की 'मी सांप्रत वासुदेवानंद सरस्वती या नांवाने गरुडेश्वर येथे वास करीत आहे. तरी ताबडतोब येथून निघून तिकडे जावे. तेथे तुमचे काम होईल.' तसाच आळंदीकरांना अनुभवहि आला. त्याचप्रमाणे गाणगापूरला दत्तदर्शनासाठीं तीन वर्षे केवळ फलाहार करून राहिलेल्या तुकाराम नांवाच्या ब्राह्मणाला श्रीमहाराजांच्याच रूपांत दर्शन देण्यासाठी त्यांना पंढरपूरला जाण्याची व त्रिरात्र मुक्काम करण्याची आज्ञा प्रभूंनी केली. त्याप्रमाणे तुकाराम ब्राह्मणाचे समाधान करून महाराजांनी त्यांला "जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा" हे अष्टक करून दिले. या उदाहरणांवरून प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंनीच श्रीस्वामीमहाराजांना आपले स्वरूप मानले आहे हे स्पष्ट होते.

शृंगेरी पीठाधीश जगद्‌गुरु श्रीनृसिंहभारतीस्वामी महाराजांना तृतीय दत्तावतार म्हणत हेहि प्रसिद्ध आहे. वाडींत एकदा वनभोजनाच्या प्रसंगीं तेव्हांचे अधिकारी पुराणाचार्य श्रीवक्रतुंडमहाराज कवीश्वर यांनीहि निरूपणप्रसंगी पुराणांतरी सांगितलेला श्रीदत्तप्रभूंचा योगिराज अवतार म्हणजे श्रीस्वामीमहाराजच होत, असे प्रतिपादन केले होते.

सिद्ध पुरुषांप्रमाणेच पिशाचांनाहि श्रीस्वामीमहाराजांचे दत्तस्वरूप दृग्गोचर होई याचे एक उदाहरण गरुडेश्वर मुक्कामी घडले. एका पिशाचग्रस्त स्त्रीला महाराजांनी वाडीला जाऊन श्रीदत्तपादुकांची सेवा करण्याची आज्ञा केली. तेव्हां एकदम ते पिशाच बोलले, 'वाडीचा दत्त तर इथेच आहे, तिकडे जाण्याची काय आवश्यकता?' हे ऐकतांच महाराजांनी त्या पिशाचाला गप्प राहायला सांगून कमंडलूंतील पाणी त्याच्यावर शिंपून लगेच मुक्ती दिली.

यांपेक्षांहि स्पष्टपणे श्रीस्वामीमहाराज व दत्तप्रभू यांचे ऐक्य दर्शविणारा प्रसंग सांगून हा लेख पूर्ण करूं.

श्रीगुरुचरण योगिराज वामनरावजी गुळवणीमहाराज, वयाच्या २३व्या वर्षी, इ.स.१९१०च्या उन्हाळ्यांत गाणगापूरला श्रीगुरुचरित्राच्या सात सप्ताहांचे अनुष्ठान करीत होते. सहावा सप्ताह पूर्ण झाला असतां तेथे एक रमल जाणणारा आला. त्याला श्री. वामनरावांनी 'सद्‌गुरु श्रीस्वामीमहाराजांचे दर्शन केव्हां होईल?' एसा प्रश्न विचारला. त्याने सांगितले कीं 'येत्या सहा महिन्यांत दर्शन झाले नाही तर कधीच होणार नाही.' हे भविष्य ऐकतांच वामनरावांना धक्काच बसला व सातवे पारायण एका दिवसांतच पूर्ण करून व जवळची छत्री सांगतेकरितां पुजाऱ्याला देऊन ते जिवाच्या आकांताने श्रीस्वामीमहाराजांचा शोध घेण्यासाठी निघाले. जवळजवळ निष्कांचन अवस्थेत, उपाशीतापाशी, पायींच कडक उन्हाळ्यांत दोन महिने स्वामीमहाराजांचा शोध घेत फिरल्यावर, आषाढ वद्य १३ला हावनूरला त्यांचे दर्शन झाल्यावर वामनरावांना किती आनंद झाला असेल ते त्यांनाच ठाऊक. श्रीस्वामीमहाराज त्या वेळी तेथे एकटेच होते व वामनरावांना आपण इथे असल्याचे कोणालाहि पत्राने कळवायचे नाही अशी ताकीद त्यांनी दिली. वामनरावांना ८।१० दिवस श्रीस्वामीमहाराजांचा निकटचा सहवास लाभला; महाराजांच्या बरोबर नित्य स्नान-भिक्षा इत्यादिकांचे भाग्य मिळाले; गीतेच्या अठरा अध्यायांवर केवळ वामनरावांसाठी निरूपण झाले; विष्णुसहस्रनामाची संथा मिळाली; अजपाजप व प्राणायाम यांचे मार्गदर्शन मिळाले. कुंडलिनीयोगाचाहि विषय त्या वेळी निघाला होता म्हणे! असा हा देवदुर्लभ सहवास कधी संपूंच नये असे वाटत असतांच वडिलाच्या वर्षश्राद्धासाठी जाण्याची महाराजांची आज्ञा झाली. थोरल्या महाराजांबरोबर तुंगभद्रास्नान, माधुकरी व भिक्षा झाली. भोजनसमयी महाराजांनी आपल्या पानांतला एक घांसहि प्रसाद म्हणून वामनरावांच्या पानांत टाकला. आणि

सद्‌गुरुचरणाना सोडून जाण्याची वेळ जवळ आली. वामनरावांच्या मनांत कालवाकालव सुरूं झाली. सामानाची बांधाबांध करून वामनराव निघाले. श्रीस्वामीमहाराज एका कट्ट्यावर सिद्धासनांत बसले होते. वामनरावांनी त्यांना साष्टांग नमस्कार केला व सद्‌गदित कंठाने विचारले, 'महाराज! आतां पुन्हां कधी दर्शन होणार?' महाराजांनी माननेच आपल्या देहाकडे निर्देश केला व म्हणाले, 'हे असेच लक्षात ठेव.' त्याबरोबर वामनरावांना असे दिसले की श्रीस्वामीमहाराजांचे कमरेपासून वरचे शरीर पारदर्शक झाले आहे आणि त्यांत, हृदयाचे स्थानी पाय ठेवून उभे असलेले व्याघ्रचर्मधारी षड्‌भुज दत्तप्रभू अतीव वात्सल्याने आपल्याकडे पाहून स्मित करीत आहेत. देहभान हरवणारे ते दर्शन पाहता पाहता लुप्त झाले आणि पुनश्च तिथे स्वामीमहाराज दिसूं लागले. भावाने ओथंबलेल्या अंतःकरणाने आणि आंसवांनी आर्द्र नेत्रानी वामनरावांनी मूकपणेच पुनश्च सद्‌गुरूना वंदन केले आणि ते विश्वमोहन रूप मनांत सांठवत मार्गस्थ झाले. तेच रूप श्रीगुरुमहाराजांनी चित्रांकित केलेले आजहि श्रीवासुदेवनिवासांत ठेवलेले आहे.

तोच श्रीवासुदेवस्वरूपी भगवान् दत्तात्रेय आमच्या हृदयांत नित्य राहो हीच प्रार्थना करून लेखनाला विराम देऊं. श्रीगुरुदेव दत्त!

।। श्रीगुरुः शरणम्।।

## प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वति (टेंबे) स्वामिमहाराज आणि समर्थसंप्रदाय

श्रीसमर्थ रामदास स्वामी यांना त्यांचे उपास्य दैवत प्रभु श्रीरामचन्द्रांकडूनच श्रीराममंत्राची प्राप्ती झाली होती त्याचप्रमाणे श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांनाहि त्यांचे उपास्य दैवत भगवान् श्रीदत्तात्रेयांकडूनच श्रीदत्तमंत्राची प्राप्ती झाली होती. श्रीदत्त व प्रभु रामचंद्र हे भगवान् विष्णूंचेच अवतार होते; एक कृतयुगांतले तर एक त्रेतायुगांतले! पुराणांतरी त्यांच्या परस्पर भेटीचा कुठे संदर्भ दिसत नाही. श्रीवाल्मीकी रामायणांत वनवासांत जातांना श्रीरामचंद्र, सीतामाई आणि लक्ष्मण यांच्यासहित अत्रि ऋषींच्या आश्रमांत गेल्याचे वर्णन आहे. परंतु तेथे त्यांच्या दत्तप्रभूंशी भेट वा संभाषण झाल्याचे वर्णन मात्र दिसत नाही. श्रीधरस्वामी नाझरेकर यांनी मात्र आपल्या "रामविजयां" त त्यांच्या भेटीचे हृद्य वर्णन केले आहे. प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराजांनीहि श्रीमद्दत्तपुराणांत ४७व्या अध्यायांत "**गत्वात्रेराश्रमं लब्धजयाशीर्दत्तसंमतः**" असा धावता उल्लेख केला आहे. दत्तशिष्य परशुराम यांच्याशी श्रीरामांशी झालेला संघर्ष सर्वश्रुत आहे. परशुरामाला तपस्येला जाण्याची आज्ञा देतांना श्रीदत्तप्रभूंनी पुढे रामावतारांत आपण त्याचे तेज आकर्षून घेणार असल्याचे भविष्य सांगितले आहे.

**विधिहरिहर सुंदर दिगंबर झाले।**
**अनसूयेचे सत्त्व पहावया आले।**
**तेथे तीन बाल करूनि ठेविले।**
**दत्त दत्त ऐसे नाम पावले।।१।।**
**जय देव जय देव जय दत्तात्रेया।**
**आरती ओवाळूं तुज देवत्रया।।ध्रु।।**
**तिहीं देवांच्या युवति पति मागों आल्या।**
**त्यांना म्हणे वळखूनि न्या आपल्याला**
**कोमल शब्देकरुनी करुणा भाकिल्या।**
**त्यासी समजाविल्या स्वस्थानी गेल्या।।२।।**
**काशी स्नान करविरक्षेत्रीं भोजन।**
**मातापुरिं शयन होते प्रतिदिन।**
**तैसे हे अघटित सिद्ध महिमान।**
**दास म्हणे हे तों नव्हे सामान्य।।३।।**

ही श्रीसमर्थ रामदास स्वामींची आरती त्याच्या दत्तभक्तीची साक्ष देते. अशीच एक भूपाळीहि समर्थांनी केलेली आहे. त्यांत वाडीच्या काकडआरतीचा उल्लेख आहे. "**करुनि कृष्णेचे स्नान। घेउनि पूजेचे सामान। सकळां लागले तव ध्यान। कपाट केव्हां उघडेल**" हे वर्णन आजहि वाडीत पडताळतां येईल. त्याच भूपाळीत शेवटी "**तूचि माझी बापमायी। प्रतिपाळावे भक्तासी**" अशी प्रार्थना आहे. यावरून ह्या समर्थ रामाच्या दासाला दत्तात्रेय ह्या दैवताविषयी आत्मीयता व आदर होते हे स्पष्टच आहे. महान् दत्तभक्त दासोपंत आणि संतश्रेष्ठ एकनाथ यांच्या वाङ्मयाची छाप श्रीसमर्थांच्या ग्रंथांतून ठिकठिकाणी दिसते याचे सविस्तर विवेचन संतवाङ्मयाचे अभ्यासक ह.भ.प. ल.रा. पांगारकर यांनी केले आहे. समर्थांचे चरित्रकार आत्माराम यांनी "दासविश्रामधामांत" समर्थांना झालेल्या श्रीदत्तदर्शनाचे कांहीं प्रसंग वर्णिले आहेत. ते असे.

एकदां समर्थांना अचानकच हातांत जलपूर्ण कमंडलु धारण केलेल्या श्रीदत्तांचे दर्शन झाले. आपल्या कमंडलूंतील पाणी समर्थांना पाजवून दत्तप्रभूंनी त्यांना एकदम (अवचट) 'शिखरावर' (माहूर किंवा गिरनार) 'रम्य सुशीतळ' वनांत नेले. तेथे त्यांच्याशी बराच संवाद झाला व दत्तगुरूंनी समर्थांना निर्छायादि योगांचा उपदेश केला. तसेच "शाप, ताप, कोप व यमभये" यांपासून संरक्षण करणारा एक अमोलिक मणि समर्थांच्या पायांत स्वहस्ते बांधला व अदृश्य झाले असे वर्णन आहे.

दुसऱ्या एका प्रसंगीं आंबेजोगाईच्या परिसरांत कांहीं ब्राह्मण दत्तदर्शनाच्या इच्छेने तप करीत होते. समर्थांना ओळखून त्यांनी आपला हेतु सांगून त्यांचे साह्य मागितले. समर्थांनी त्यांना "भाव दृढ करा" असे बोलून तेहि त्यांच्याजवळ बसले. एक प्रहर रात्र उलटल्यावर दत्तप्रभु गारुड्याच्या रूपांत पत्नी पांच मुले, हल्यावर लादलेली गोणी, हातांत पाच कोंबडे व एक बोकड अशी परिवारासह तेथे येऊन थांबले. त्या वेळी बरोबरच्या स्त्रीला "भूक लागली" असे म्हणून स्वयंपाक करायला सांगितले. तिने एक चूल मांडून तीवर हंडी चढविली व कोंबडे व बोकड कापून त्यांत घातले. तरी हंडी भरत नाही असे पाहून क्रमाक्रमाने तो हल्या व नंतर पोरेहि कापून त्यांत घातली तर हंडी भरेना. तेव्हां ते पलीकडे बसलेले परदेशी (तपाला बसलेले ब्राह्मण) आहेत असे

।। श्रीगुरुः शरणम्।।

# प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती (टेंबे) स्वामी महाराज आणि वाडीचे कवीश्वर

**त्रैमूर्तिराजा गुरु तोचि माझा। कृष्णातिरी वास करूनि वोजा।।**
**सुभक्त तेथे करिती आनंदा। ते सुर स्वर्गी पहाती विनोदा।।**

प.प. श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज, म्हणजेच पूर्वाश्रमीचे वासुदेवशास्त्री वाडीला प्रथम आले, त्याच काळांत गोविंदस्वामींकडे येणाऱ्या भक्तांमध्यें रामभाऊ व वक्रतुंड हे कवीश्वर बंधू होते. दोघेहि वेदशास्त्रसंपन्न असून त्यांची पुराणवाङ्मयाचा अभ्यास, व्यासंग व निरूपण यांसाठी भारतभर ख्याति होती. रांमशास्त्री कवीश्वर यांनी श्रीक्षेत्र मोरगांव येथे मोरयाच्या मंदिरांत उभ्यानें महाभारताची पारायणे केली व मोरयाचा प्रसाद प्राप्त केला. त्यांना "भारतीबुवा" ही पदवी लोकांनी आदराने दिली होती. ह्यांच्या भागवतसप्ताहाला प्रत्यक्ष दत्तप्रभू येत असे वाडींतील महान् सत्पुरुष मौनीस्वामी ह्यांनी सांगितले होते. वक्रतुंडमहाराजहि तसेच अधिकारी वक्ते होते. रामायण, महाभारत आणि भागवत तसेच एकूण पुराणवाङ्मयावर यांचे प्रभुत्व होते. पुराण सांगतांना श्रोत्यांना विचारून त्यांच्या आवडीप्रमाणे विषय निवडून त्यावर ते दोन-दोन तास प्रवचन करीत. हे दोघेहि भाऊ श्रीगोविंदस्वामींचे भक्त होते. तसेच वाडींतच त्या काळीं असणारे मौनीस्वामीहि त्यांचे परम आदराचे स्थान होते.

## कवीश्वरांचा पूर्वेतिहास

कवीश्वरांचे घराणे मूळ सप्तर्षि नांवाचे शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे नगरजवळील मांडवगणचे होय. ह्या उपमन्यु गोत्राच्या घराण्याची एक शाखा वाईला स्थिर झाली होती. ह्यांची कुलदेवता माहूरची रेणुकामाता असून ह्या घराण्यांत गणेशाची उपासना परंपरेने चालूं होती. उपरिनिर्दिष्ट कवीश्वरबंधूंचे पणजोबा **श्री. दादा दीक्षित** ह्यांनी मुद्‌गल पुराणावर भाष्य लिहिणाऱ्या, महान् गाणपत्य श्रीगणेशयोगीन्द्र महाराजांकडून श्रीगणेशमंत्र प्राप्त करून घेऊन, मोरगांवक्षेत्रांत केवळ दूर्वांकुरांच्या आहारावर वर्षभर कडकडीत अनुष्ठान केले. ह्याने प्रसन्न होऊन त्यांना एक स्वयंभू गणेशमूर्ति मिळाली व स्वप्नांत ब्राह्मणाच्या रूपांत श्रीगणेशांनीं आशीर्वाद देऊन वर दिला कीं, "तुझ्या घरांत ईश्वराचा अनुग्रह असलेले पुराणवेत्ते महापुरुष जन्माला येतील." दादा दीक्षितांचे नातू भालचंद्रशास्त्री! यांना **दाजी दीक्षित** म्हणत. घरांतील परंपरेनुसार त्यांचे

रामायण-महाभारतादि पुराणवाङ्मयावर तर प्रभुत्व होतेच; तसेच मंत्रशास्त्रांतहि ते अधिकारी होते; त्यांना श्रीब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांचा अनुग्रह प्राप्त होता. विद्यागणेश व वाञ्छाकल्प यांचे नित्य अनुष्ठान करून त्यांनी श्रीगणेशाची कृपा प्राप्त केली होती. ते श्रौतस्मार्तकर्मांत प्रवीण असून धर्मशास्त्रांतील त्यांचा अधिकार सातारच्या राजदरबाराने मानलेला होता. तेथे धर्मशास्त्राचा कांहीं प्रश्न उपस्थित झाल्यास निर्णयासाठी त्यांना पाचारण केले जाई. एकदां एका कांहीं ग्रामीण वादाच्या निर्णयासाठी असेच त्यांना बोलावणे आले. राजदरबारांत आपल्याला कदाचित् राजाला अप्रिय निर्णय देण्याचा प्रसंग येईल असे वाटल्याने त्यांनी वाई सोडली व ते तडक घोड्यावरून श्रीक्षेत्र नरसोबावाडीला येऊन तिथेच राहिले. यावरून त्यांच्या प्रखर धर्मनिष्ठेची कल्पना यावी.

वाडीला आल्यावर दाजी दीक्षितांनी श्रीदत्तप्रभूंची श्रीगणेशाभिन्न भावाने अनन्य उपासना आरंभिली. जप-तप-अनुष्ठान यांखेरीज रोज नवे पांच श्लोक रचून ते श्रीदत्तचरणीं समर्पण करण्याचा त्यांचा नेम होता. श्रीगुरुचरित्रांत वर्णन केलेल्या कल्लेश्वरभक्त नरहरीसारखीच त्यांची ही प्रतिभा पाहून वाडीकरांनी त्याना कवीश्वर ही पदवी दिली आणि तेंच आडनांव रूढ झाले. पुढे वाडींतच स्थिर होण्यासाठी त्यांनी देवाची प्रार्थना केली. तेव्हां देवांनी त्यांना तशी आज्ञा दिली आणि "भाजी-भाकरी खचितच मिळेल" असा आशीर्वाद दिला. या स्वप्नदृष्टांतानंतर पंधरा दिवसांत त्यांना कागवाडच्या फणसळकरांनी कृष्णाकांठचा तीन मजली वाडा दान दिला. अशा रीतीने वाईचे सप्तर्षि वाडीचे कवीश्वर झाले. पुढे त्यांना कुरुंदवाडच्या संस्थानाचाहि आश्रय मिळून कांही जमीनजुमलाहि मिळाला. अशा ह्या महान् गणेश-दत्तगुरुभक्ताला पत्नी पण साजेशी- परमार्थप्रवण मिळाली होती. **सौ.सगुणाबाईंचा** नित्य १०८ दत्तप्रदक्षिणांचा नियम कधींच चुकला नाही. त्यांच्या गरोदरपणीं त्यांना होणारे कष्ट पाहून कांही दिवस प्रदक्षिणा बंद ठेवण्याची सूचना स्वतः भालचंद्रशास्त्रींनी केली; पण त्या माउलीने अत्यंत नम्रतेने आपला नियमांत बाधा न घालण्याची पतीला विनंति केली व हळूंहळूं प्रदक्षिणा घालून निश्चयाने नियम पुरा केला. दाजींनी प्रसन्न होऊन "तुझा पुत्र गणपतीचा महान् उपासक होईल" असा आशीर्वाद दिला. तो सफल होऊन शके १७६१ (इ.स. १८३९) मध्ये अश्विनाच्या संकष्टीला वक्रतुंडमहाराजांचा जन्म झाला.

## श्री वक्रतुंडमहाराज

बालपणांतच वक्रतुंडमहाराजांची भक्ति त्यांच्या बाललीलांतून प्रकट झाली. खेळांत देव मांडावा, त्याची पूजा करावी, आरती गावी, फुले वहावी हेच त्यांना आवडत असे. आठव्या वर्षी मुंज झाल्यावर आपल्या विद्वान् पित्याजवळच ते वेद-शास्त्र-पुराण शिकले. कुशाग्र बुद्धि आणि अद्‌भुत स्मरणशक्तीच्या देणगीने अल्पवयांतच अधिकारी प्रवचनकार म्हणून ते मान्यता पावले होते. पुढे अध्यापन करतांना त्यांना मुलांनी कांहीं शंका विचारल्यास त्याला त्याचे उत्तर कुठल्या पोथींत, कुठल्या पानावर व कुठल्या परिच्छेदांत आहे ते सांगत. त्यांच्या प्रवचनशक्तीचा उल्लेख मागे आलाच आहे. देवाच्या स्वारीपुढे पुराण सांगण्याची प्रथा वाडींत त्यांनीच सुरूं केली. पुढे गोविंदस्वामींकडूनच मंत्रोपदेश घेऊन त्यांचे शिष्यत्व त्यांनी पत्करले होते.

वासुदेवशास्त्री वाडीला प्रथम आले (इ.स. १८७९) तेव्हां त्यांचे वय २३ वर्षांचे होते व वक्रतुंडमहाराजांचे वय ४०चे होते. त्या वेळीं त्यांचा मुक्काम वाडींत महिनाभर झाला. ह्याच काळांत बुवांकडूनदेवांनी गुरुचरित्राचा सप्ताह करून घेतला, त्यांना रात्री दक्षिणद्वारासमोर दर्शन दिले तसेच दत्तपादुकांची पूजा रोज करण्याची आज्ञा केली. त्याचप्रमाणे एकदा देवांनी बुवांना पार्थिवपूजा करण्यास सांगितले. बुवांनी प्रथम ते मनावर घेतले नाही; पण पुन्हा तसेंच सांगणे झाले. बुवांनी आपल्याकडे विधान नाही असे म्हणतांच तें विधान कवीश्वरबुवांकडे मिळेल, असे उत्तर मिळाले. त्याप्रमाणे ते विधान मिळवून बुवांनी कांहां दिवस पार्थिवपूजा केली. पुढे देवांनीच सांगितल्यावर बंदहि केली. ह्या घटनेवरून बुवांच्या व कवीश्वरबंधूंच्या हार्दिक संबंधांना या प्रथम भेटींतच आरंभ झाला असे दिसून येते. "समानशीले व्यसनेषु सख्यम्" या न्यायाने हे ऋणानुबंध उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेलेले आपण पाहणार आहोंत.

यानंतर बुवा माणगांवीं परतले. त्यावेळीं त्यांनी चित्तशुद्धीसाठी अत्यंत कठोर अशा चांद्रायण व्रताचे आचरण केलें. ते पूर्ण होतांच दत्तजयंतीच्या उत्सवांसाठी ते वाडीला आले. त्या वेळी ३।४ महिने मुक्काम झाला. ह्याच मुक्कामांत शास्त्रीबुवांना प्रत्यक्ष दत्तप्रभूंकडून मंत्र मिळाला व श्रीगोविंदस्वामींच्या मार्गदर्शनाने त्याचे अनुष्ठान त्यांनी सुरूं केले. त्याचबरोबर गोविंदस्वामींनी त्यांना उपनिषद्‌भाष्य रोज वाचण्याची आज्ञाहि केली.

## श्रीमौनीस्वामी

ह्याच मुक्कामांत शास्त्रीबुवांना संन्यास घेण्याची तीव्र इच्छा झाली. पण वाडींतील दुसरे अधिकारी सत्पुरुष श्रीमौनीस्वामी यांनीं त्यांना "अद्यापि कांहीं दिवस तुमचे माणगांवीं वास्तव्य होणार आहे", असे सांगितले. हे मौनीस्वामी मूळ सोलापूरचे असून बालपणींच घराबाहेर पडून अनेक वर्षे केवळ कडुलिंबाच्या पाल्याचा आहार घेऊन तपश्चर्या केली. काशी-रामेश्वरच्या अनेक यात्रा केल्या व वयाच्य अवघ्या २५व्या वर्षीं संन्यास घेतला. त्यावेळी त्यांचे नांव "प्रद्युम्नसरस्वती" असे ठेवण्यांत आले. दीर्घकाळच्या मौनव्रताने लोक त्यांना "मौनीस्वामी असे संबोधूं लागले. कांही वर्षे उज्जैनीला वास्तव्य केले. तेथे त्यांनी एका सुंदर गोपाळकृष्णाच्या मंदिराची निर्मिति केली. पुढे ते नरसोबावाडींत येऊन स्थिरावले. मौनव्रताच्या प्रभावाने त्यांना वाचासिद्धि प्राप्त झाली होती. ते म्हणतील ते खरे होत असे. प्रत्यक्ष दत्तप्रभूही यांच्या शब्दाला मान देत. यांची बालवृत्ती असून लहान मुलांत खेळणे, त्यांना खाऊ देणे, त्यांना घेऊन भजन करणे त्यांना आवडत असे. कवीश्वर कुटुंब आणि वासुदेवशास्त्री टेंबे यांच्यासह वाडींतील सर्व सात्त्विक मंडळींचे हे श्रद्धास्थान होते.

ह्याच मुक्कामांत पुढे श्री दत्तप्रभूंनी वासुदेवशास्त्रींना आपण सात वर्षें माणगांवीं येऊन राहणार असल्याचे सांगितलें. त्याप्रमाणे त्यांनी माणगांवीं जाऊन दत्तमंदिराची प्रतिष्ठापना केली.

## दत्तूबाळ

ह्याच काळांत शास्त्रीबुवांचे गुरुबंधू वक्रतुंडमहाराज यांनाहि संन्यास घेण्याची इच्छा झाली. त्यांच्या जीवनांत एक मोठेच शल्य होते. त्यांची मुले जगत नसत. वीस अपत्यें होऊनहि फक्त दोन मुलीच काय त्या जगल्या. यामुळे निराश होऊन त्यांनी गोविंदस्वामींच्या चरणी आपल्याला संन्यासदीक्षा देण्याबद्दल प्रार्थना केली. तेव्हां मात्र गोविंदस्वामींनी त्यांना स्पष्ट आश्वासन दिले की, "यापुढे तुझी संतति वाचेल. तुला एक अलौकिक पुत्र होणार आहे." आणि वक्रतुंडमहाराजांचा विश्वास बसावा याकरितां, "हा घे बाळ!" असे म्हणून त्यांना त्यांनी आपल्याजवळची छोटी दत्तमूर्ति प्रभावळींसह दिली. ह्या मूर्तीचा अत्यंत भक्तिभावाने स्वीकार करतांना वक्रतुंडमहाराज "दत्तूबाळ ! दत्तूबाळ !" असे म्हणून गहिंवरून गेले. त्यांनी श्रीगुरुवचनावर पूर्ण विश्वास ठेवून त्या मूर्तीचे बारसे केले, तिचे सोळा संस्कार यथासांग समारंभपूर्वक केले, नाना अलंकारादींनी नटवले, सजवले, नित्य जवळ बाळगले. त्या मूर्तीची सर्व बडदास्त आपल्या मुलाप्रमाणेच ठेवून प्रवासांतहि ती आपल्याबरोबर नेत असत.

वक्रतुंडबुवांच्या पत्नीही मोठ्या साध्वी होत्या. फलटणच्या रामचंद्रपंत कोचकांच्या या कन्या. त्यांचा श्रीदत्ताला नित्य १०८ प्रदक्षिणा घालण्याचा नियम होता. इ.स. १८८६ त या सत्त्वनिष्ठ दंपतींची तपश्चर्या फळली आणि त्यांना पुत्रलाभ झाला. श्रीगणेशाचा कृपाप्रसाद म्हणून त्यांचे नांव धुंडीराज असे ठेवण्यांत आले. ह्या वेळेपावेतों माणगांवचे दत्तमंदिर चांगलेच भरभराटीला आले होते. वासुदेवशास्त्री वर्षातून २।४ वेळां तरी वाडीला येत असत. अर्थात्च त्यांच्या व कवीश्वरबंधूंच्या भेटीगांठी होतच असणार. याप्रकारे उभयतांत, श्रीगोविंदस्वामी आणि श्रीमौनीस्वामी या सत्पुरुषांच्या कृपाछत्राखाली, स्नेहादराचे ऋणानुबंध वृद्धिंगत झाले. कुडुत्रीच्या दत्तोपंत गुळवणींचेहि वाडीला दर पौर्णमेला येणे होत असे. गुळवणी घराण्याचेहि कवीश्वरांशी घनिष्ठ संबंध होते. धुंडीराज महाराजांच्या जन्मानंतर सहा एक महिन्यांतच दत्तोपंतांच्या सती सौ.उमामाता यांच्या ओटींत साक्षात् नृसिंहसरस्वतींनी आपल्या गंधयुक्त पादुका टाकल्या व त्यानंतर कांहीं दिवसांतच त्यांच्या घरी वामनाचा (प.पू. योगीराज श्रीगुळवणीमहाराज) जन्म झाला.

## माणगांवला रामराम.

बघतां बघतां १८९० साल आले. माणगांवी एका सकाळी वासुदेवशास्त्रींना अवचित आज्ञा झाली, "माणगांव सोडावे." अशा रीतीने वाडीचा हा पाहुणा यजमानाला घेऊनच परतला. आपल्या गरोदर पत्नीला घेऊन, माणगांवच्या देवळाचे सर्व वैभव सोडून वासुदेवशास्त्री वाडीत आले. धर्मशाळेत मुक्काम झाला. कोरान्न भिक्षेवर पतिपत्नींचा निर्वाह होत होता. लवकरच गोखल्यांच्या ओवरींत सौ.अन्नपूर्णामाता प्रसूत झाल्या. जातकर्माच्या आधींच पुत्र मृत झाला. त्या माउलीच्या खडतर संसारांत हा सुखाचा अंकुर फुटतांनाच सुकून गेला. तिचे समाधान शास्त्रीबुवांनी अध्यात्माच्या उपदेशाने केले. यानंतर सोयर संपतांच शास्त्रीबुवा ब्रह्मानंदांच्या माडीवर राहूं लागले. देवांच्या आज्ञेने तिथे त्यांनी अतिथिसत्कारपूर्वक गृहस्थाश्रम केला.

## गोविंदस्वामी ब्रह्मलीन

या काळांत गोविंदस्वामींनी त्यांना दशोपनिषदे सांगितली व आपल्या उपनिषदांच्या पोथ्या व शाळिग्राम शास्त्रीबुवांना दिल्या. त्यांच्याकडून मनन वाचून घतले व त्यांतील गूढार्थ शास्त्रीबुवांना समजावून दिला. यानंतर लवकरच श्रीगोविंदस्वामींचा समधिकाल जवळ आला. तो देवांनी दृष्टांताद्वारे

शास्त्रीबुवांना कळविला. तेव्हांपासून बुवा गोविंदस्वामींच्याजवळ बसून राहिले. दुसऱ्या दिवशी गोविंदस्वामींनी देह ठेवला. त्यांच्या पवित्र देहाचे विसर्जन कृष्णामाईच्या डोहांत करून मौनीस्वामींच्या आज्ञेने आपल्या ब्रह्मनिष्ठ सद्‌गुरूंचा समाराधना विधि शास्त्रीबुवांनी केला.

## वासुदेवशास्त्रीचा संन्यास.

या काळांत गोविंदस्वामींप्रमाणेच मौनीस्वामींच्याही कृपेचा लाभ शास्त्रीबुवांना झाला. वाडीच्या नित्य उपासनेंत बुवांचा सहभाग वाढला आणि गोविंदस्वामी आणि मौनीस्वामी यांच्याप्रमाणेच त्यांना लोक मानूं लागले. त्यांचे मार्गदर्शन घेऊं लागले. ह्यांत कवीश्वरबंधूहि ओघानेच होते. त्यामुळे वाडीतील वर्षाचे वास्तव्य पूर्ण होतांच देवांच्या आज्ञने जेव्हां वासुदेवशास्त्री सहकुटुंब उत्तरेला जाण्यास निघाले तेव्हां पुजारी मंडळींनी त्याना परावृत्त करण्याचा खूप प्रयत्न केला. "देवांच्या आज्ञेविरुद्ध आपण जाऊं शकत नाही" असे बुवांचे उत्तर ऐकून मंडळींनी आपले गाऱ्हाणे मौनीस्वामींपुढे नेले. शास्त्रीबुवाच्या भावी अवतारकार्याची पूर्ण जाणीव असणाऱ्या मौनीस्वामींनी, निरोप घेण्यास आलेल्या शास्त्रीबुवांना "कोल्हापूरला जातां काय? बरे तर तिथे दोन दिवसांपेक्षां जास्त राहूं नका" असे मोघम बोलून मंडळींचे समाधान केले व शास्त्रीबुवांचा मार्ग मोकळा ठेवला. ही त्यांची अनुज्ञाच समजून शास्त्रीबुवांनी वाडी सोडली व उत्तरेकडे जातांना गंगाखेड इथे पत्नीच्या देहावसानानंतर लगेच १४व्या दिवशी संन्यासाश्रमांत पदार्पण करून "अनाश्रमी न तिष्ठेत" या शास्त्राज्ञेचे प्रात्यक्षिकच जणूं समाजाला आचरून दाखविले.

## साग्निचित ज्योतिष्टोम याग

शास्त्रीबुवांच्या प्रस्थानाची गडबड चालू असतांनाच रामभाऊ कवीश्वरांच्या एका महान् यागाची तयारी सुरूं झाली. रामभाऊंची श्रौताग्नीची उपासना दांडगी होती. त्यांना एकदां साग्निचित ज्योतिष्टोम याग करण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. हा मोठाच खर्चाचा आणि व्यापाचा विषय होता. शतकांतून एखादा असा याग कुणी करीत असत. रामभाऊंनी वक्रतुंडबुवाशी विचार करून त्यांच्या सूचनेने ते मौनीस्वामींकडे आले. ते गोविंदस्वामींबरोबर वार्तालाप करीत होते. उभयतांच्या समक्ष आपला मनोदय कवीश्वरबंधूंनी ठेवला. दोघांहि सत्पुरुषांनी सहर्ष संमति देऊन "सर्व ठीक होईल" असा आशीर्वादही दिला. हा आशीर्वाद घेऊन कवीश्वरबंधू तयारीला लागले.

रामभाऊ कवीश्वर "भारतीअण्णा" काशीला गेले. तिथे काशींतील सर्व पंडितमंडळी आणि दक्षिणामूर्तीस्वामीमहाराजांसमोर भागवतसप्ताह केला. सर्व पंडितांनी एकमुखाने रामभाऊंचा गौरव केला. दक्षिणामूर्तीस्वामीमहाराजांनी तर भारतीबुवांना दृढ आलिंगन देऊन त्यांच्यावर प्रेमाश्रूंचा अभिषेक केला. अशा ह्या काशीयात्रेची सांगतां शास्त्राप्रमाणे सिंहस्थांत गोदातीरी नाशिक येथे करून व तेथील ब्रह्मवृंदांना यज्ञाचे आमंत्रण देऊन रामभाऊ वाडीला आले. येतांना यज्ञासाठी राजेरजवाडे व धनिक मंडळींकडून द्रव्यसाह्यहि मिळवत आले. सर्व भारतभरांतून ब्रह्मवृंदांना निमंत्रणे गेली. वाडीच्या चिंचेच्या बनांत भव्य मंडप उभारला. कृष्णा नदींतील एक मोठे कांसव आणले व एका मोठ्या जलपात्रांत ते ठेवून, शास्त्रविधानाप्रमाणे त्याच्या पाठीवर यज्ञवेदीची स्थापना केली. हजारों लोकांना अन्नदान होऊन हा यज्ञ १८९१ सालीं संपन्न झाला. यज्ञाच्या शेंवटी त्याच्या सफलतेचे द्योतक असे ते कांसव वेदीखालून सुखरूप बाहेर पडले. हा यज्ञ त्या काळीं सर्व भारतभर गाजला. सर्वांना श्रीगोविंदस्वामी व श्रीवासुदेवानंदसरस्वती यांची अनुपस्थिती मात्र खटकत होती. शंकरशास्त्री गुळवणी आपल्या मातुःश्री उमाबाई व छोटे बंधु वामन यांसह या यज्ञाला आले होते. कवीश्वरांचा धुंडिराज आणि गुळवणींचा वामन हे कधी कुणाच्या खांद्यावर तर कधी कडेवर बसून हा यज्ञ पहात होते.

## कवीश्वरांची अग्निपरीक्षा

या यज्ञांत झालेले १५|२० हजाराचे कर्ज फेडण्यासाठी कवीश्वरबंधूंची भ्रमन्ती सुरूं झाली. प्रारब्धयोगाने रामशास्त्री कर्ज न फेडतांच मृत्यू पावले. दोघे बंधू विभक्त असल्याने व कर्ज रामभाऊंनीच घेतले असल्याने, सर्व सावकारांनी त्यांचे चिरंजीव गणेशशास्त्री यांचेकडे लकडा लावला. त्यांना हे कर्ज फेडणे अशक्यप्रायच होते. आपल्या पुतण्याची ही अवस्था वक्रतुंडबुवांना पाहवली नाही. त्यांनी सर्व सावकारांना भेटून कर्जाची पूर्ण जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. अशा रीतीने गणेशशास्त्री उत्तरेकडे व वक्रतुंडबुवा दक्षिणेकडे अशी विभागणी करून कीर्तन-प्रवचन-पुराण यांच्या द्वारा निधि गोळा करायला सुरुवात केली.

## वक्रतुंडबुवांचा लोकोद्धार

या प्रसंगाने श्रीवक्रतुंडबुवांचे औदार्य व मनाचे मोठेपण तर प्रकट झालेच; पण त्यानंतरच्या परिभ्रमणांत आलेल्या प्रसंगांतून त्यांची विद्वत्ता व साधुत्वही लोकांच्या प्रत्ययाला आले. खर्ड्याच्या (नगर जिल्हा) एका उत्सवाला

त्यांनी पाणक्याचे कामही पत्करले. पुढे ईश्वरी इच्छेने तेथील पुराणिकांना वैयक्तिक कारणाने जावे लागले व ते काम वक्रतुंडबुवांना मिळाले. अशा रीतीने त्यांची विद्वत्ता आणि वक्तृत्व सर्वांना कळले. महिन्यापेक्षां अधिक चाललेल्या या उत्सवांत पुढे त्यांच्या साधुत्वाचीहि अनुभूति लोकांना येऊन ते सर्व गांवच त्यांचे भक्त झाले. त्यांत अठरापगड हिंदूच नव्हे तर मुसलमानहि समाविष्ट आहेत. कवीश्वरांचे हे गुरुत्व आजहि चौथ्या पिढीच्या पू. अशोकमहाराजांपर्यंत चालत आले आहे.

एकदां जंगलांतून बैलगाडीने प्रवास करतांना रात्रींच्या वेळीं मुक्काम टाकावा लागला. दैवयोगाने तेथील लुटारू टोळीने त्यांना गांठले. पण श्रीवक्रतुंडबुवांच्या तेजस्वी, धीरगंभीर मूर्तीचे दर्शन होतांच त्या लमाणांची वृत्ती पालटली. त्यांनी महाराजांना नमस्कार केले व लुटण्याऐवजी त्यांच्या संरक्षणाची हमी घेतली. असे अनुभव येत होते व वक्रतुंडबुवांची कीर्ति पसरत होती.

कवीश्वरांचे सावकार मोतीलालशेठ यांनी आपल्या २००० रु.च्या वसुलीसाठी शोध काढीत त्यांना खर्डा मुक्कामी गांठले. शास्त्रीबुवांनी त्यांना ठेवून घेतले व सप्ताहसमाप्तीला जमलेल्या पैशांतून त्यांचे पैसे चुकते केले; पण त्यांची पावतीसुद्धां मागितली नाही. वक्रतुंडबुवांच्या ऋजुतेचा आणि साधुत्वाचा हा अनुभव घेऊन तो सावकार महाराजांच्या चरणीं लीन झाला व त्यांनेही त्यांचे शिष्यत्व स्वीकारले.

श्रीगणेशक्षेत्र राजूर (जालना) येथे श्रीवक्रतुंडंहाराजांनी दाखविलेला नैवेद्य श्रीगणरायाने आपली सोंड लांबवून ग्रहण केल्याचा चमत्कार एका

१०।१२ वर्षांच्या मुलीने पाहिला. खरे तर सर्वांना दूर पाठवून मगच शास्त्रीबुवा नैवेद्य दाखवीत होते. पण ही चिमुरडी व तिचे आजोबा तिथे घुटमळले व ह्या दर्शनाने धन्य झाले.

या सर्व प्रवासांतूनच पुढे जालन्याजवळील देऊळगांव (राजा) येथील भक्तांच्या आग्रहाने १९०६ साली तेथे एक घर झाले व तिकडे दरवर्षी कांही महिने मुक्काम होऊं लागला. तीच परंपरा आजतागायत चालूं आहे. प.पू. श्रीधुंडिराज महाराज यांची समाधी तिथेच आहे. दर वर्षी तेथे पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या प्रमाणावर होतो. हजारो भक्तांना भंडाऱ्याचा प्रसाद मिळतो.

## मौनीस्वामी समाधिस्थ

याच वर्षी मार्गशीर्ष व।।९ ला श्रीमौनीस्वामी समाधिस्थ झाले. प्रवासांत असलेल्या श्रीवक्रतुंडबुवांनी हे जाणून सर्व मंडळींना बोलावून, त्यांच्यासह

वाडीकडे मुख करून ईश्वरस्मरणपूर्वक वंदन करून श्रीमौनीस्वामींना श्रद्धांजली वाहिली.

अशा रीतीने दक्षिणेत वक्रतंडबुवांची कीर्ति पसरत चालली असतांना प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराज मात्र उत्तरेतच परिभ्रमण करीत होते. त्यांचीहि लोकोत्तरता व अवतारिता सर्वत्र विश्रुत झाली होती. इ.स. १९०२ पासून तीन वर्षे महाराजांचा मुक्काम ब्रह्मावर्त येथे होता. याच काळांत स्वामी महाराजांचे बंधू सीतारामपंत यांचे गायत्रीपुरश्चरणाचे अनुष्ठान संपन्न झाले. तिथे लागोपाठ तिसरा (प्रथमपासून १४वा) चातुर्मास पूर्ण झाला आणि लवकरच महाराज श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने वाडीकडे वळले. वाटेत भेलशाला त्यांचा शोध घेत ब्रह्मावर्तापर्यंत फिरून आलेले त्यांचे प्रिय शिष्य नारायण दीक्षित त्यांना भेटले. दीक्षितांची पत्नी प्लेगने निवर्तली होती व स्वतःला प्लेग झाल्याने त्यांनी आतुर संन्यास घेतला होता. महाराजांच्या दर्शनाने त्यांच्या चित्ताला शांति मिळाली. त्यांना रेल्वेने पुढे पाठवून महाराज पायी हुशंगाबादमार्गे वाडीकढे निघाले.

## श्रीस्वामीमहाराजांची संन्यासोत्तर प्रथम वाडीभेट.

चौदा वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर श्रीस्वामीमहाराज वाडीला येऊन पोंचले. त्या वेळीं फाल्गुन महिना होता. संन्यासानंतर वाडीला येण्याची ही महाराजांची पहिलीच खेप. यावेळी ४८ दिवस मुक्काम झाला. श्रीनारायणस्वामींची पुण्यतिथि करून वैशाख वद्य १ ला महाराजांनी वाडी सोडली. महाराजांची केव्हांही सहज समाधि लागत असे. नित्यकर्माव्यतिरिक्त सर्व जिज्ञासू मंडळींना त्यांच्या त्याच्या अधिकाराप्रमाणे शिक्षण देण्याचे काम चाले. पहाटे योगप्रक्रिया, सकाळी ब्रह्मकर्म, भिक्षा झाल्यावर ज्योतिष, वैद्यक, मंत्र, तंत्र इत्यादि, दुपारी चारनंतर श्रीमद्‌भागवतांतील वेदस्तुति व ब्रह्मस्तुति, द्विसाहस्त्रीच्या टीकेतील कठिण विषय, पुन्हा सायंसंध्येनंतर कांहीं आध्यात्मिक विषय असा कार्यक्रम सुमारे दीड महिन्यावर चालू होता. आर्त, अर्थार्थींची तर गर्दी सततचीच होती. मध्यरात्रीनंतर फक्त २।३ तास काय ती झोप मिळे. पण महाराजांनी कधीहि कुणाचाहि कंटाळा असा केला नाही. या काळांत अनेक लोकांच्या कामना पूर्ण झाल्या, बाधा दूर झाल्या, प्रपंच मार्गी लागले.

या मुक्कामांतच श्रीदीक्षितस्वामींची श्रीमहाराजांकडून दंडग्रहणाची उत्कट इच्छा, अत्यंत कठोर परीक्षेनंतर पूर्ण झाली. तसेच श्रीमहाराजांचे प्रथम (सिद्धासनस्थ) छायाचित्रहि याच मुक्कामांत झाले. यानंतर वार्षिक संप्रोक्षण विधि करून दोन महारुद्र करण्यांत आले व सांगतेच्या वेळी पुजाऱ्यांनी श्रींची

एक छाटी श्रीमहाराजांच्या अंगावर घातली. तेव्हां पूर्वीच्या दृष्टांताची खूण पटून त्यानुसार महाराजांनी वाडी सोडण्याचे ठरविले.

याच काळांत वक्रतुंडबुवांचे चिरंजीव पं. धुंडिराजशास्त्री यांचे शिक्षण पूर्ण झाले होते. ह्यांचा विवाह १९०४ मध्ये शिरहट्टीच्या श्री.गोपाळराव हणमसागर यांच्या कन्या गंगूबाईंशी झाला. लग्नानंतर यांचे नांव सौ.सरस्वती असें ठेवण्यांत आले. ह्या कवीश्वरांच्या गृहिणींना साजेशा निष्ठावंत साध्वी होत्या. दत्ताला १०८ प्रदक्षिणा घालण्याचा आपल्या सासूबाईंचा नियम त्यांनी अव्याहत चालूं ठेवला. याशिवायही अनेक पूजापाठव्रते त्यांनी आयुष्यभर चालविली. धार्मिक सण, उत्सव उत्साहाने पार पाडले. एवढेच काय श्रीस्वामीमहाराजांच्या वाङ्मयाच्या प्रसाराच्या कार्यांतही हिरीरीने भाग घेतला.

## धुंडिराजशास्त्रींची पाठशाळा

धुंडिराजशास्त्रींनी वाडींतच आपले पिताजी व पं. श्रीकृष्णशास्त्री वष्ट यांचेकडे वेदाध्ययन केले. पुढे श्रीकृष्णशास्त्री कांहीं वैयक्तिक कारणाने वाडी सोडून इंदोरला गेले. तेव्हां १४।१५ वर्षांच्या लहान वयांतहि त्या काळीं धुंडिराजशास्त्री हट्टाने आपला अभ्यास पूर्ण करण्यासाठी इंदोरला गेले. तिथे वेदाभ्यासाखेरीज न्याय आदि विषयांचे अध्ययन करून त्यांनी होळकर शिष्यवृत्ती मिळविली. इंदोरलाच पुढे त्यांनी श्रीचिकोडीकरशास्त्री यांच्याकडे न्यायशास्त्राचा अधिक अभ्यास केला. त्यानंतर सांगलीलाहि कांहीं अध्ययन झाले. अशा रीतीने धुंडिराजशास्त्रींनी वेद, वेदांत, न्याय, काव्य, व्याकरण इत्यादि विषयांत प्रभुत्व प्राप्त केले होते. त्या वेळी श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेने वाडींतच एक पाठशाळा स्थापन करून धुंडिराजशास्त्रींनी अध्यापनाचे कार्य सुरूं केले.

## वाडीला २री भेट

नरसीनंतर ब्रह्मावर्ताला जाऊन महाराज परत दक्षिणेकडे आले व नर्मदाकिनारी बढवाई येथे चातुर्मास केला. त्यानंतर महाराज मजल दर मजल करीत आश्विन वद्य ६ शके १८२८ (इ.स. १९०६) या दिवशी अनपेक्षित पणे वाडीस येऊन पोंचले. पुन्हा पूर्वीप्रमाणे सर्व कार्यक्रम सुरू झाले. यावेळी सकाळी श्रीनारायणस्वामींची पूजा झाल्यावर, तेथील धर्मशाळेंतच जीवनमुक्तिविवेक व सदाशिवब्रह्मेंद्रकृत ब्रह्मसूत्रवृत्ति हे विषय महाराज सांगत. वक्रतुंडमहाराज कवीश्वर हेही येत असत व निरूपणाला सुरुवात करण्यापूर्वी महाराज ते आले असल्याची खातरजमा करीत. वक्रतुंडबुवाही उठून आपल्या

उपस्थितीची ग्वाही देत व मगच निरूपणाला आरंभ होई.

## तृतीय दत्तावतार

या मुक्कामांत कार्तिकी पौर्णिमेनंतर मोळ्याच्या वनभोजनांत पुराणाचार्य श्रीवक्रतुंडबुवा कवीश्वर यांनी भविष्यपुराण आदि पुराणांतील वचनांच्या आधारे महाराज हेच कलियुगांतील तिसरा दत्तावतार योगिराज होत असे प्रतिपादन श्रद्धापूर्वक केले. वक्रतुंडबुवा हे एक महान साक्षात्कारी गाणपत्य होते. ते महाराजांपेक्षां वयाने पंधरा वर्षांनी वडील होते. त्यामुळे त्यांच्या प्रतिपादनाला विशेष प्रामाणिकता आहे.

## प्रसादपादुका.

या मुक्कामांतील एक विशेष घटना म्हणजे, अनेकांच्या प्रार्थनेनंतरही, कुणालाही पादुका न देणाऱ्या श्रीस्वामीमहाराजांनी, आपले प्रिय शिष्य प.प.श्रीदीक्षितस्वामींना यांना पादुकाप्रसाद दिला. या पादुका पुढे दीक्षितस्वामींनी वाडी सोडतांना बरोबर नेल्या आणि नदीच्या पलीकडे औरवाड येथे स्थापलेल्या "श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठांत" त्यांची स्थापना केली. आजहि ह्या पादुका तेथे असून त्यांची यथोचित पूजाअर्चा प.पू. अशोकमहाराज कवीश्वर यांच्या मार्गदर्शनाखाली चालूं आहे

अगणित लोकांच्या आर्तीचे हरण करणारा, तसेच त्याच्या कामना पूर्ण करणारा आणि जिज्ञासूंचा मोक्षमार्ग प्रशस्त करणारा हा दोन महिन्यांचा मुक्काम संपवून देवांच्या आज्ञाप्रमाणे महाराज जेव्हां रामेश्वरला निघाले तेव्हां वाडीकर शोकविह्वल झाले. सर्व लोक त्यांनी जाऊं नये म्हणून प्रार्थना करूं लागले. त्यांचे प्रस्थान अटळ असल्याचे स्पष्ट होतांच त्यांना लवकरच परत येण्यासाठीं विनवूं लागले. सर्व मंडळींना दत्तप्रभूंची सेवा अनन्य भावाने करीत एकीने राहून नित्य दिगंबराचे भजन करण्यांतच कल्याण असल्याचा उपदेश करून महाराजांनी वाडी सोडली.

## वक्रतुंडबुवांचे निधन

यापुढचा महाराजांचा चातुर्मास तंजावरला झाला. त्या वेळीं वाडींत प्लेगचा प्रादुर्भाव झाला. मंडळींनी महाराजांना या संकटांतून सुटण्याचा उपाय एका पत्राद्वारे विचारला. महाराजांनी ही कैफियत श्रीदत्तप्रभूंपुढे ठेवतांच त्यांनी स्वच्छ सांगितले की, "गंगातीरावरून या लोकांना सन्मार्ग दाखविण्याकरितां तुम्ही दोन वेळां वाडीला येऊनसुद्धा तेथील लोकांनी आपले आचरण सुधारले

नाही. सबब यांना या वेळी चांगलीच शिक्षा आम्ही करणार आहोंत. तुम्ही आतां मध्ये पडण्याचे कारण नाही." महाराजांनी हा आदेश वाडीकडे पोंचविला व "या वेळीं वाडींत अनेक माणसे मृत्युमुखी पडतील, कांहीं दिवस वाडी सोडावी" असे सांगितले. आणि तसेच झाले. प्लेग, कलह आदि उत्पातांनी जीवित व वित्त यांची हानी झाली. लोक परागंदा झाले. विशेषतः महाराजांची टवाळी करणाऱ्यांना अधिक त्रास झाला.

ह्याच सांथींत (इ.स.१९०७) वक्रतुंडबुवांना प्लेगने गांठले. गणेशचतुर्थीच्या पूर्वसंध्येला त्यांनी पत्नीला श्रीगणेशाची मूर्ति आपल्या बिछान्याजवळ आणून ठेवायला सांगितली. त्या क्षणापासून त्या महान् गणेशभक्ताने अखंड नामस्मरण सुरूं केले ते शेवटच्या श्वासाबरोबरच थांबले. गणेशचतुर्थीच्या दिवशींच गणेशमूर्तीच्या साक्षीनेच या थोर गाणपत्याने देह ठेवला.

या वेळीं श्रीस्वामीमहाराजांचा संचार दक्षिणेकडे चालला होता. संध्यामठ येथे त्यांचा चातुर्मास झाला. पुढचा चातुर्मास मुक्त्यालाला झाला. तेथून पीठापूरला जाऊन श्रीपादश्रीवल्लभांचे जन्मस्थान तेथील लोकांना दाखवून तिथे पादुकांची स्थापना केली. पुढे राजमहेंद्रीला ब्रह्मानंदस्वामींच्या विनंतीवरून त्रिमुखी "भक्तवत्सल" दत्ताची स्थापना केली. तेथून हळूंहळूं प्रवास करीत महाराज वेनगंगा तीरावरील पवनी या ठिकाणी १९वा चातुर्मास करण्यासाठी पोंचले. याच मुक्कामांत कुडुत्रीचे वे.मू.शंकरशास्त्री महाराजांच्या दर्शनासाठी आले. आपल्या मातुःश्री, कनिष्ठ बंधू वामनराव व धाकटी बहीण गोदावरी यांनाही त्यानी बोलावून घेतले व या सर्वांना श्रीस्वामीमहाराजांचा अनुग्रह प्राप्त करून दिला.

धुंडिराजशास्त्री यांच्या विवाहाला ६ वर्षे झाली तरी कांही संतति होत नव्हती. महापुरुषाचा जन्म व्हावयाचा असेल तर मातापित्यांना तपश्चर्या करावी लागते. या नियमाचा इथे प्रत्यय येतो. धुंडिराजशास्त्रींनी श्रीस्वामीमहाराजांशी पत्रव्यवहार करून याबद्दल विचारणा केली. त्यांनी धर्मसिंधूंत सांगितलेला जप विधिपूर्वक करून होमहवनाने त्याची सांगता करण्याची आज्ञा केली. वाडवडिलाची पुण्याई, या दंपतीची भक्तिप्रेमपूर्वक तपश्चर्या, काम्यकर्माची अनुष्ठिति आणि सर्वांत मुख्य श्रीस्वामीमहाराजाच्यासारख्या अवतारी महात्म्यांचा कृपाप्रसाद यांचे मंगल पर्यवसान या वर्षी माघ व।।६ ला महान् पुत्राच्या जन्मांत झाले.

## 'वक्रतुंडबुवा, पुन्हां आलांत?'

या आनंदांला द्विगुणित करण्यासाठी जणू श्रीस्वांमीमहाराज वाडींत उपस्थित होते. पौंष व।।१३ लाच श्रींचे आगमन येथे झाले होते. यथावकाश त्या पुत्राचे नामकरण होऊन दत्तकृपेचा प्रसाद म्हणू दत्तात्रेय असेच नामकरणहि केले. पुढे एके दिवशी श्रीस्वामीमहाराजांची स्वारी कवीश्वरांच्या घरी आली. प्रस्तुत स्थितीच्या संदर्भात त्यांच्या घरी भिक्षा घेतां येत नव्हती. पण लहानग्या दत्ताला पाहण्यासाठी 'थोरले महाराज' आले. त्यांना आसन देऊन स्थानापन्न केले. बालदत्तात्रयाला मांडीवर घेऊन स्वामीमहाराज त्याच्याशी बोलूं लागले. "काय वक्रतुंडबुवा? पुराण सांगण्याची हौस अजून पुरली नाही म्हणून परत येणे केले? " सत्पुरुषांच्या खुणा सत्पुरुषच जाणतात. महाराज पुढे त्या बाळाला म्हणतात, 'तसा तुमच्यांत आणि आमच्यांत काय फरक आहे? आम्ही भगवे धारण केले आहे आणि आपण पांढरे!'. असे बोलून आणि त्या बालकाच्या गालाला हात लावून त्याला हंसवले आणि परत आईच्या हाती दिले. सहज सांगून गेले. "आजोबाच आलेत! ह्याचे नांव वक्रतुंड ठेवा." ह्या श्रीस्वामीमहाराजांच्या आज्ञेनुसार धुंडिराजशास्त्रींनी त्या बालकाचे पुनश्च बारसे केले आणि 'वक्रतुंड' नांव ठेवले. पुढे सर्वत्र दत्तात्रेय हेच नांव प्रसिद्ध झाले; पण प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराजांच्या मुंजीच्या व लग्नाच्या (संस्कृत) पत्रिकांत त्यांचा उल्लेख वक्रतुंड असाच केला आहे.

ह्यानंतर श्रीनारायणस्वामींच्या उत्सवानंतर स्वामीमहाराजांना देवांनी शृंगेरीस जाण्याची आज्ञा केली. भिक्षा झाल्यावर श्रीमहाराजांनी पुस्तके गांडाबुवांजवळ दिली आणि देवाकडे जाऊन, उत्तरद्वारांतच दर्शन करून तसेच नदीपलीकडे एकसंबे गांवांत येऊन थांबले. यामुळे वाडीच्या मंडळींना थोडा धक्काच बसला. महाराज वाडींतच चातुर्मास करतील अशी त्यांची अपेक्षा होती. या अचानक प्रयाणामुळे कांहीच समारंभ वगैरे करतां आला नाही; म्हणू सर्व मंडळी महाराजांकडे एकसंब्याला गेली. आपण देवाच्या आज्ञेने निघालो. आपण सर्वांनी दुर्गुण टाकून एकनिष्ठतेने प्रभूंची सेवा केली म्हणजे पुन्हां येणे होईल असे त्यांचे समाधान करून महाराज गुर्लहोसूरमार्गे धारवाडकडे गेले.

## धारवाडची भिक्षा.

या खेपेला महाराजांना आपण भिक्षा करूं शकलो नाही हे शल्य धुंडिराजमहाराजांना खुपूं लागले. ते श्रींचा मागोवा घेत धारवाडला आले. तेथे

मदिहाळच्या मंदिरांत महाराजांचे दर्शन घेतले. महाराज शास्त्रीबुवांच्या ऋजु , संतोषयुक्त वृत्तीवर व भक्तिप्रेमावर प्रसन्न होते. धारवाडचा मुक्काम संपण्याची चिह्ने दिसूं लागली तरी धुंडिराजशास्त्रीना श्रींना भिक्षेबद्दल विचारायचे धैर्य झाले नाही. शेवची सर्वेंगितज्ञ महाराजांनी त्यांचे प्रेमळ अंतःकरण जाणून दुसरे दिवशी आपणांस भिक्षा देण्याची आज्ञा शास्त्रींना केली. अत्यंत आनंदाने दुसरे दिवशी धुंडिराजशास्त्रींनी स्वयंपाक केला व महाराजांना भिक्षा वाढली आणि शिष्यवत्सल सद्‌गुरूंनी ती तेवढ्याच प्रेमाने ग्रहण केली. (ही भिक्षा श्रीदत्तमहाराजांच्या जन्मानंतर झाली हे इथे नमूद करणे आवश्यक आहे. कारण कांही लेखकांनी इथे थोडा विपर्यास करून ह्या भिक्षेचा आणि पुत्रप्राप्तीचा कार्यकारणभाव दर्शविला आहे. ह्या भेटीनंतर श्रीस्वामीमहाराज परत वाडीला आले नाहीत. जर श्रीदत्तमहाराजांचा जन्म  धारवाडच्या भिक्षेनंतर झाला असे मानले तर त्यांना मांडीवर घेण्याचा प्रसंग घडूंच शकला नसता.)

## गरूडेश्वर

श्रीस्वामीमहाराजांच्या गरुडेश्वरच्या वास्तव्यांतहि श्री. धुंडिराज महाराज त्यांच्या दर्शनासाठीं गेले होते. स्वामीमहाराजांनी त्यावेळी त्यांना बरेच दिवस राहवून घेतले. शास्त्रीबुवांनी गांवीं जाण्याचे ठरवले की महाराजांनी रोज येणाऱ्या नवीन मंडळींपैकी कुणाला तरी विचारावे, "काय हो ! ह्या पुराणिकबुवांचे पुराण तुम्ही कधी ऐकले आहे का?" अर्थात्च त्याने 'नाही' म्हणावे. लगेच महाराज शास्त्रीबुवांना म्हणत, 'आज आतां थांबा. ह्या मंडळींची पुराण ऐकण्याची इच्छा पूर्ण करा. मग उद्यां चला.' असे बरेच दिवस गेल्यानंतर महाराजांनी धुंडिराजशास्त्रींना नारळप्रसाद व छाटी देऊन "पूर्ण आशीर्वाद" दिला. महाराजांनी यांना "प्रपंचांत राहूनच परमार्थ साधावा" अशी आज्ञा दिली होती. त्यानुसार आयुष्यभर निष्ठेने सर्वत्र पुराणप्रवचनादिद्वारा यावच्छक्य धर्मजागृतीचे कार्य त्यांनी चालविले.

अशा रीतीने वृद्धिंगत झालेला हा श्रीस्वामीमहाराजांचा ऋणानुबंध त्यांच्या महासमाधीनंतरही, प.प.श्रीदीक्षितस्वामींच्या माध्यमांतून पुष्ट होत गेलेला दिसतो. पू. ब्रह्मश्री दत्तमहाराजांवर त्यांची पूर्ण कृपा होती. लहान वयांतच वेदशास्त्रांचे अध्ययन पूर्ण केलेल्या दत्तमहाराजांना अवघ्या १६व्या वर्षी भागवतमहापुराणाचा सप्ताह करायची प्रेरणा दीक्षितस्वामींनीच दिली. शके १८४७ (इ.स. १९२५) पासून दर वर्षी हा प्रौष्ठपदी सप्ताह औरवाड येथे अखंड ४० वर्षे निष्ठेने श्रीदत्तमहाराजांनी केला. १९६५ साली श्रीवासुदेवनिवासाची निर्मिती त्यांच्याच पुढाकाराने झाली. तेव्हा हाच प्रौष्ठपदी भागवतसप्ताह

प.पू.योगीराज गुळवणीमहाराज यांच्या आज्ञेने श्रीवासुदेवनिवासांत होऊं लागला. श्रीवासुदेवानंदसरस्वती पीठच पुण्यांत आले याचेच हे गमक होय. त्याशिवाय श्रीदत्तमहाराजांसारख्या थोर सत्पुरुषांनी आपल्या नियमांत बदल केला नसता. ह्या आमच्या श्रद्धेला बळकटी आणणारी एक अपूर्व घटना १९६५ साली घडली.

## पादुकांची चोरी.

औरवाड येथील एका सेवेकऱ्याला, तिथे आधी उल्लेखिलेल्या श्रीस्वामीमहाराजांच्या पादुकाच चोरण्याची बुद्धि झाली. संस्थानाच्या विश्वस्तांच्या हे लक्षांत आले की पादुका आणि तो सेवेकरी एकदमच अदृश्य झाले ! त्यांचा शोध लावण्याचे सर्व प्रयत्न अयश्स्वी झाले. पू.दत्तमहाराजांना त्यानंतर कांही दिवसांतच असा स्वप्नदृष्टांत झाला की तो सेवेकरी पादुकांचे गांठोडे घेऊन श्रीवासुदेवनिवासांत येऊन बसला आहे. आणि २-३ दिवसांत तसेच झाले. सकाळचे आह्निक आंवरून आश्रमांत आलेल्या दत्तमहाराजांनी स्वप्नदृष्टांतावरून त्या सेवेकऱ्याला ओळखून त्याला त्या गांठोड्यांतील पादुका काढायला लावल्या आणि त्याला घेऊन ते श्रीगुरुमहाराजांकडे वरती माडीवर गेले. गुरुमहाराजांसह (प.पू.योगीराज गुळवणीमहाराज) सर्वांनी त्या पादुकांचे भक्तिभावाने दर्शन घेतले. श्रीगुरुमहाराजांनी त्या वेळी आपल्या मनांत ही अनेक दिवसांची इच्छा असल्याचे सांगितले. जणूं कांही श्री.प.प.वासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजच आपल्या प्रियतम शिष्याला भेटण्यासाठी आले असे सर्व पुणेकर भक्तांना वाटले. त्यानंतर चार महिने त्या पादुका आश्रमांत ठेवून सन्मानाने औरवाडला परत केल्या.

ही घटना प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वतीनी श्रीवासुदेवनिवासांत आपला नित्य निवास राहणार असल्याचे आश्वासनच आहे याविषयी आमच्या मनांत यत्किंचित्हि संशय नाही. प.पू.श्रीगुरुमहाराज यांनी प.पू.श्रीदत्तमहाराज यांच्याकडे जसा आपल्या मृत्युपत्राच्या मिषाने अंगुलीनिर्देश केला तसाच प.पू. श्रीदत्तमहाराजांनी आपल्या "आदेशपत्राद्वारे" प.पू. श्रीनारायणकाका ढेकणेमहाराज यांच्याकडे करून ह्या वासुदेवनिवासाची परंपरा अक्षुण्ण प्रवाहित ठेवली आहे. ह्या अध्यात्मपीठाच्या आश्रयाने सहस्रावधी मुमुक्षूंना वाट दाखविली आहे, दाखवीत राहणार आहे. येथील सर्व साधकांनी गुण्यागोविंदाने "एकमेकां साह्य करून" प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामीमहाराजांचा खालील आशीर्वाद ग्रहण करण्यास पात्र व्हावे.

**समानी वो इहाकूतिः समानहृदयानि वः।**
**समानमस्तु वो दत्ते मनो नोऽव्यात्त्यधीश्वरः।।** श्रीदत्तपुराण ६४-६८।।

त्याचे बोलणे ऐकून ब्राह्मण पळून गेले. समर्थ मात्र शांतपणे बसून राहिले कारण हे कोण आहेत ते त्यांनी ओळखले होते. तेव्हां ते सर्व दृश्य नाहीसे होऊन तिथे श्रीदत्तस्वरूप प्रकट झाले. त्या वेळी समर्थांनी त्या ब्राह्मणानाहि दर्शन द्यावे अशी प्रार्थना केली. पण ते सकाम भक्त आहेत, त्यांची आत्मसाक्षात्काराची योग्यता नाही असे दत्तप्रभूंनी सांगितले. पुढे श्रीसमर्थांच्या वाक्यास्तव त्या ब्राह्मणांचे स्वप्नांत समाधान केले असे वर्णन आहे.

तिसऱ्या प्रसंगांत समर्थ संगमतीरावर असतांना, त्यांची परीक्षी पाहण्यासाठी, दत्तराज 'कंगाल' वेष धरून आल्याचे वर्णन आहे. अर्थात् समर्थांनी त्यांना "अभेदे हृदयी" धरलेले असल्याने व त्यांची सांवली न दिसल्याने, लगेच ओळखले व स्तुति करून पाय धरले. त्याने प्रसन्न होऊन त्यांना योगपंथाच्या खुणा सांगितल्या आणि त्यांना "समर्थ" हे नांव दिले. श्रीदत्तप्रभूंनी समर्थांना दिलेला एक सोटा आजहि सज्जनगडावर पाहण्यांत येतो.

हाच समर्थसंप्रदायाचा अनुबंध ध्यानांत घेऊन, गंगाखेडला पत्नीच्या मृत्यूनंतर चतुर्थाश्रमाची दीक्षा दिल्यावर श्रीदत्तप्रभूंनी श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामिमहाराजांना एका समर्थसंप्रदायांतील संन्याशाकडून - प.प.श्रीनारायणानंदसरस्वतींकडून, दंड ग्रहण करण्याची आज्ञा केली. हे श्रीस्वामीमहाराजांचे गुरुस्वामी कारंज्याच्या श्रीमन्नृसिंहसरस्वती यांच्या वंशांतील होते. ह्याचे वास्तव्य प्रायः उज्जैन येथेच असायचे. त्याप्रमाणे स्वामीमहाराज उज्जैनला निघाले. वाटेत मंडलेश्वर येथे कैवल्याश्रम नांवाचे एक अधिकारी संन्यासी होते. त्यांनी आग्रह केल्याने त्यांच्याकडून दंड घेण्यासाठी महाराज तिथे राहिले; पण "माझी आज्ञा मोडतोस काय?" असे देवांचे सांगणे झाल्याने ते कैवल्याश्रमस्वामींना निवेदन करून महाराज उज्जैनला येऊन पोंचले. तिथे श्रीदत्तमंदिरांत जाऊन नारायणस्वामींना वंदन केले व श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने आपण दंडग्रहणासाठी आल्याचे त्यांच्या कानांवर घातले. नारायणानंदस्वामींनी तिथेच असलेल्या आपल्या गुरूंची - प.प.श्रीअनिरुद्धानंदसरस्वतींची आज्ञा झाल्यावर दंड देतां येईल असे सांगितल्याने महाराजांनी त्यांचेकडे जाऊन श्रीदत्तप्रभूंची आज्ञा त्यांना सांगितली. तेव्हां त्यांनी नारायणानंदस्वामींकडून आपल्या उपस्थितींतच महाराजांना दंड देववून त्यांना "वासुदेवानंदसरस्वती" असा योगपट्ट दिला.

पहिला चातुर्मास गुरुस्वामींच्या आग्रहाने उज्जैन येथेच झाला.

पुढे चिखलद्याच्या चातुर्मासानंतर मंडलेश्वर येथे श्रीगुरुस्वामींचा कांही दिवस सहवास झाला. त्यानंतरच देवांच्या आज्ञेने गुरुस्वामींच्या आजारपणांत उज्जैनला जाऊन त्यांची उत्तम प्रकारे सेवा करून त्यांची प्रकृति उत्तम होईपर्यंत तिथे राहिले.

शके १८३० (इ.स.१९०८) साली महाराज दक्षिणेत कोगूर येथे असतांना गुरुस्वामी चाफळ येथे समाधिस्थ झाल्याची वार्ता त्यांना समजली. त्या वेळी त्यांनी दंडस्नानादि विधि केला.

आपला संप्रदाय ध्यानांत घेऊन महाराज दरवर्षी दासनवमीचा उत्सव करीत. अशाच एका दासनवमीच्या दिवशी ब्रह्मावर्त येथे सायंसंध्येच्या आधी तिथे कुणाकडे दासबोध असल्यास आणवावा असे म्हटले व एका गृहस्थाने आपल्या घरचा ग्रंथ आणून दिला. त्या वेळी बरेच मोठे विद्वान् शास्त्री पुराणिक तिथे महाराजांचे पुराण ऐकण्यास आले होते. महाराज दासबोध सांगणार हे ऐकून ते उठून महाराजांना वंदन करून जायला निघाले. तेव्हां महाराजांनी त्यांना थोडे थांबण्यास सांगितले. संध्येला थोडाच वेळ असल्याने ५-१० ओव्या होतील तेवढ्या वाचून बरोबरच संध्येला जावे अशा महाराजांच्या बोलण्याला मान देऊन मंडळी थांबली. स्वामीमहाराजांनी दासबोध उघडून समोर आलेले पानच, समासाच्या मधूनच वाचायला सुरुवात केली. एक एक ओवी घ्यावी व समानार्थी वेदमंत्र सांगून भाष्य करावे. याप्रमाणे ५।७ ओव्या झाल्यावर संध्येची वेळ झाली म्हणून महाराज थांबले. यावरून दासबोधाची महानता त्या व्युत्पन्न मंडळींच्या लक्षांत येऊन त्यांनी महाराजांची क्षमा मागितली. तेव्हां महाराजानी ग्रंथाची उपेक्षा केवळ तो प्राकृत आहे एवढ्यासाठी करू नये. त्याचे व्यवस्थित निरीक्षण करावे व मग त्यविषयी मत बनवावे असे त्यांना सांगितले. श्रीमहाराजांचे परमशिष्य निसरपूरचे बाळाभाऊ वैद्य यांना त्यांनी दासबोध नित्य वाचण्याची आज्ञा केली होती व ते तो नियम कटाक्षाने पाळीत होते.

हीच समर्थसंप्रदायाशी असलेली जवळीक, श्रीस्वामीमहाराजांचे महान् शिष्य आमचे श्रीगुरुचरण योगिराज गुळवणीमहाराज आणि समर्थ संप्रदायांतील तत्कालीन श्रेष्ठ विभूति प.प.भगवान् श्रीधरस्वामी यांच्या परस्पर सौहार्दातून प्रकट झाली आहे. त्यांच्या भेटीगांठींचे वर्णन गुरुभक्त अ.सि.पोटभरे व

स्वामीभक्त पृथ्वीराज भालेराव यांनी विस्ताराने केले आहे. श्रीगुरुमहाराजांची व श्रीधरस्वामींची प्रथम भेट श्रीक्षेत्र नरसोबावाडी येथे झाली. प्रतिवर्षाप्रमाणे महाराज गुरुद्वादशी वाडींत करून पुढे तिथेच रहात. १९४७ साली कार्तिक मासापासून पौंषअखेर श्रीधरस्वामी वाडीत कांहीं विशिष्ट अनुष्ठानासाठी एकांतवासांत होते. कुणाशी फारसा संपर्क नव्हता. स्वामींना महाराजांच्याविषयीं श्री कर्वेस्वामी (प.प.प्रज्ञानानंद सरस्वती) यांनी सांगितले होते. श्रीस्वामींची हकीकत त्यांनी स्वतःच महाराजांना सागितली असे दिसते. ह्याप्रमाणे परिचय झाल्यावर गुरुमहाराज रोज नियमाने दुपारी ३।।-४ वाजता स्वामींच्या दर्शनाला जाऊं लागले व उभयतांच्या निवांत गप्पागोष्टी होऊं लागल्या. बऱ्याच वेळां या एकांतांत होत.

यानंतर दहा वर्षांनी म्हणजे १९५७च्या डिसेंबरअखेर श्रीधरस्वामी विश्रांतीसाठी लोणावळ्याला आले व त्यांनी भेटीसाठी बोलावले. गुरुमहाराजहि त्या वेळी अंथरूणांतच होते. हालचाल करण्याचीहि डॉक्टरांची मनाई होती. तशाहि अवस्थेत एके दिवशी सकाळी महाराज गाडीने लोणावळ्यास गेले. त्यांना येतांना पाहून श्रीधरस्वामी धांवतच पुढे आले व त्यांना कडकडून मिठी मारली. कसेबसे स्वतःला सोडवून गुरुमहाराजांनी स्वामींना चरणस्पर्शपूर्वक नमस्कार केला. तेव्हा महाराजांच्या हाताला धरून स्वामींनी त्यांना आंत नेले व सन्मानाने पाटावर बसविले व फळांनी भरलेली टोपली समोर ठेवून आपण पुढेच खुर्चीवर बसले व क्षेमकुशल विचारले. ह्याच वेळी त्यांनी गुरुमहाराजांना प्रतिवर्षी तुळजापूरला जाऊन कुलदेवता तुळजाभवानीची महापूजा करण्याचा आदेश दिला. तो श्रीगुरुमहाराजांनी आजीव पाळला. यानंतर उभयतांचे बराच वेळ एकांतांत कांहीं बोलणे झाले आणि अत्यंत प्रसन्नतेने त्यांनी निरोप घेतला. निघतांना श्रीधरस्वामींनी पुन्हा गुरुमहाराजांना घट्ट मिठी मारली आणि अभयमुद्रा दाखवून अत्यंत वात्सल्यपूर्ण नजरेने पाहून कानांत कांही तरी कुबुजले.

ही भेट व्हायच्या पहांटेच श्रीगुरुमहाराजांना स्वप्नांत थोरल्या महाराजांचे दर्शन झाले होते व महाराज खुर्चीत बसलेले असून त्यांच्या आसपास कानडी बोलणारी मंडळी आहेत. स्वप्नांतच गुरुमहाराजांनी नमस्कार केला तेव्हा "लोणावळ्यास ये" असा आदेश मिळाला. ह्या प्रसंगानंतर श्रीगुरुमहाराज श्रीधरस्वामींना गुरुस्थानींच मानूं लागले. यानंतर ह्या दोन महापुरुषांच्या भेटी वरचेवर झालेल्या दिसतात. १९५८च्या मार्चमध्ये खंडाळ्याला, १९५९च्या फेब्रुवारींत सोलापूरला, ४ फेब्रुवारी १९६० रोजी पुणे स्टेशनवर हे दोघे भेटले.

७ एप्रिल,१९६२ पासून ५ जून पर्यंत श्रीधरस्वामी पुण्यात मफतलाल बंगल्यांत आजारपणासाठी राहिले होते. ह्या काळांत गुरुमहाराज रोज बरोबर दुपारी ४ वाजतां फळे घेऊन जात असत. महाराज दारांत आले की लगेच श्रीधरस्वामींनी आंत त्यांची आठवण काढावी.

१७ मे १९६५ च्या रात्री ११-११।। वाजतां पू.श्रीधरस्वामी श्रीवासुदेवनिवासमध्ये आले. गुरुमहाराजांनी त्यांची पाद्यपूजा थाटाने केली. आश्रम दाखविला. दर्शनेच्छु भक्तानी आश्रम फुलून गेला. दोघेहि जणूं भावावस्थेत होते. अनेकदा श्रीधरस्वामींनी गुरुमहाराजांना आलिंगन दिले. दोघांचा एकांतांत संवादहि झाला. ह्या प्रसंगीं गुरुमहाराजांच्या खोलींत ह्या संतद्वयांच्या भेटीचा एक अनाहूत साक्षीदार होता. तो म्हणजे कल्याणच्या "हर्षेकाकू"! ह्या भेटीच्या वेळीं सर्वांना खोलीच्या बाहेर जायला सांगितले होते. पण हर्षेकाकूंना ते ऐकायला आले नाही. त्या समोरच्या कोपऱ्यातच उभ्या होत्या. सर्वजण बाहेर गेल्यावर दार लावले तेव्हां त्यांना ह्या दोन महापुरुषांच्या जागी दोन प्रकाशाचे झोत दिसू लागले. त्यांतील एका ज्योतींत कधी श्रीदत्तप्रभू दिसतात तर लगेच दुसऱ्या ज्योतींत. कांहीं वेळाने दोन्ही स्थानी दत्तप्रभू दिसू लागले. पुन्हा ते प्रकाशरूप झाले व एकमेकांत मिसळून गेले. कांहीं वेळाने हे सर्व दृश्य जाऊन श्रीधरस्वामी व गुरुमहाराज आपल्या मानवी रूपांत दिसायला लागले. त्या वेळी महाराजांचे लक्ष हर्षेकाकूंकडे गेते व "तुम्ही इथे कशा थांबलां?" असे म्हणून जे पाहिले ते कुणाला सांगूं नये अशी आज्ञा केली. हर्षेकाकूंनी शेवटपर्यंत ही आज्ञा पाळली; अगदीं शेवटच्या घटकेला त्यांचे प्रयागचे भाचे श्री. गजाननराव पित्रे जवळ होते त्यांना ही गोष्ट सांगून हर्षकाकूंनी देह ठेवला.

यावरून केवळ ह्या दोन सत्पुरुषांच्याच नाही तर श्रीसमर्थ व श्रीदत्त ह्या दोन संप्रदायांच्या संबंधावरहि प्रकाश पडतो. १९६७ च्या जानेवारीत श्रीधरस्वामी पुण्याच्या बाहेरूनच जाणार असल्याने गुरुमहाराज त्यांच्या दर्शनासाठी एका मोकळ्या शेतजमिनीतच गेले होते. स्वामींना वेळ लागून ते रात्री ११ला आले. थंडीचे दिवस असल्याने महाराजांना थंडी वाजूं नये म्हणून स्वामींनी स्वतः शेकोटि केली. या वेळींहि दोघांचेहि प्रेम उचंबळलेले सर्व उपस्थितांना जाणवत होते. जणूं कांही ही अखेरची भेट असल्याचे दोघांनाहि कळले होते. स्वामींच्या एकनिष्ठ शिष्या व श्रीगुरुमहाराजांच्या अनुग्रहीत श्री.सुशीलाताई मोडक या तिथे उपस्थित होत्या. कलीचा वाढता प्रभाव श्रीधरस्वामींना अस्वस्थ करीत

होता. सनातन वैदिक धर्माची व भारतीय संस्कृतीची दुरवस्था पाहवत नव्हती. ह्याचा प्रतिकार करायचा तर आपले तपःसामर्थ्य वाढवायला हवे ह्यासाठी त्यांना वरदहळ्ळी येथे एकांतवास करायचा होता. निवडक आत्मीय भक्तापुढे त्यांनी बऱ्याच गोष्टी कळकळीने सांगितल्या. त्यांत स्वतःच्या ह्या जन्माविषयी असे म्हटले की "आम्ही मूळ गाणगापूरचे. समर्थांनी आम्हाला सज्जनगडाकडे खेचले."

ह्या सर्व घटनांचा यथार्थ बोध आपल्याला होणे अशक्य आहे. पण आणखी एका घटनेने त्याचा अंशतः तरी उलगडा साधकांना होऊं शकेल. १९५७चा दासनवमीचा उत्सव सज्जनगडावर प.प.श्रीधरस्वामींच्या उपस्थितीत चालू होता. स्वामींनी आपल्या एका शिष्याला पुण्याला पाठवून पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज कवीश्वर यांना उत्सवासाठी बोलावले. त्या वेळी पू. दत्तमहाराजांची (कवाश्वरशास्त्री) प्रकृति ठीक नव्हती. तेव्हां काय करावे अशी विचारणा त्यांनी प.पू.गुरुमहाराजांना केली. "स्वामींचा निरोप आहे तर या जाऊन"असे बोलून श्रीगुरुमहाराज पुढे एक सूचक वाक्य बोलले, "गडावर समर्थांच्या समाधीजवळ पहांटे **बसलांत की बरे वाटेल.**" आपल्या सर्व शिष्यांना, "**स्वस्थ बसा, काय होते ते पहा म्हणजे बरे वाटेल**" हाच आदेश देणाऱ्या गुरुमहाराजांचे हे शब्द आहेत. 'सहज बोलणे हाचि उपदेश' ह्या जातीचे हे वचन होते. त्या वेळी शास्त्रीमहाराजांचे पिताश्री पू.धुंडिराजमहाराजहि पुण्यांत होते. त्यांनीहि "संतांचे बोलावणे आले आहे तर जरूर जा" असाच कौल दिल्याने अंगांत ज्वर असतांनाहि महाराज गडाकडे निघाले. पायथ्यापर्यंत गेल्यावर त्यांना गड चढणे अशक्यच वाटले. त्यांनी स्वामींना निरोप पाठविला "आपल्या आज्ञेप्रमाणे पायथ्यापर्यंत आलो आहे; पण प्रकृतीमुळे गड चढणे अशक्य दिसते." स्वामींचा पुन्हा आदेश आला की "डोली करून यावे." ही जणू परीक्षाच होती. शास्त्रीजींच्या श्रद्धावंत मनाला डोली करणे मान्य नव्हते. तसेच हळूहळू ते गडावर चढले. रात्री विश्रांती झाली; आणि पहांटेच स्वप्नांत श्रीगुरुमहाराज आले व त्यांनी शास्त्रीबुवांना "बसायला"सांगितले. दत्तमहाराज नमस्कार करून बसले तेव्हां महाराजांनी जवळ येऊन भ्रूमध्यास स्पर्श केला आणि स्वप्नांतच क्रिया सुरू झाल्या. शास्त्रीबुवांना जाग आली. पुण्याहून निघतांना झालेली आज्ञा आणि आतां हा दृष्टांत ! दत्तमहाराज समर्थांच्या समाधीसमोरच बैठकीला बसले. लगेच क्रिया सुरूं झाल्या. नानाविध बंध आणि प्राणायाम - विशेषतः

उज्जायी कुंभक, झाले. ताप, अशक्तपणा बघता बघतां नाहीसे होऊन प्रकृतीत चैतन्य आले. दासनवमीच्या उत्सवांत दहा दिवस उत्साहाने सहभागी होता आले. श्रीगुरुमहाराजांना या अनुभवांचे वृत्त पत्राने कळविले तेव्हां उत्तर आले, "आपल्यावर स्वामीमहाराजांची कृपा झाली आहे." याव्यतिरिक्त या प्रसंगाची वाच्यता श्रीदत्तमहाराजांनी केली नाही. पण पुढे गु.भ. अ.सि.पोटभऱ्यांनी विशेष प्रश्न केल्यावर पू.दत्तमहाराजांनी आपल्या संकोची स्वभावानुसार ही माहिती दिलेली आहे. देवता परोक्षप्रिय असतात असे शास्त्रवचन आहे. त्यानुसार या दीक्षेविषयी बोलतांना दत्तमहाराजांनी शारीरिक आरोग्य इ. उपलब्धींचा उल्लेख करून असे म्हटले की, "होते घडते ते ईश्वरेच्छेने असे (दीक्षे) पूर्वी वाटत होते. पण हल्ली प्रत्येक क्षणी **हाच अनुभव** येतो. आमच्याकडून काय किंवा कोणाकडून काय त्याला हवे तसे घडवून घेतले जाते. हे **बघत** राहतो." ह्या श्रीदत्तमहाराजांच्या बोलण्यांत त्यांच्या दीक्षेचे एक मोठे रहस्य दडलेले आहे. तंत्रशास्त्रांत शक्तिपात दीक्षेचे, शिष्याच्या अधिकारानुसार चार प्रकार सांगितले आहेत. क्रियावती, कलावती, वेधमयी आणि शांभवी. यांपैकी सर्वांत श्रेष्ठ शांभवी दीक्षेचे असे वर्णन आहे की या प्रकारांत दीक्षेच्या वेळीच शिष्याला असा अनुभव येतो की आपल्या ठिकाणी कार्यान्वित असलेली शक्तीच सर्व विश्वाचे नियमन करते आहे आणि ती आपलीच शक्ति आहे. अर्थात् ह्या दीक्षेच्या प्रकारांत शिष्याला लगेच आत्मसाक्षात्कार होतो व तो शक्तिपाताचा अधिकारीहि होतो. श्रीदत्तमहाराजांच्या बोलण्यांतून हाच अभिप्राय स्पष्ट होतो.

चैत्र व।।२, गुरुवार दि.१९ एप्रिल १९७० रोजी श्रीधरस्वामींचे महानिर्वाण झाल्याच्या बातमीने गुरुमहाराजांना मोठाच धक्का बसला. आसपासच्या लोकांना जाणवण्याइतका त्यांचा दुःखावेग तीव्र होता.

समर्थ श्रीरामदास स्वामी, प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती, प.प.श्रीधरस्वामी, प.पू.योगिराज गुळवणीमहाराज, प.पू.ब्रह्मश्री दत्तमहाराज यांच्यासारखे "**धर्मसंस्थापनेचे नर। ते ते ईश्वरी अवतार। झाले आहेत होणार। देणे देवाचे।।**" त्यांच्या स्मरणसेवेने चित्तशुद्धी होऊन त्यांचे अनुसरण करण्याची योग्यता आपल्याला सर्वांना यावी हीच प्रार्थना करून हा लेख आवरतो.

श्रीगुरुःशरणम्।।

# द्विसाहस्रींतील भीमामरजासंगममाहात्म्य

प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांनीं पूर्वाश्रमीं श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने महाराष्ट्राबाहेरील भक्तांसाठीं श्रीगुरुचरित्राच्या भाषांतररूप असा श्रीगुरुचरितम् हा महान् संस्कृत ग्रंथ रचला. यालाच श्रीदत्तप्रभूंनीच "द्विसाहस्री" हे नामाभिधान केले. भाषांतराखेरीज या ग्रंथांत, विशेषतः तब्बल दहा वर्षांनी प्रभास व द्वारका क्षेत्रांत श्रीदत्ताज्ञेनेच केलेल्या टीकेंत, श्रीगुरुचरित्रांतील योग व ज्ञान मार्गाची गूढ प्रमेयें उकलून दाखविली आहेत. त्यांतील २२व्या अध्यायाच्या शेवटी गाणगापूरच्या अष्टतीर्थांचे निरूपण आले आहे. त्यांवर टीका लिहितांना श्रीस्वामीमहाराजांनी प्रथमतः ह्या तीर्थांचे सरल निरूपण केले आहे व शेंवटी "हा बाह्यार्थ झाला. आभ्यंतरार्थ असा आहे", असे म्हणून ७५ ते १०१ या श्लोकांवर पुन्हां भाष्यकरून त्यांतील निगूढ योगमार्गप्रदर्शक तत्त्वे विशद केली आहेत. वाचकांच्या सोयीसाठी याच टीकेचा मराठी अनुवाद इथे प्रस्तुत करतांना प्रतिश्लोकाचे सरल व गूढ अर्थ एकाखाली एक दिले आहेत. प.प.श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांचे शिष्यप्रवर प्रातःस्मरणीय योगिराज श्री. वामनरावजी गुळवणीमहाराज यांनीं प.प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून प्राप्त केलेल्या कुंडलिनी योगमार्गाचे दिग्दर्शन यांत स्पष्टपणे झाले आहे हे लक्षणीय आहे.

**मन्दधीभिस्तु तीर्थानि तिष्येऽज्ञातानि तान्यतः।**
**गुरुः प्राहैकदा लोकं पावनानि प्रदर्शयन्।।७५।।**

**सरल** - अर्थ कलिकाळांत लुप्त झालेली, लोकांना अज्ञात असलेली तीर्थे त्यांना दाखविण्यासाठी त्यांना एके दिवशी श्रीगुरु म्हणाले.

**गूढार्थ** - कलिकाळांतील मंदबुद्धी मानवांना आपल्या देहांतच विद्यमान असलेली ध्यानादि तीर्थे (तरणोपाय) कळत नाहीत. ती त्यांना समजावण्यासाठी श्रीगुरु बोललेत.

**काशीं जिगमिषो लोक सर्वतीर्थानि चात्र तु।**
**दर्शयामीति तान्प्रोक्त्वा तीर्थान्याह स दर्शयन्।।७६।।**

**सरल** - काशीला जाऊं इच्छिणाऱ्या लोकहो, येथेच (या गाणगापुरांतच) सर्व तीर्थे आहेत. चला मी तुम्हांला दाखवतो.

**गूढार्थ** - काशीचा अर्थ प्रकाशक म्हणजे ज्ञान असा होतो. गंधर्वनगर म्हणजेच

दृष्टनष्टस्वभाव देह होय. ज्ञानप्राप्तीचे अर्थात् मोक्षाचे सकळ तरणोपाय (तीर्थे) इथेच या आकाशांतील मेघमय गंधर्वनगरीप्रमाणे दिसतां दिसतां नष्ट होणाऱ्या या देहांतच आहेत.

**संगमोऽयं प्रयागोऽष्टौ तीर्थान्यत्र तु षट्कुले ।**
**त्रिवेणीसङ्गमोऽयं तु पापघ्न्यमरजेष्टदा।।७७।।**

**सरल** - हा संगमच प्रयाग असून या षट्कूलांत आठ तीर्थे व त्रिवेणीसंगम आहे. ही अमरजा भक्तांचे अभीष्ट पुरवणारी असून सर्व पापांचा नाश करते.

**गूढार्थ** - हे (भ्रूमध्यांतील) आज्ञाचक्रच प्रयाग होय ज्यांत अष्टसात्त्विकभावरूपी अष्टतीर्थे व इडा-पिंगला-सुषुम्णा यांचा त्रिवेणीसंगम आहे. ह्या ठिकाणीं श्रीस्वामीमहाराज '*इडा भगवती गङ्गा पिङ्गला यमुना नदी। तयोर्मध्यगता नाडी सुष्मणाख्या सरस्वती* ' ही पद्मपुराणाची उक्ती उद्धृत करतात. ह्या तिन्हींत काठकश्रुतीनुसार क्रममुक्ती हे इष्टफल देणारी (***तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति***) अमरजा आहे. त्रिवेणीसंगम याचा अर्थ ***तत् त्वं असि*** या तीन पदांच्या मिळणीने होणारे महावाक्य असाही करतां येईल असे श्रीस्वामीमहाराज म्हणतात.

**जीवनायेशदत्तेन्द्र-नीयमानसुधाघटात् ।**
**युद्धे जालन्धरहत-देवानाममृतं च्युतम्।।७८।।**

**सरल** - अमरजा नदीच्या उद्भवाची कथा सांगतात. देवदैत्यांच्या युद्धांत जालंधरदैत्याने ठार केलेल्या देवांच्या संजीवनासाठी भगवान् शंकरांनी दिलेला अमृतघट नेतांना इंद्राच्या हातून त्यांतील किंचित्से अमृत (भूमीवर) सांडले.

**गूढार्थ** - जालंधर म्हणजे मनाच्या स्वाभाविक कामक्रोधादिवृत्ती (Instincts) त्यांविरुद्ध प्रकाशरूप देव (विवेक-वैराग्यादि) यांचे युद्ध छांदोग्योपनिषदांत सांगितले आहे. ईश महणजेच आत्मा व इंद्र म्हणजेच जीव ('*इंद्रायेन्दो परिस्रवा* ' ऋग्वेद). सुधा म्हणजेच योगशास्त्रोक्त सहस्रारचक्रांतून स्रवणारे अमृत होय.

**किञ्चिच्च्युतादपि महा-प्रवाहोऽत्रामरत्वदः।**
**कालमृत्युभयाघघ्नी जातैषामरजा ततः।।७९।।**

**सरल** - अल्पशा सांडलेल्या त्या अमृतापासूनच हा देवत्व देणारा महाप्रवाह व त्यापासूनच महामृत्यू, भय आणि पाप यांचा नाश करणारी ही अमरजा सरिता (निर्माण) झाली.

**गूढार्थ** - भगवदनुसंधानांत खंड हा प्रमादच कालमृत्यू, द्वैत हेच मूळ भय (किंवा भयाचे मूळ), नित्य, शुद्ध, बुद्ध, अविकारी आत्म्याच्या ठिकाणी अविद्येमुळे उपाधिकार्य जो जीव त्याचा अध्यास ही आत्मस्वरूपाची चोरी हेंच महापाप

ह्यांचा विनाश करणारी सुषुम्णा नाडी म्हणजेच अमरजा.

**मनोरथाख्यं तीर्थं तु कल्पद्रवश्वत्थसन्निधौ ।**
**सन्तोषतीर्थमग्रेऽत्र रुद्रो विश्वेश्वरः स्वयम्।।८०।।**

**सरल** - कल्पवृक्ष मानला गेलेल्या अश्वत्थासन्निध मनोरथ हे तीर्थ आहे. त्याच्या पुढे संतोषतीर्थ आहे. इथे जो रुद्र आहे साक्षात् विश्वेश्वरच आहे.

**गूढार्थ** - मनोरथ तीर्थ म्हणजे भक्ति. संतोषवृत्ती हेच संतोषतीर्थ. रुतं म्हणजे शोक त्यालाच पळवणारा, इथे रुद्र म्हटलेला सात्त्विक अहंकार होय. ह्या सात्त्विक अहंकाराच्या सान्निध्याने आनंददायी असल्याने नंदी म्हणविणारा हा विवेक आहे.

**वामहस्तेन नन्द्यण्डं धृत्वाङ्गुष्ठं च तर्जनीम् ।**
**संस्थाप्य शृङ्गयोर्मध्यात् कृतशैवीप्रदक्षिणः।।८१।।**

**सरल** - त्या विश्वेश्वराच्या दर्शनाचा विधि सांगतात. शैवीप्रदक्षिणा करून डाव्या हाताने नंदीचे वृषण धरून उजव्या हाताचे आंगठा व तर्जनी शिंगावर ठेवून त्यामधून शिवलिंगाचे दर्शन घ्यावे.

**गूढार्थ** - महावाक्याचे श्रवण केल्यावर लगेच ज्ञान होत नाही म्हणून त्याचे श्रवण, मनन, निदिध्यासन वरचेवर करावे लागते. हीच शैवी प्रदक्षिणा. ईश म्हणजे आत्मा. त्याचा 'सोऽहं' तोच मी असा अपरोक्ष अनुभव हेच दर्शन.

**पश्येद्यदीशं मर्त्योऽपि देववच्छ्रीष्टयुग्भवेत् ।**
**साक्षात्काशीयमीशेन विहिता भक्ततुष्टये।।८२।।**

**सरल** - असे दर्शन घेणारा संपत्ती व स्त्रीपुत्रादींची प्राप्ती करून घेतो व देवतुल्य होतो.

**गूढार्थ** - अशा अपरोक्षानुभूतीने इष्ट जीवनमुक्तीची प्राप्ती व अनिष्ट म्हणजे दुःखमूलक जन्ममरणपरंपरेचा नाश होतो.

**जीवन्मुक्तोऽत्र शैवः प्राग्लोके जड इतीरितः ।**
**येनाहिवज्जनो भोगा विषं स्त्रीः शववन्मताः।।८३।।**

**सरल** - पूर्वी इथे, जड म्हणजे (लोकांनी) वेडा मानलेला, लोकांना सर्पवत् मानून त्याच्यापासून दूर राहणारा, भोग ज्याला विषतुल्य होते व स्त्री कलेवराप्रमाणे अपवित्र व अस्पृश्य मानणारा, कोणी एक जीवन्मुक्त होता.

**गूढार्थ** - शिव म्हणजे निरतिशयानंदरूप आत्मा. त्याचा भक्त अर्थात् ज्ञानी असल्याने जिवंतपणींच मुक्त. लोकांच्या संगरूपी सर्पाच्या दंशाने, दुर्वासनारूपी

विषयविषाने ग्रस्त (कामार्त) झालेला साधू प्रमादमृत्यूला बळी पडतो. विषयभोग हे शरीरांत भिनले की मृत्यू ठरलेलाच आहे. तसेच विषयतादात्म्याने प्रमादमृत्यू अवश्यंभावी आहे. असा निश्चय असलेला. शवदर्शनानंतर जसे स्नान करतात तसेच स्त्रीदर्शन झाले तर करावे असे मानणारा.

**कदाचित्स सदा युक्तः प्रमाथीन्द्रियसंयमी ।**
**बन्धूनाहात्र काशीयं त ऊचुर्दर्शयाद्य नः ।।८४।।**

**सरल** - एकदा काशीयात्रेचा आग्रह करणाऱ्या आपल्या बंधूंना, सदा युक्त अर्थात् अखंड भगवदनुसंधानांत असणारा व आपल्या इंद्रियांना वश ठेवणारा असा तो म्हणाला 'हीच (इथेच) काशी आहे.' त्यावर ते 'आज आम्हांला (ती) दाखव(च)' असे म्हणाले.

**स दध्यावीशमीशोऽपि तदैत्याहेप्सितं वद ।**
**स प्राहाद्य त्वया सार्धं काशीं संस्थापय ध्रुवाम् ।।८५।।**

**सरल** - त्यावर त्याने श्रीविश्वेश्वराचे ध्यान करून त्यांना आवाहन केले. भगवान शंकरांनी त्याचे ईप्सित विचारले तेव्हां त्याने "आपल्यासह काशीची येथे स्थापना करा" अशी प्रार्थना केली.

**तथेत्युक्त्वेश्वरोऽगात्तज् जलान्तः कुण्डमुत्तमम् ।**
**उद्भूतं तत्र विश्वेश-मूर्तिराविरभूत्क्षणात् ।।८६।।**

**सरल** - लगेच तेथे त्या जलांत एक कुंड निर्माण झाले व त्या कुंडांत विश्वेश्वराची मूर्ति प्रकट झाली.

**काश्यां चिह्नानि यान्यत्र जातान्यालोक्य तानि सः।**
**स्वजनान्दर्शयित्वोचे काशीयं क्वापि यात नो ।।८७।।**
**प्रत्यब्दं पूजयित्वा नो विठ्ठलं कुलदैवतम् ।**
**काशीयात्रात्र कर्तव्या सर्वाघघ्नीप्सितार्थदा ।।८८।।**

**सरल** - काशीच्या सर्व खाणाखुणा तेथे दिसूं लागल्या त्या आपल्या बांधवांना दाखवून तो म्हणाला की ही काशीच आहे. आपल्या कुळांत कुणीहि काशीला जाऊं नये व आपले कुलदैवत जो विठ्ठल त्याची पूजा करून सर्व पातकांचा नाश करून इष्टकामना पूर्ण करणारी काशीयात्रा इथे येऊन करावी.

**तस्मात्काशीयमित्यस्मिन् गुरौ ब्रुवति तत्क्षणम् ।**
**पूर्वाश्रमस्वसा रत्ना-नाम्नी प्राप्य ननाम तम् ।।८९।।**
**तामाह श्रीगुरुः प्रोक्त-स्मृतिस्तेऽस्ति न वा वद ।**
**सापि स्मृत्वा तदा स्वाङ्गं कुष्ठीभूतं ददर्श ह ।।९०।।**

**सरल** - तेव्हापासून ही काशी मानली जाऊं लागली असे श्रीगुरु गाणगापूरवासियांना सांगतात तोंच त्यांची पूर्वाश्रमांतील बहीण रत्ना तिथे आली आणि तिने त्यांना नमस्कार केला. तिला ते म्हणाले, तुला मी काय सांगितले (कारंज्याच्या भेटींत "पूर्वजन्मींच्या दोषांमुळे तुझा पति संन्यास घेईल व तुला कुष्ठ होईल) ते आठवते काय? तिने त्याचे स्मरण करतांच तिचे सर्वांग कुष्ठाने भरून गेलेले तिला दिसले.

**तां खिन्नां प्रणतां प्राह प्रभुः पापं भवान्तरे।**
**चेद्भोक्ष्यसेऽत्र कुष्ठं द्रागपैत्यंहः प्रयत्नतः।।९१।।**

**सरल** - ह्यामुळे अत्यंत खिन्न झालेल्या तिला श्रीगुरु म्हणतात " हे कुष्ठ प्रयत्नपूर्वक, त्याचे कारण असलेल्या पापाचे शमन करून दबवितां येईल; पण ते जन्मातरी भोगावे लागेल "

**सा प्राह मातृकुक्षौ मे यथेतो न भवेत्स्थितिः।**
**तथैव भवता कार्यं नान्यज्जाने परात्पर।।९२।।**

**सरल** - ज्या प्रकारे ह्यापुढे मला गर्भवास घडणार नाही अशी आपण कृपा करावी याउप्पर मी कांही जाणत नाही.

**गुरुः प्राहाघहृत्तीर्थे त्र्यहं स्नानाच्छिवान्तिके।**
**सप्तजन्मार्जितांहोऽपि नश्येत्कुष्ठस्य का कथा ।।९३।।**

**सरल** - श्रीगुरु म्हणाले ह्या (शिवासमोरच्या) पापविनाशतीर्थांत स्नान केल्यावर सात जन्माचे पाप नष्ट होईल तर मग कुष्ठाची काय कथा?

**सापि तत्र त्र्यहस्नानाद् भूत्वा कुष्ठोनितामला।**
**मठं निर्माय तत्रैव स्थिता मुक्ता बभूव ह।।९४।।**

**सरल** - त्याप्रमाणे तिने त्या पापविनाशी तीर्थांत तीन दिवस स्नान केले व तिचे कुष्ठ व पाप नष्ट होऊन ती तिथेच मठी करून राहिली व (कालांतराने श्रीगुरूंच्या ध्यानाने) मुक्त झाली.

**गूढार्थ** - मुक्ति सलोकता, सरूपता आणि समीपता अशी त्रिविध आहे. तिचे कुष्ठत्व म्हणजे पुनरावृत्तिरूप संसरण होय. तीन दिवस स्नान हे ज्ञानाभ्यासाचे उपलक्षण आहे.

**गुरुस्त्वग्रेऽघहृज्जम्बु-द्वीपस्थाखिलतीर्थवत्।**
**कोटितीर्थं दर्शयित्वा प्राहेदं सफलाघहृत्।।९५।।**

**सरल** - भूलोकांतील सात द्वीपांमध्ये जंबुद्वीप, त्यांतील नऊ वर्षांपैकीं भारत वर्ष त्यांतीलच गाणगापूरांतील हे कोटितीर्थ सर्व पापांचा नाश करणारे व जंबुद्वीपांतर्गत सर्व तीर्थांच्या योग्यतेचे आहे.

**गूढार्थ** - कोटितीर्थ म्हणजे विशुद्ध ज्ञान होय. *'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' असे भगवद्गीता सागते.*

**क्रान्तिपर्वग्रहेष्वत्र स्नानदानजपादयः।**
**अक्षय्यानन्तफलदा अकुत्सितहृदां नृणाम्।।९६।।**

**सरल** - मेषादि संक्रमणें, पौर्णिमा, अमावास्या, व्यतीपातादि पर्वें, सूर्यचंद्रादि ग्रहणे या काळांत ह्या तीर्थांत स्नानदानजपादि श्रद्धायुक्त मनाने केल्याने अक्षय्य फलाची प्राप्ती होते.

**सरल** - इथे संक्रमणं ह्याचा अर्थ इडा आणि पिंगला यांचे सम्यक् क्रमण. इडेचे क्रमण करून प्राण मूलाधाराशीं आला कीं चंद्रग्रहण, पिंगलेंतून मूलाधारांत प्राण आला कीं सूर्यग्रहण, इडा-पिंगलांच्या संधीला (आज्ञाचक्र) प्राण पोंचला कीं अमावास्या, इडेंतून प्राण पिंगलेंत जाणे दक्षिणायन व पिंगलेंतून इडेंत प्राणाचे गमन हे दक्षिणायन असे सूतसंहितेंत वर्णन आहे. त्याचा दाखला श्रीस्वामीमहाराजांनी टीकेंत पुढे दिला आहे.

**गयावद्रुद्रपादाख्यं तीर्थं त्वग्रे गयोक्तवत्।**
**कृध्वं कर्मात्र कृष्णाग्रे चक्राख्यं द्वार्वतीसमम् ।।९७।।**
**द्वारकोक्तवदाचीर्णात् फलं तस्याश्चतुर्गुणम् ।**
**स्नानाज्ज्ञानी भवत्यत्र पतितोऽप्यस्थिचक्रवत् ।।९८।।**

**सरल** - यापुढील रुद्रपाद नांवाचे तीर्थ गयेप्रमाणे असून गयेंत विहित असलेले कर्म इथे करावे असे सांगितले आहे. त्यानंतरचे चक्रतीर्थ हे द्वारकेप्रमाणे आहे. द्वारकेंत विहित असलेल्या स्नानादिकांच्या आचरणाने द्वारकेच्या चौपट फळ मिळते व तिथे स्नान करणाऱ्याच्या अस्थि चक्रांकित होतात.

**गूढार्थ** - गया ह्या शब्दाचा अर्थ श्रीस्वामीमहाराजांनी उदरालम्बन म्हणजे मणिपूरचक्र असा केला आहे. तसेंच द्वारका हृत्कमल म्हणजेच अनाहतचक्र आहे असे म्हटले आहे.

**गोकर्णवद्ग्रामपूर्व-भागः कल्लेश्वरोऽत्र तु ।**
**महाबलेशवत्तीर्थं मन्मथाख्यं सुसिद्धिदम् ।।९९।।**

**सरल** - गाणगापूरच्या पूर्वभागीं असलेला कल्लेश्वर हा गोकर्णसम असून तेथील मन्मथतीर्थ महाबळेश्वरतुल्य आहे. ते उत्तम प्रकारच्या सिद्धीची प्राप्ती करून देते.

**गूढार्थ** - गूढार्थ विशद करून महाराज सांगतात की मन्मथतीर्थ हेच ब्रह्मरंध्र आहे हे सुसिद्धिदं या विशेषणावरून स्पष्ट आहे. कुणीकुणी अनाहताला गया व ब्रह्मरंध्राला द्वारका म्हणतात असे सांगून श्रीस्वामीमहाराज आत्मपुराणाचे प्रमाण देतात. "या ब्रह्मरंध्रांचा भेद करूनच जीवभूत श्रीकृष्णपरमात्मा देहामध्यें प्रवेश करतो. त्यामुळे हीच मनुष्यमात्रांची द्वारका होय" अशा अर्थाचे ते श्लोक आहेत.

**नभस्यखण्डाभिषेकादूर्जे दीपोत्सवात्स तु।**
**अक्षय्यफलदो दद्यात् सर्वसिद्धियुतामृतम्।।१००।।**

**सरल** - श्रावणांत अखंड अभिषेकाने व कार्तिकांत दीपोत्सव केल्याने तो (कल्लेश्वर) सर्वसिद्धीसह मोक्ष प्रदान करतो. इथे महाराजांनी हे अमृतत्व आपेक्षिक असून खरे अमृतत्व हे आत्मयाथात्म्य हेच आहे असे प्रतिपादन सविस्तर सप्रमाण केले आहे. परंतु मंदप्रज्ञ मुमुक्षूंसाठी स्वर्गसाधनभूत यज्ञादिक अनुष्ठाने श्रुतीनी सांगितली आहेत, तशीच दूर काशीला जाण्यास असमर्थ असूनही आत्मशुद्धीची इच्छा असणाऱ्यांसाठी हा जवळची काशी दाखविली

**एवं शशंसाखिलतीर्थयात्रां तेऽपि प्रहृष्टाश्च तथैव चेरुः।**
**एतादृशं क्षेत्रमिदं वरीयो विज्ञाय विज्ञानमयात्मकोऽस्थात्।।१०१।।**

**सरल** - अशा रीतीने संपूर्ण तीर्थयात्रा (श्रीगुरूंनी लोकाना) सांगितली व त्यांनीहि ती अत्यंत आनंदाने तशीच आचरली. अशा प्रकारचे हे श्रेष्ठ क्षेत्र जाणणारा कृतकृत्य होतो.

**गूढार्थ** - ह्या मार्गाच्या सौकर्याने सर्व लोकांना आनंद होणे सहजच आहे. मुक्तिसारखे श्रेष्ठतर फल प्राप्त करून देणाऱ्या गंधर्वनामक हे देहक्षेत्र वरीय म्हणजे श्रेष्ठ आहे. त्याला जाणणारा विज्ञान अर्थात् बुद्धि ही ज्याची उपाधि आहे, अशा आत्मस्वरूपांत स्थिर होतो.

श्रीगुरुः शरणम्।।

# दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा। या महामंत्राचा भावार्थ.

"दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा।" हा सिद्ध, प्रकट महामंत्र, ही प.प.श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांची दत्तभक्तांना एक अमोलिक देणगी आहे. आबालवृद्ध, सर्व जातिधर्मांच्या स्त्रीपुरुषांना हा खुला आहे. ह्या मंत्राच्या जपाने ऐहिक आणि आमुष्मिक कल्याणाचे भागी झालेले हजारो दत्तभक्त ह्याची ग्वाही देत आहेत. मंत्राचे सामर्थ्य प्रामुख्याने वर्णांत असले, आणि त्याचे अनुष्ठान वाचेने (वैखरी, मध्यमा इत्यादि) घडत असले तरी, विदुषांना फल अधिक ("विदुषस्तु फलाधिक्यम्" - द्विसाहस्त्री ६-५२) असते असे श्रीस्वामींनहाराजांचे वचन आहे. मननाने तारणारा तो मंत्र, अशी मंत्राची व्याख्याही आहे. तेवढ्यासाठी हे यथामति, यथाशक्ति मनन! श्रीगणेशदत्तस्वरूप सद्‌गुरूंनी बुद्धीला प्रेरणा देऊन हे कार्य सिद्धीला न्यावे हीच प्रार्थना!

ह्या मंत्राचा गूढार्थ प्रकट करण्याच्या उद्देशाने श्रीस्वामी महाराजांनी मंत्राचेच पालुपद असलेली एक आरती केली आहे. ह्या आरतीच्या चार चरणांत ह्या मंत्राच्या चार पदांचे स्पष्टीकरण आहे. ह्याच आरतीच्या आधारे प.पू.श्री. दत्तमहाराज कवीश्वर यांनी, 'श्रीसद्‌गुरु सेवा मंदिर", येऊर, ठाणे येथे एप्रिल, १९८०मध्ये प्रवचन केले आहे. प्रस्तुत लेखांत मुख्यतः ह्या प्रवचनाला 'वाट पुसत'च जावयाचे आहे.

प्रथमतः ही आरती येथे दिली आहे.

**दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा। आरति हे तव चरणीं राहो।।**
**आरति हे तव चरणीं राहो। नतिततति गुरुवरा।।ध्रु०।।**
**दिग्भिरवेष्टितमम्बरमेव प्रत्यग्ब्रह्मेति। खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति।**
**खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति। दिगंबरा चेति।।१।।**
**दिग्वच्चाम्बरमेव व्यापक पूर्णब्रह्मेति। सच्चित्सुखघनमायातीतम्।**
**सच्चित्सुखघनमायातीतम्। दिगंबरा वदति।।२।।**
**श्रीपादश्रीवल्लभ नाम प्राप हि नक्रगजेंद्रमिव। द्रौपद्यंबरीषचोर।**
**द्रौपद्यंबरीषचोरग्रसितद्विजमेव।।३।।**
**दिगंबरा गुरु वासुदेव दत्तस्त्वंब्रह्म। कामक्रोधग्रसितं मां लभ।।**
**कामक्रोधग्रसितं मां लभ तथैव झटिति वह।।४।।**
**दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा।।**

ध्रुपदच केवळ मराठींत आहे. पुढची चारही चरणे संस्कृतांतच आहेत. आरतींतील गुरुवरा या संबोधनाने ह्या आरतीचा **प्रतिपाद्य विषय सद्‌गुरु हा आहे** व आरतींतील सर्व पदे ह्या सद्‌गुरुस्वरूपाचीच विशेषणे आहेत हे स्पष्ट आहे. जो सद्‌गुरु तोच दिगंबर आणि तोच श्रीपाद आहे. त्याच सद्‌गुरूंच्या चरणी ही आरती नमनांच्या माळांसह (नतिततति) समर्पित केली आहे. ज्या मोक्षमार्गाचे दिग्दर्शन पुढे करावयाचे आहे त्याचा मूलाधार सद्‌गुरू आहेत हेच जणू श्री स्वामी महाराजांना सुचवायचे आहे. हेच सद्‌गुरुतत्त्व साधकाच्या अंतरांत प्रवेशून कसे विकसित होते हे पुढच्या चरणांत व्यक्त केले आहे. ही भूमिका आरंभीच स्पष्ट व्हावी तसेच प्रत्येक पदाच्या शेवटी तिचा अभ्यास व्हावा हा श्रीस्वामी महाराजांचा उद्देश दिसतो. शेवटच्या चरणांत पुन्हां सद्‌गुरुस्वरूपाचेच आवाहन करून, तात्पर्यनिर्णयाच्या षड्‌विध लिंगांपैकी उपक्रमोपसंहार व अभ्यास ह्या दोन प्रधान अंगांचा उपयोग करून ह्या आरतीचे तात्पर्य सद्‌गुरूला शरण जाण्यांत आहे असे श्रीमहाराजांनी सुचविले आहे. नंतरच्या चार चरणांत, मंत्राच्या चार पदांचा अंतर्भाव आहे. तीन वेळां 'दिगंबरा' आले आहे तर एकदा 'श्रीपादवल्लभ ' हे पद आले आहे. ह्या चार चरणांचा क्रमाक्रमाने विचार करूं या.

## १. प्रत्यग्ब्रह्म.

**दिग्भिरवेष्टितमम्बरमेव प्रत्यग्ब्रह्मेति। खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति।**
**खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति। दिगंबरा चेति।।१।।**
**दिग्भिः अवेष्टितं अंबरं एव प्रत्यक् ब्रह्म इति।**
**खं ब्रह्म इति श्रुतिरपि वदति इति च दिगंबरा।**

दिशांनी न वेष्टिलेले आकाशच प्रत्यक् (प्रत्ययाला येणारे) ब्रह्म होय. आकाश (म्हणजेच) ब्रह्म असे वेदहि सांगतात। असा हा (पहिल्या) दिगंबराचा (भावार्थ आहे)।।१।। 'दिशांनी *न वेष्टिलेले* आकाश' लक्षांत येण्यास प्रथम दिशांनी *वेष्टिलेले* आकाश म्हणजे काय ते पहावे लागेल. इथे आकाश म्हणजे प्रत्ययाला येणारे ब्रह्म (आत्मस्वरूप) असे स्पष्टच सांगितले आहे. पण सर्वसाधारण माणसांना हा आत्मस्वरूपाचा प्रत्यय येतांना दिसत नाही. ह्याचे कारण मानवी जाणीव ही इंद्रियांद्वारांच कार्यान्वित होत असल्याने आपल्याला बाह्य जगताचाच अनुभव येत असतो. इंद्रिये स्वभावतःच बहिर्गामी असतात. त्यामुळे त्यांद्वारे मिळणारे ज्ञान बाह्य जगताचेच असते. अंतरात्मा (जो स्वभावतःच इंद्रियांना गोचर नसतो) त्यांना दिसत नाही. अशा अर्थाचा मंत्र

कठोपनिषदांत आहे. तिथेच पुढे सांगितले आहे की कुणी एखादा धैर्यवान् पुरुष अमृतत्वाची इच्छा धरून, डोळे झांकून (इंद्रियांचा निग्रह करून) प्रत्यगात्म्याला पाहतो (अनुभवतो).

हा आत्मा शुद्ध चैतन्यस्वरूप, निर्विकार, निःसंग, आनंदघन आणि नित्य असतो. जन्म-मृत्यु आदि विकार त्याला नसतात. सुखदुःखादि द्वंद्वांच्या तो पलीकडे असतो. 'चिदानंदरूपः शिवोऽहं' अशी त्याची प्रत्यक्ष अनुभूति तद्रूप होऊनच घेता येते. अर्थात् ही उपलब्धि होण्यासाठीं मनाला लागलेली इंद्रियांची म्हणजेच पर्यायाने त्या त्या विषयांची ओढ गेली पाहिजे, निदान ती कमी तरी झाली पाहिजे. यासाठींच गीतेंत भगवंतांनी सांगितले आहे -

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्ण-सुखदुःखदाः।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत।।२-१४।।**

इंद्रियांद्वारां विषयांमागे धांवण्याची ही मनाची खोड अनेक जन्माच्या संस्कारांनी पक्की झालेली असल्याने ते मन सहजासहजी विषय सोडून अंतर्मुख होत नाही. 'तैसा हृदयामध्ये मी राम। असतां सर्वसुखाचा आराम। कीं भ्रांतासी काम। विषयांवरी।। ' असे संतशिरोमणि ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांत अभ्यासयोगाचे विवरण करतांना माउली म्हणतात की ह्या ओढाळ मनाला रोज 'निमिखभरी' तरी थोडे थोडे माझ्याकडे लाव. मी आनंद(सुख)स्वरूपच असल्याने, 'जे जे का निमिख। देखेल माझे सुख। तेतुलेनि अरोचक। विषयी घेईल।।'. हा मनाला अंतर्मुख करण्याचा ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेला उपाय सोपा व परिणामकारक आहे. हेच संत तुकाराम महाराजांनी सांगितलेले 'रामनामीं आवडी उपज'विणारे 'सुलभ गोमटे' साधन आहे. पण ते 'उपतिष्ठे पूर्वपुण्ये.' 'बहुत सुकृताची जोडी' असेल तरच 'संतचरणरज' लाभतात आणि या 'महत्पादरजोऽभिषेका'च्या परिणामस्वरूप 'विठ्ठली आवडी' निर्माण होते. तेव्हांच मन अंतर्मुख होते आणि विषयांपासून हळूंहळूं उपरति व्हायला लागते. ह्यासाठीच सत्संगाची महति श्रुति-स्मृति-पुराणे एकमुखाने गात आहेत. संत म्हणजेच सद्गुरु आपल्या तपःसामर्थ्याने शिष्याचे वासनेचे बीज जाळून टाकतात आणि त्याला कर्मसाम्यदशा प्राप्त करून देतात आणि त्याच्या अंतरांतील सुप्त आध्यात्मिक शक्ति (कुंडलिनी) जागृत करतात. यालाच तंत्रग्रंथांत शक्तिपात अशी पारिभाषिक संज्ञा आहे. हेच ते 'देवाचे द्वार' जेथे क्षणभर स्थिरावणाऱ्याला चारी मुक्ति साधतात अशी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची ग्वाही आहे. इथेच मुमुक्षूचा साधक होतो आणि त्याची आपल्या अंतरात्म्याशी ओळख होते. ह्या वेळी त्याला अनुभवाला येते तेच प्रत्यक् ब्रह्म.

आत्मा हा अनुभूतीचा विषय होऊं शकत नाही. मग हे असे कसे म्हटले अशी शंका साहजिकच उपस्थित होते. आत्म्याचा साक्षात्कार हा स्वसंवेद्य असतो. दृश्य, द्रष्टा व दर्शन ही त्रिपुटी तेथे रहात नाही. हे झाले अंतिम साक्षात्काराचे वर्णन. साधकावस्थेत अनुभाला येणारे आत्मस्वरूप हे त्याच्या मन, बुद्धि आदि कोशांतून परावर्तित झालेल असते. खिडकींतून येणारा सूर्यप्रकाश जसा खिडकीचा आकार, कांचेचा रंग इत्यादि धारण करतो तद्वत्च आत्मस्वरूप साधकाच्या मन-बुद्धि आदि उपाधींचे गुण धारण करतो. त्या त्या साधकाच्या आशयानुसार अनुभूतीचा घाट असतो. याविषयी भगवद्गीतेच्या २ऱ्या अध्यायांतला २९वा श्लोक विचारणीय आहे-

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः।**
**आश्चर्यवच्चैनमन्यच्छृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्॥**

सद्गुरुकृपेने अंतरांतील शक्ति जागृत झाल्यावर जे अलौकिक अनुभव येतात त्यांनी तो आश्चर्याने भारावून जातो. कुणाला मूर्ति वा कुणाला अमूर्त प्रकाश दिसतो, कुणाच्या मुखांतून दिव्य वाणी निःसृत होते तर कुणाला दिव्य नाद ऐकायला येतात. मात्र हे सर्व अनुभव कुठून कसे आले हे कुणीहि जाणूं शकत नाही. व्यक्ति तितक्या प्रकृति ह्या न्यायाने ह्या अनुभवांमध्ये असीम वैविध्य आहे. अनेक तंत्रग्रंथांतून, संतवचनांतून ह्यांचे वर्णन वाचायला मिळते. दिव्य नाद, दिव्य स्पर्श, दिव्य रस, दिव्य रूप व दिव्य गंध तसेंच नाना प्रकारच्या क्रिया, काव्यस्फूर्ति, दिव्य गायन, योगशास्त्रांतील बंध, मुद्रा इत्यादि साधकांकडून सहज घडतात. संत-सत्पुरुषांची दर्शने, देव-देवतांशी संपर्क, मंत्रशक्तीची जागृति, ध्यान-ध्यारणा-समाधि ह्या राजयोगाच्या भूमिका हे सर्व त्या आत्म्याचेच आविष्कार आहेत. हे उपाधिविशिष्ट आत्मस्वरूप आहे. शुद्ध आत्मस्वरूप मात्र या सर्वांच्या पलीकडे आहे. त्याच्या प्राप्तीच्या मार्गावरचे हे विविध टप्पे आहेत.

ह्या सर्व अवस्थांचे उद्दिष्ट साधकाच्या पंचकोशांची शुद्धि करणे हेच आहे. आपल्या शास्त्रांतून जीव हा पंचकोशांनी झांकलेले आत्मतत्त्व आहे असे प्रतिपादन आहे. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे हे पांच कोश किंवा पांच उपाधि आहेत. अन्नावर वाढणारा, पोसणारा तो **अन्नमय कोश** हा चर्मचक्षूंना दिसणारा स्थूल देह होय. अस्थि, मांस, मज्जा, त्वचा, धातू इत्यादींचा बनलेला हा कोशच म्हणजे आपण अशी आपली दृढ भावना अनंत कालाच्या अभ्यासाने झालेली आहे. ह्यालाच जन्म, मृत्यू, वृद्धि, परिणाम, क्षय व नाश हे सहा विकार आहेत. ह्या लोकांतील अस्तित्त्वाचे सर्व संबंध ह्या स्थूल देहाचेच आहेत. आपण जागे असतांना ह्या देहाचेच भान आपल्याला असते.

झोपेत किंवा स्वप्नावस्थेत आपल्याला ह्याचे भान नसते.

ह्या स्थूल देहाची धारणा प्राणशक्तीच्या कार्याने होते. हाच प्राण श्वसन, पचन, अभिसरण, निःसरण इत्यादि कार्यांसाठी, प्राण, अपान, व्यान, उदान, समान अशी पांच नावे धारण करतो. ह्याशिवाय नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय अशा पांच उपप्राणांचेहि वर्णन आहे. हे पाच प्राण आणि पांच कर्मेंद्रिये मिळून **प्राणमय कोश** होतो. हा सर्व अवस्थांत कार्यान्वित असतो. हा मनोमय आणि अन्नमय कोशांना जोडणारा दुवा आहे. ह्या कोशामुळेच अन्नमय कोश जिवंत असतो असे म्हणतां येईल.

पांच ज्ञानेंद्रिये आणि त्यांच्यातून विषय ग्रहण करून अनुकूल-प्रतिकूल संकल्प करणारे मन ह्यांचा **मनोमय कोश** होतो. जन्मजन्मांतराच्या वासनांचा हा कोश आहे आणि ह्यांच्यामुळेच त्याला विविध विषयांसंबंधी आवड अथवा नावड असते. ह्या प्रत्येक जीवाच्या वेगवेगळ्या असतात. साधारण मनुष्याची ह्यांच्यामुळेच चांगल्या वाईट कर्मांत प्रवृत्ती होते.

मनाच्या संकल्पविकल्पांच्या चांगल्या-वाईटाचा(सदसत्), तसेच नित्य-अनित्य इत्यादि विवेक करणारी बुद्धि हाच **विज्ञानमय कोश** होय. प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय कोशांच्या १७ अवयवांचा (५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, ५ प्राण, मन आणि बुद्धि) मिळून **सूक्ष्म देह** किंवा **लिंगदेह** होतो. स्वप्नावस्थेत आपल्याला स्थूलदेहाचे भानहि नसते, त्या वेळीं हा सूक्ष्म देहच कार्यान्वित असतो. ह्या सूक्ष्मा देहांतच जन्मजन्मांचा कर्माशय संस्काररूपाने विद्यमान असतो. मृत्युसमयी हा सूक्ष्म देहच जुन्या स्थूलदेहाचा त्याग करून नवा धारण करतो (भ.गीता १५:८). जोंपर्यंत हा लिंगदेह आहे तोंपर्यंत 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' हे संसरण चालू राहणार आहे. अर्थात्च ह्या लिंगदेहाचा भंग म्हणजेच मुक्ति असे मानायला प्रत्यवाय नाही.

गाढ झोपेत - म्हणजेच सुषुप्ती अवस्थेत, स्थूल व सूक्ष्म या दोनही देहांचे भान नसते. मात्र एका निरतिशय आनंदाची स्मृति ह्या अवस्थेतून बाहेर पडल्यावर राहते. ह्यालाच **आनंदमय कोश** असे नांव आहे. आत्मस्वरूपाला आच्छादणारा (आवरण) व दृश्य जगत् भासवणारा (विक्षेप) कोशच जीवावस्थेचे मूळ कारण असल्याने त्याला **कारणदेह** असे नांव आहे. ह्या अज्ञानाचेच असत्त्वावरण व अभानावरण असे दोन भाग आहेत. असत्वावरण म्हणजे आपले खरे स्वरूप (आत्मस्वरूप) ह्या पांच कोशांपलीकडे कांही आहे हे न जाणणे. अभानावरण म्हणजे, शास्त्रादिकांच्या अभ्यासाने हे लक्षांतआले तरी त्याची प्रत्यक्ष अनुभूति नसणे. ह्या कारणदेहांतील सत्त्व गुणामुळेच आपल्याला प्रिय (इष्ट वस्तूच्या दर्शनाने होणारा आनंद), मोद (इष्ट वस्तूच्या प्राप्तीने होणारा

आनंद) व प्रमोद (भोगाने होणारा) या आनंदांची अनुभूति येते.

स्थूल , सूक्ष्म व कारण या तीनहि देहांपासून वेगळा (विशिष्ट) असणारा, जाग्रति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीनहि अवस्थांना जाणणारा (साक्षी) पण तरीहि त्यांच्यांत लिप्त न होणारा अविकारी असा हा आत्माच **महाकारणदेह** होय. हेच प्रत्यग्ब्रह्म. हा **दिक्** म्हणजे पंचकोशांच्या वेष्टनांत झांकलेला आहे. त्याला पहायला हे कोश - ह्या उपाधी बाजूला काढायला हव्यात. म्हणू *दिग्भिरवेष्टित* असे म्हटले आहे. श्रीगुरूंना शरण जाऊन, त्यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या उपदेशांचे - महावाक्यांचे श्रवण, मनन व निदिध्यासन करून, या पंचकोशात्मक तीन देहांचा निरास केल्यावर जो स्वतः प्रकाशतो तो प्रत्यगात्मा! ह्या प्रत्यग्ब्रह्माला श्रीस्वामीमहाराजांनी अंबर म्हणजे आकाश म्हटले आहे. कारण तो आकाशवत् व्यापक, निराकार, असंग, निर्लेप आहे. आपल्या ह्या विधानाला श्रीस्वामीमहाराजांनी '**खं ब्रह्म**' ह्या श्रुतीचे प्रमाण दिले आहे.

हा झाला पहिल्या दिगंबराचा अर्थ. ह्या पदाच्या स्पष्टीकरणांतून श्रीस्वामीमहाराजांनी मोक्षमार्गाचा पहिला टप्पा दाखविला आहे. संसारांतील त्रितापांनी तापलेला, विषयानुसारी इंद्रियांपासून उपरत झालेला, स्वात्मसुखाची ओढ लागलेला मुमुक्षु जेव्हां सद्‌गुरूंना शरण जातो तेव्हां ते त्याच्यावर दया करतात. आपल्या शक्तीने त्याला कर्मसाम्य अवस्था करून त्याच्यावर शक्तिपात करतात. त्याच्या अंतरांतील दैवी शक्तीचा त्याला प्रत्यय आणून देतात. त्याची गोडी लावतात. हे प्रत्यक् ब्रह्म हाच ह्या महामंत्राच्या प्रथम पदाचा लक्ष्यार्थ आहे. पण हे प्रत्यक् ब्रह्म उपाधिविशिष्ट आहे. ह्याला, द्विसाहस्रीच्या २२व्या अध्यायाच्या टीकेत, महाराजांनी म्लेच्छ म्हटले आहे. अखिलात्माच उपाधींतील प्रतिबिम्बरूपाने भासत असल्याने, मालिन्याने आवृत झाल्यासारखा दिसतो. गुरूपदिष्ट साधन दीर्घकाल, निरंतर करून पांच कोश वा तीन देहांची शुद्धि केल्यानेच निःसंग, शुद्ध, नित्य, साक्षी आत्म्याची उपलब्धि होऊं शकते. तेव्हांच हा साधक ह्या 'सोलीव सुखाचा' भागी होतो. हेच श्रीमहाराजांना इथे सुचवायचे आहे.

# २. दिगंबर - पूर्णब्रह्म.

**दिग्वच्चाम्बरमेव व्यापक पूर्णब्रह्मेति। सच्चित्सुखघनमायातीतम्।**
**सच्चित्सुखघनमायातीतम्। दिगंबरा वदति।।२।।**

ह्या दुसऱ्या चरणांत दिगंबर या शब्दाची फोड श्रीस्वामी महाराज दिग् + वत् +अंबर अशी करतात. वत् ह्या प्रत्ययाचे दोन अर्थ होतात. एक अर्थ आहे सारखा किंवा समान. बालवत् म्हणजे लहान मुलासारखा. असा अर्थ लावला तर दिक् म्हणजे दिशातत्त्व व या दिग्-सारखे व्यापक अंबर म्हणजे आकाश असा अर्थ होतो. इथे दिक् म्हणजे एक विशिष्ट दिशा नसून एक काल, आकाश इत्यादिप्रमाणे सर्वव्यापी तत्त्व आहे. पूर्व-पश्चिमादि संज्ञा द्रष्टृसापेक्ष आहेत. पाहणाऱ्याच्या दृष्टिकोनांतून ती नांवे दिली आहेत. वेदांताच्या परिभाषेत सांगायचे तर तर औपाधिक आहेत. जसे काल एक तत्त्व आहे. कांही विशिष्ट क्रियांवरून कालाचे परिमाण केले जाते. एक चुटकी वाजविण्याचा काल, पृथ्वीच्या परिभ्रमणाचा काल किंवा कोणा एका अणूच्या विघटनाचा काल अशा एका क्रियेचे माप गृहीत धरून कालाची गणना, निमिष, वर्ष, नॅनोसेकंद आदि परिमाणांत केली जाते. ह्या जशा कालाच्या उपाधि आहेत तद्वत्च डावा-उजवा, मागेपुढे, पूर्वपश्चिम इत्यादि दिक् तत्त्वाच्या उपाधि आहेत. हे जसे दिक् तत्त्व आहे तसेच आकाशही एक तत्त्व आहे. घट-मठादि उपाधींनी त्याचे घटाकाश, मठाकाश, महदाकाश असे भेद होतात. पूर्ण-ब्रह्महो असेच एक व्यापक तत्त्व आहे व सर्व जीव हे त्याचेच औपाधिक आभास आहेत असे श्रीस्वामीमहाराजांना म्हणावयाचे आहे.

वत् ह्याचा दुसरा अर्थ युक्त असा आहे. बलवत् म्हणजे बलवान्. त्याप्रमाणे अर्थ लावला तर दिक् म्हणजे विश्व, समष्टी, त्याने युक्त म्हणजे त्याला धारण करणारा व्यापक परमात्मा हाच पूर्ण ब्रह्म. असा अर्थ केला तरी फारसा फरक पडत नाही. हे ब्रह्माचे तटस्थलक्षण होईल तर व्यापक ह्या पुढच्या शब्दाने एक स्वरूपलक्षण सूचक होईल. वेदांचे प्रतिपाद्य असे जे पूर्ण ब्रह्म ते वस्तुतः वाङ्मनसागोचर- वाणीलाच काय मनालासुद्धां अनाकलनीय आहे. त्याचे प्रतिपादन दोन तऱ्हांनी केले जाते.

**तटस्थलक्षण** :- पहिला प्रकार आपण ज्या जगाचा इंद्रियांच्या माध्यमांतून अनुभव नित्य घेतो त्याच्या संदर्भांत ब्रह्माचा विचार. या चराचर सृष्टीचा आदि म्हणजेच मूळ. सर्व विश्वाभासाचे अधिष्ठान. त्यानेच स्वतःपासून सर्व जगाची निर्मिती केली. कातिणीने आपल्याच मुखांतून कोळीष्टक विणावे

तसे. जगाचे *उपादानकारण*ही तोच आहे; व *निमित्तकारण*ही तोच आहे. उपादानकारण ज्या द्रव्यापासून कार्य निर्माण होते त्याचे नांव आहे. उदाहरणार्थ, गाडग्याचे उपादानकारण मृत्तिका आहे. त्या मातीपासून जो घट तयार करतो त्या कुंभाराला निमित्तकारण म्हणतात. ह्या दृष्ट जगताचा कर्ता व अधिष्ठान परमेश्वरच आहे. त्याला अभिन्ननिमित्तोपादानकारण अशी संज्ञा भगवत्पूज्यपाद आदिशंकराचार्यांनी दिली आहे. पूर्ण ब्रह्म हे जसे जगाचे कारण आहे तसेच ते जगाला धारण करणारेही आहे व अंतीं जगाचा लय करणारेही आहे. विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय ही सर्व त्याच्या अधीन आहेत. तोच जगाचा कर्ता, धर्ता, भर्ता व संहर्ता आहे. ही जी ब्रह्माची लक्षणे सांगितली ती सर्व तटस्थलक्षणे आहेत. ब्रह्माच्या स्वरूपाविषयी ही विशेष बोध करून देत नाहीत.

**स्वरूपलक्षणे** :- ब्रह्माच्या स्वरूपाचा विचार करणारी लक्षणे पुन्हां दोन प्रकारची आहेत. ब्रह्म कसे आहे याचा विचार करणारी व ब्रह्म कसे नाही याचा विचार करणारी. या कडव्यांत जी 'व्यापक' व 'सच्चित्सुखघन' अशी पदे आली आहेत त्यात ब्रह्म कसे आहे ह्याचा बोध होतो. यांना **विधिवाक्ये** म्हणतात. **सत्** म्हणजे त्रिकालाबाधित. भूत-भविष्य-वर्तमान या तीनही कालात असणारे. **चित्** म्हणजे जाणणारे; ज्याला जाणीव आहे असे; **सुख** म्ङणजे आनंदमय असणारे. याचा **घन** म्हणजे एकरस. यानंतर येणारे **मायातीत** हे ब्रह्म कसे नाही याचा बोध करून देणारे आहे. मायातीत- अर्थात् मायेची ज्यावर सत्ता चालत नाही असे आहे. या शब्दांत सर्व निषेधात्मक वाक्यांची सूचना आहे. नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः। न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः।।२:२३।। हे भगवद्वचन हे **निषेधवाक्या**चेच उदाहरण आहे.

मन-बुद्धीच्याही पलीकडच्या ब्रह्मस्वरूपाचा बोध वाणीने होणार नाही हे स्पष्ट असतांनाही ह्या सर्व प्रतिपादनाचे काय प्रयोजन? ही सर्व लक्षणे व वचने आत्मस्वरूपाचा बोध करून देऊं शकत नाहीत, हे खरे असले तरी, आत्म्याचा शोध घेण्यास हीच उपकरणे मानवाला उपलब्ध आहेत. "मृग्योऽसि पुरुषेणैव बुद्ध्यादिगुणहेतुभिः" (द्विसाहस्त्री गुरुस्तुतिः७१) म्हणजे मानवाच्या बुद्ध्यादि गुणांनीच भगवंताचा शोध घ्यायचा आहे. त्यासाठी ही तत्त्वे मार्गदर्शक आहेत. ह्यालाच परोक्ष ज्ञान असे म्हणतात. ह्या वचनांचेच श्रवण मनन व निदिध्यासन करून अपरोक्ष ज्ञानाकडे वाटचाल करायची आहे. तटस्थलक्षणांचा उपयोग मननाची दिशा निश्चित करण्यासाठी होतो. जसे उंच आकाशांत असणाऱ्या

चंद्रावर लक्ष आणण्यासाठी त्या दिशेला असणाऱ्या एखाद्या झाडाच्या फांदीकडे बोट दाखवून "चंद्र त्या तिकडे आहे" असे सांगावे, तसेच निर्विकार, निष्क्रिय, असंग ब्रह्माकडे लक्ष जाण्यासाठी त्याला ह्या जगाचा कर्ता, धर्ता इत्यादि लक्षणांचा आश्रय घ्यावा लागतो. यालाच शाखाचंद्रन्याय असे म्हणतात. तसेच ब्रह्मस्वरूपाकडे बुद्धि प्रवाहित होण्यासाठी, ब्रह्मापासून भिन्न अशा विषयांपासून मन काढून (अतद्-व्यावृत्ति) ते सद्गुरूपदिष्ट विधिवाक्यांच्या अर्थाकडे प्रवाहित करावे लागते. अशा रीतीनेच असत्त्वावरण व अभानावरण ह्या अज्ञानावरणांचा क्षय होऊन मूळ, शुद्ध, सर्वव्यापी ब्रह्मस्वरूप प्रकट होते. "मावळवीत विश्वाभासु। नवल उदैला चंडांशु।" ही ज्ञानेश्वरमाउलींनी वर्णिलेली अनुभूति येते. अज्ञानाने उगवलेले (भासमान झालेले) हे विश्व आत्मस्वरूपात विरून जाते.

पहिल्या दिगंबराने सूचित केलेले प्रत्यक् ब्रह्म हे अध्यात्ममंदिराचे प्रवेश द्वार आहे, तर ह्या दुसऱ्या दिगंबराने निर्दिष्ट केलेले व्यापक पूर्णब्रह्म ही त्या मंदिराच्या गाभ्यांतील सिंहासनाधिष्ठित मूर्ति आहे. हेच सर्व साधनांचे साध्य आहे. हीच आध्यात्मिक जीवनाची सफलता आहे. प्रत्यक् ब्रह्माच्या अनुभूतीत अहंकार सूक्ष्म वा क्षीण स्वरूपांत शिल्लक असतो. तो इथे पूर्ण नाहीसा होऊन जातो. हीच जीवन्मुक्तावस्था म्हणतात.

संत नामदेवांचे उदाहरण फार उद्बोधक आहे. त्यांच्या भक्तीने, तपस्येने प्रत्यक्ष पांडुरंग त्यांच्याशी बोलत, त्यांचा नैवेद्य ग्रहण करीत. हे प्रत्यक् ब्रह्माचेच उदाहरण आहे. पण इथे पांडुरंग माझा आहे, माझ्याशी बोलतो असा अहंकारही आहे. शिवाय पांडुरंगाला नामरूपाचे परिमाण आहे. त्यामुळेच संतांच्या सभेत गोरोबाकाकांच्या थापटीला हे "मडके" कच्चे लागले. अगदी मुक्ताबाईसारख्या चिमुरडीसह सर्व संतांनी ह्याला दुजोरा दिला. हा अपमान नामदेवरायांना झोंबला. ते कळवळून पांडुरंगाकडे गेले. हे गाऱ्हाणे देवापुढे मांडले. देव तरी संतवचनाच्या कसा विरुद्ध जाणार? मग देवाच्या सांगण्यावरून नामदेव औंढ्या नागनाथला विसोबा खेचरांकडे गेले. विसोबा त्यांना महादेवाच्या पिंडीवर पादत्राणासहित पाय ठेवून बसलेले दिसले. नामदेवांनी त्यांचा निषेध केला तर विसोबांनी आपली अगतिकता प्रकट केली व नामदेवांनाच तो पाय उचलून पिंड नसलेल्या स्थानीं ठेवायला सांगितले ! नामदेवांनी तो पाय उचलून जिथे ठेवावा तिथे तिथे पिंड उगवावी ! ह्या चमत्काराने नामदेवरायांचा उरलासुरला अहंकार गळून पडला, उपाधींचा पूर्ण निरास झाला आणि सर्वव्यापक पूर्ण ब्रह्माचे - दिगंबराचे दर्शन त्यांना झाले.

गुरुकृपेच्या भट्टींत मडके पक्के भाजून निघाले.

हे कांही दुसरे नवे ब्रह्म आले असे नाही. एकच ब्रह्म, ज्यात बुद्ध्यादिक उपाधींच्या मालिन्याने विकार झाल्यासारखा भासत होता, त्याचेच शुद्ध, निष्कल, निर्विकार, स्वसंवेद्य स्वरूप आतां बुद्ध्यादिकांच्या शुद्धीनंतर अनुभवाला येते. अनुभवाला येते हासुद्धां शब्दप्रयोग तोकडा आहे. इतके दिवस आपले जे वेगळेपण जाणवत होते त्याचा निरास होऊन मीच सर्वव्यापी, अविनाशी, अखंडैकरस, आनंदघन, चिद्रूप, अद्वितीय आत्मा आहे असा प्रत्यय म्हणजेच दुसऱ्या दिगंबर पदाचा अर्थ आहे.

## ३. श्रीपादवल्लभ

**श्रीपादवल्लभ नाम प्राप हि नक्रगजेंद्रमिव। द्रौपद्यंबरीषचोर-।**
**द्रौपद्यंबरीषचोरग्रसितद्विजमेव।।३।।**

पहिल्या दिगंबरापासून दुसऱ्या दिगंबरापर्यंतचा हा प्रवास म्हणजेच संपूर्ण आध्यात्मिक साधना आहे. 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चित्', सद्‌गुरुकृपेने या मार्गावर येतो. 'जिये मार्गींचा कापडी। महेशु अजुनी' असे ज्या मार्गाविषयीं संतशिरोमणी ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ज्याविषयी 'नान्यः पथः' असे श्रुतिवचन आहे. ज्या वाटेवर अनेक जन्म चालून मोक्षाचा मुक्काम गांठायचा आहे तो हा मार्ग ! प्रतिप्रसव क्रमाने, अनंत जन्मांत जमविलेल्या संस्कारांना विलीन करण्याचा हा मार्ग. ह्या चांगल्या-वाईट कर्माशयाच्या डोंगरदऱ्यांतून, नानाविध प्रलोभनांच्या आडवाटांना चुकवीत, जन्मजन्मातरांचे टप्पे पार करायला केवढा निश्चय, केवढे धैर्य, केवढी तितिक्षा आणि केवढी चिकाटी लागत असेल याची कल्पना करणेही दुरापास्त आहे. 'जन्मांतरशताभ्यस्ता राम संसारसंततिः। सा चिराभ्यासयोगेन न विना क्षीयते क्वचित्' ही वसिष्ठोक्ति तसेच 'अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्' ही भगवदुक्ति हाच निर्देश करीत आहेत. अशा या प्रवासांत विघ्नबाहुल्य आहेच. ह्या सर्व विघ्नांपासून रक्षण करून साधकाला सुखरूप ध्येयाला पोंचण्यासाठी ईश्वरी शक्तीच समर्थ आहे. ही ईश्वरी शक्तीच **श्री** ! ही श्री ज्याच्या पायांची दासी आहे, म्हणजेच जो सर्वैश्वर्यसंपन्न आहे, आणि सर्व साधक-भक्तांना वल्लभ म्हणजेच प्रिय आहे. असे हे नांव ज्याला प्राप्त झाले तो **श्रीपादवल्लभ**. नांव हे गुणांवरूनच पडते. म्हणजेच आतांपर्यंत आपण ध्येय म्हणून समोर ठेवलेले जे निर्गुण निराकार ब्रह्म पाहिले त्यापेक्षां वेगळे असे हे सगुण ब्रह्म आहे.

याखेरीज श्रीपादवल्लभ याचा विशिष्ट अर्थही अभिप्रेत आहेच. पीठापूर येथे, श्राद्धाच्या दिवशी, ब्राह्मण जेवायच्या आधी, अतिथिवेषाने दारी आलेल्या दत्तप्रभूंना, ईश्वरबुद्धीने भिक्षा घालणाऱ्या, सुमति नांवाच्या ब्राह्मणीवर प्रसन्न होऊन तिच्या कुशीत अवतरलेल्या दत्तप्रभूंचे हे नांव! भगवंताच्या सर्व अवतारांचे प्रयोजन, "परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्" हेच असते. हा कलियुगांतील पहिला दत्तावतार होय. स्वभक्तांचे रक्षण व पालन करण्याचे हे कार्य विशद करण्यासाठी **नक्रगजेंद्रमिव** म्हटले आहे. गजेंद्रमोक्षाची भागवत पुराणांतील कथा प्रसिद्ध आहे. महाबलाढ्य मकराने गजेंद्राचा पाय धरला. त्याचे व त्याच्या सोबतच्या सर्व परिवाराचे सामर्थ्य तोकडे पडले. अशा वेळी गजेंद्राने अगतिकतेने विश्वव्यापी परमेश्वराचा धांवा केला. ह्या विश्वाला धारण करणारा, सर्वांच्या बुद्धीत राहून त्यांना प्रेरणा देणारा, सर्वांचा रक्षक असा जो कोणी परमेश्वर त्याने करुणा करून मला प्राणदान द्यावे अशा अर्थाची प्रार्थना केली आहे. ॐ नमो भगवते तस्मै यत एतच्चिदात्मकम्। पुरुषायादिबीजाय परेशायाभिधीमहि।।२।। यस्मिन्निदं यतश्चेदं येनेदं च इदं स्वयम्। योऽस्मात्परस्माच्च परस्तं प्रपद्ये स्वयम्भुवम्।।३।।(श्रीमद्भागवत-८।३) तो गजेंद्र पूर्वजन्मीचा शापित इंद्रद्युम्न नांवाचा राजा होता. त्या जन्मातील पूर्वाभ्यासामुळे (प्राग्जन्मन्यनुशिक्षितम्) हे सगुण पण निराकार परमात्म्याचे स्वरूप जाणून त्याचे त्याने आवाहन केले. भगवंतानी तो धावा ऐकून त्याला तत्परतेने येऊन सोडविले अशी कथा आहे. त्याचे कोणतेही नांवसुद्धां गजेंद्राने घेतले नाही. याचाच अर्थ असा की परमेश्वरच आपला संरक्षक आहे, तो सर्वव्यापी असून अनन्यतेने हांकेला 'ओ' देतोच आणि तो सर्वशक्तिसंपन्न असल्याने सर्व संकटांतून आपली सुटका करतो हा भावच प्रमुख आहे. हेच श्रीपादवल्लभ या नांवाचे गमक आहे, अगदी मानवेतर प्राण्यांनासुद्धां अशा श्रेष्ठ भावाने देवाची प्राप्ति होऊं शकते. हेच श्रीस्वामीमहाराजांना इथे सांगायचे आहे.

हाच अर्थ आणखी स्पष्ट करण्यासाठी **द्रौपदी** आणि **अंबरीष** यांची उदहरणे दिली आहेत. द्यूतांत पतीने पणाला लावून गमावलेली ही महान् साध्वी, दुःशासनाने एकवस्त्रा अवस्थेत, केसांना धरून दरबारांत फरपटत आणली. महान् पराक्रमी पण हतबल झालेले पांच पती, अर्थाच्या दास्याचे पौरुष प्रतिपादणारे भीष्मादिक आणि तिच्या लज्जेचे हरण करण्याला आतुरलेले कौरव पाहून, त्या अगतिक, असहाय पतिव्रतेने अनन्यशरण श्रीकृष्णाचाच धांवा केला; "कृष्ष कृष्ण महायोगिन् विश्वात्मन् विश्वभावन। प्रपन्नां पाहि गोविन्द कुरुमध्येऽवसीदतीम्।। (महाभारत, सभापर्व ६७।४४)". आणि त्या हाकेला तो

अंबरावतार घेऊन धांवून आला. ही कथा सर्वपरिचित आहे. तशीच अंबरीष राजाची कथा आहे. ह्या महान् विष्णुभक्ताचा दुर्वासमुनींनी केलेला छळही प्रसिद्ध आहे. व्रताच्या सांगतेसाठी, स्नानाला जाऊन मुद्दाम उशीर करणाऱ्या दुर्वासांची प्रतीक्षा करतांना व्रतभंग टाळण्यासाठी पळीभर तीर्थ प्राशन करणाऱ्या अंबरीषाला दुर्वासमुनींनी आपल्याला आमंत्रण दिले असतांना सोडून जेवल्याबद्दल शाप दिला. तेव्हां तत्काळ तिथे प्रकट होऊन भगवान् विष्णूंनी तो शाप स्वतः स्वीकारला व भक्ताचे रक्षण केले.

श्रीमद्भागवत व महाभारत यांतील प्रतिपादित सगुण भक्तीचे दृष्टांत दिल्यावर '**चोरग्रसितद्विज**' हा गुरुचरित्रांतला दृष्टांत श्रीस्वामीमहाराजानी दिला आहे. श्रीपादवल्लभ कृष्णेच्या गुरुगड्डी या बेटांतून अदृश्य झाल्यावरही त्यांच्या भक्तांच्या हांकेला ते धांवून येतात यासंबंधींचे हे उदाहरण सरस्वती गंगाधरांनी दिले आहे. ब्राह्मणकर्माला आवश्यक ती बुद्धीची तीव्रता नसल्याने एक ब्राह्मण उपजीविकेसाठी व्यापार-उदीम करत होता. तो श्रीपादवल्लभांचा भक्त होता. एकदा व्यापाराला बाहेर पडतांना त्याने असा नवस केला की जर मला या खेपेला नेहमापेक्षां अधिक फायदा झाला तर कुरुगड्डीला जाऊन लाभाच्या प्रमाणांत ब्राह्मणभोजन करीन. आणि तो नवस फळला. त्याला नेहमीपेक्षा अनेक पटींनी लाभ झाला. तेव्हां नवस फेडण्यासाठी तो ब्राह्मण, बरोबर पुरेसे पैसे घेऊन कुरुगड्डीला जायला निघाला. वाटेत कांही ठकांनी आपणही श्रीपादवल्लभांचे भक्त असून तिकडेच जात आहो असे सांगून त्याचा विश्वास संपादन केला. एका निर्जन स्थानी त्या चोरांनी त्याचा शिरच्छेद केला. तेव्हां भक्तरक्षणतत्पर श्रीपादवल्लभ तेथे शूलधारी वेषांत प्रकटले व त्यांनी त्या चोरांचा निःपात केला. त्यांच्यापैकी एकजण मात्र त्यांना शरण गेला व आपण यांच्यापैकी नाही असे सांगून त्याने जीवदान मागितले. त्याचे निष्कपट अंतःकरण जाणून श्रीपादवल्लभांनी त्याला अभय दिले आणि त्या ब्राह्मणाचे शिर धडाला जोडून आपण दिलेले भस्म त्या ठिकाणी लावायला सांगितले. तसे करतांच तो ब्राह्मण झोंपेतून उठावे तसा उठून बसला. मरून पडलेले चोर पाहून 'हा प्रकार काय आहे?' असे त्याने विचारले. तेव्हा त्या जीवदान मिळालेल्या वाटसरूने सर्व वृत्त सांगितले व 'तुझ्या भक्तीमुळे श्रीपादवल्लभांनीच तुझे रक्षण केले' असे सांगितले. तेव्हां त्या ब्राह्मणाचे हृदय कृतज्ञतेने भरून आले. भक्तीने त्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले आणि 'महाराज ! माझ्यासाठी एवढे कष्ट करून आपण चोरांना दिसलां पण मला मात्र आपल्या दर्शनापासून वंचित ठेवले' असा शोक करून तो पुढे कुरुगड्डीला

गेला व तेथे सहस्त्रब्राह्मणभोजनाचा आपला संकल्प त्याने पूर्ण केला. अशी ही गोष्ट आहे.

या सर्वहि कथांचे सार हेच आहे की परमेश्वराचे अनन्य चिंतन करणाऱ्यांचा योगक्षेम चालविण्यासाठी तो सर्वव्यापी, सर्वशक्तिमान, सर्वैश्वर्यसंपन्न प्रभू सगुण रूपे धारण करतो. "अनन्यांश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्।।". योग म्हणजे नवी संपत्ती जोडणे, क्षेम म्हणजे असलेल्या संपत्तीचे रक्षण करणे. परमार्थमार्गात ही मुख्यतः दैवी संपत्ती आहे. लौकिक योगक्षेमही ईश्वराधीनच आहे. परंतु आपल्या भक्ताकडे त्याचे विशेष लक्ष असते व त्यांतही भक्तांच्या आध्यात्मिक योगक्षेमाविषयी सदैव तत्पर असतो. जन्मजन्मांच्या या वाटचालींत आपला कोणी खात्रीचा संरक्षक असेल तर तो एक परमेश्वरच होय.

वर सांगितलेली उदाहरणे सकृद्दृष्ट्या लौकिक संकटांची आहेत. परमार्थातील विघ्ने यापेक्षां सूक्ष्म व दुर्जय असतात. त्यांच्यापासून संरक्षण होण्यासाठी परमेश्वरी कृपाच आवश्यक आहे. पतंजलींनी या योगमार्गातील विघ्नांचा एका सूत्रांत निर्देश केला आहे. "व्याधि-स्त्यान-संशय-प्रमादालस्याविरति-भ्रांतिदर्शनालब्धभूमित्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः।। (समाधिपाद-३०)". व्याधि म्हणजे शारीरिक विकार, स्त्यान, मानसिक जडता, संशय, साधनेविषयी निरुत्साह, विषयासक्ति, भ्रम, साधनेत प्राप्त केलेल्या अवस्थेची पुनः प्राप्ति न होणे, किंवा प्राप्त भूमिकेपासून स्खलन होणे इत्यादि चित्तविक्षेप योगांत अडथळे आणतात असा याचा भावार्थ आहे. ह्या सर्व विघ्नांचा अभाव परमेश्वराच्या नामस्मरणाने होतो असेही महर्षि पतंजलींचे एक सूत्र आहे.

आध्यात्मिक साधनमार्गातील आणखीही अनेक ठिकाणी वर्णने आली आहेत. श्रीस्वामीमहाराजांनी दत्तमाहात्म्यांत व दत्तपुराणांत यांचे सविस्तर वर्णन केले आहे. विशिष्ट विघ्नांवर विशिष्ट उपायांचे वर्णन असले तरी या सर्वांवर दृढ भक्ति हाच सामान्य आणि सर्वमान्य उपाय बहुतेक ठिकाणी प्रतिपादला आहे.

भागवतपुराणांतील कथांची सांगड गुरुचरित्राशी घालण्यात श्रीस्वामीमहाराजांचा आणखी एक अभिप्राय असावा. श्रीदत्तसंप्रदायाचे भागवतसंप्रदायाशी असलेले निकटचे नाते त्यांना स्पष्ट करावयाचे असावे.

इतकेच नव्हे तर श्रीदत्तसंप्रदाय हा भागवतसंप्रदायांतर्गत आहे अशी श्रीस्वामीमहाराजांची धारणा होती. आपल्या भक्ताला लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात, "श्रीदत्तात्रेयोपासना हा भागवत संप्रदाय आहे. हा विष्णूचे २४ अवतारांपैकी सहावा आहे. हे भागवत १ व २ स्कंधा(त) असून ४ स्कंधारंभी जन्म आहे." ... "श्रीदत्तात्रेयावधूत भागवत सांप्रदाय तर वेदोक्त आहे. पाहिजे तर याचे उपनिषद मिळेल." गजेंद्राच्या नामरूपातीत हांकेला ओ देणारा, द्रौपदाच्या अनन्य करुणेने द्रवणारा आणि अंबरीषाच्या हांकेचीही वाट न पाहतां प्रकटणाऱ्या भगवंताचेच नांव इथे श्रीपादवल्लभ आहे. त्यानेच चोरांनी ठार केलेल्या भक्ताचे संजीवन केले. मोक्षाच्या वाटेत कामक्रोधादिक हे चोर वाटमारी करतात. साधकाची दैवी संपत्ती लुटतात. ह्या चोरांपासून होणाऱ्या प्रमादरूपी मृत्यूपासून तोच श्रीपादवल्लभ संजीवन करतो. त्याचीच सर्व साधक-भक्तांनी कांस धरावी. हा या चरणाचा भावार्थ आहे.

## ४. सद्गुरु.

**दिगंबरा गुरु वासुदेव दत्तस्त्वं ब्रह्म। कामक्रोधग्रसितं मां लभ।।**
**कामक्रोधग्रसितं मां लभ सदैव झटिति वह।।४।।**
**दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा।।**

हा दिगंबर म्हणजेच सगुण ब्रह्म पूर्णब्रह्माचाच मानवसुलभ आविष्कार आहे. तरीही ह्याचा लाभ सहजासहजी होत नाही. हा समोर येऊन उभा राहिला तरी दृष्टीगोचर होत नाही. अर्जुनाला आपले विश्वरूप दाखविण्यासाठी भगवंतांनी दिव्यदृष्टी प्रदान केली होती. मगच त्याला श्रीकृष्णाचे ऐश्वर्य समजले. तोपर्यंत नित्य सहवासांत राहून, त्याच्याबरोबर गाढ मैत्री करूनही त्याच्या महत्तेचा अर्जुनाला गंधही नव्हता ! यावरून हे स्पष्ट होते की सगुण ब्रह्माचे दर्शन होण्यासाठी त्याचीच कृपा व्हावी लागते. ही कृपा करणारा, दिव्य दृष्टी देणारा जो ईश्वराचा आविष्कार आहे त्यालाच सद्गुरु असे म्हणतात. सद्गुरु हे मानवरूपच धारण करणारे असतात. त्यामुळे त्यांच्याशी संपर्क सहज होतो. 'संतचरणरज लागतां सहज' असे संतश्रेष्ठ तुकाराम महाराज म्हणतात. संतांचा संग झाला की लगेच पापक्षयाला सुरुवात होते. त्या संगतीच्या प्रभावानेच क्रमशः कर्मसाम्यदशा येते. मग ते संतच सद्गुरु होतात किंवा सद्गुरु "आपैसे" भेटतात. पहिल्या दिगंबराची येथे भेट होते. प्रत्यग्ब्रह्माची गांठ पडते आणि मुमुक्षूचा साधक होतो. 'आत्मानुभववाटे'चा 'पांथिक योगी' होतो. (जेणे पाहालिया पाहांटे। भेदाची चोरळी फिटे। रिगती आत्मानुभववाटे। पांथिक

योगी।। ज्ञानेश्वरी १६।७) मोक्षमार्गाला प्रवृत्त करणारा, आत्मानुभूतीचा अधिकार प्राप्त करून देणारा आणि प्रत्यक्ष आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून देणारा सद्गुरु होय.

ह्याच सद्गुरुस्वरूपाचे वर्णन ह्या चरणांत श्रीस्वामीमहाराजांनी केले आहे. येथे दिगंबराचा अर्थ **वासुदेव** आहे. वस म्हणजे आच्छादन. दिक् म्हणजे सर्व विश्व हेच ज्याचे पांघरूण (अंबर) आहे; आणि ह्या वस्त्राने तो स्वयंप्रकाश परमात्मा स्वतःला आच्छादित करतो हा अभिप्राय. त्याने स्वतःला झांकून घेतल्याने, म्हणजेच त्याच्या अज्ञानानेच ही सृष्टी झाली."**नौम्युदेति यदज्ञानाज्जगद्रज्ज्वहिवत्पुनः। यत्तत्त्वं मीलति ज्ञानां तं चिदानंदसद्गुरुम्।।** (द्विसाहस्त्री १।१)". ज्याच्या अज्ञानाने, दोरीच्या ठिकाणी दिसणाऱ्या सर्पाप्रमाणे हे नामरूपात्मक जग उगवते आणि ज्ञानी लोकांना ते पुनः प्राप्त होते, त्या चैतन्यमय सुखरूप सद्गुरूंना नमस्कार असो). म्हणजेच ते अज्ञानाचे आवरण दूर करणारा सद्गुरूही तोच आहे. 'मावळवीत विश्वाभासु। नवल उदैला चंडांशु।' असे विरोधाभासात्मक वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीही केले आहे. सद्गुरुपीठाचे अधिष्ठान असलेले भगवान दत्तप्रभू यांच्या ठायी सगुणब्रह्म आणि गुरुतत्त्व यांचे ऐकात्म्य सिद्धच आहे. अत्रिऋषींच्या तपपूर्वक आवाहनाने ब्रह्मा विष्णु आणि महेश हे तिघेही त्यांच्यासमक्ष उपस्थित झाले तेव्हां अत्रींनी विचारले

**एक एव मया ध्यातो यूयं त्रय इहागताः। किमर्थमिति भातीदं चित्रं हृद्वागगोचराः।।**(षोडशावतारचरित्राणि-२।१२). मी एकाच परमात्म्याचे ध्यान करीत असतां आपण तिघे इथे कशासाठी आला? मन आणि वाचेला न गवसणाऱ्या ईश्वरांनो ह्याचे मला नवल वाटते. तेव्हां 'आम्ही सृष्टिस्थितिविनाशांच्या प्रयोजनांनी त्रिविध रूपे धारण केल्यासारखे दिसत असलो तरी परमार्थतः आम्ही एकच आहोत' असे म्हणून, आपले षड्भुज रूप धारण करून **अत्रिवरद** या नांवाने दत्तप्रभू त्या महर्षींच्या समोर उपस्थित झाले. पतंजलींनी ज्याला क्लेश-कर्मविपाकाशयांनी अपरामृष्ट (अस्पृष्ट) पुरुष म्हटले आहे तोच हा ईश्वर होय. हाच 'पूर्वेषाणामपि गुरुः' पूर्वीच्याही ऋषींचा गुरु आहे असे पतंजलींचे सूत्र आहे. योगेश्वर श्रीकृष्णही गीतेच्या चौथ्या अध्यायाच्या आरंभी सांगतात 'इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्।' या सर्व प्रमाणांवरून हे स्पष्ट आहे की गुरु हा कांही व्यक्तिविशेष नसून ते एक ईश्वराभिन्न तत्त्व आहे. याच आशयाने गुरुगीतेत ईश्वराने पार्वतीला सांगितले आहे की सद्गुरूंना

तीन नेत्र नसले ते तरी सर्वसाक्षी शिव, चार बाहू नसूनही ते अच्युत नारायण आणि चार मुखे नसली तरी ते सृष्टिकर्ता ब्रह्मा आहेत. अत्रिनेत्रः सर्वसाक्षी अचतुर्भुज अच्युतः। अचतुर्वदनो ब्रह्मा सद्‌गुरुः कथितः प्रिये।।. समर्थ रामदासस्वामी तर याहूनही पुढे जाऊन म्हणतात, "हरीहरब्रह्मादिक। नाश पावती सकळिक। सर्वदा अविनाश एक। सद्‌गुरुपद।।" या अर्थानेच स्वामी महाराज म्हणतात ***दत्त त्वं ब्रह्म.*** सद्‌गुरो दत्तात्रेया, आपणच ब्रह्म आहांत.

हा सद्‌गुरुतत्त्वाचा अधिष्ठानभूत असा दत्तावतार हा नित्य अवतार आहे. कारण ह्या अवताराचे मुमुक्षूंवर अनुग्रह करण्याचे कार्य कधीच न संपणारे आहे. दत्तगुरु सदैव शिष्यानुग्रहासाठी जागत आहेत. जिथे जिथे त्रिगुणात्मक मायेला ओलांडून जीव, अनसूया म्हणजे द्वैतवर्जित बुद्धीचा अंगीकार करतो तिथे तिथे श्रीदत्तगुरूंचा आविष्कार होतो. हे आत्मक्रीड, आत्मरत शांत, महांत संत, वसंताप्रमाणे लोकहिताचे सहज आचरण करतात असे विवेकचूडामणीत भगवत्पूज्यपाद शंकराचार्यांचे वचन आहे. (शांता महांता निवसन्ति संताः। वसंतवल्लोकहितं चरन्ति।।). मायेला निःशेष धुवून ते अवधूत संज्ञेला प्राप्त होतात. समर्थ रामदासस्वामी म्हणतात "धर्मसंस्थापनेचे नर। ते ते ईश्वरी अवतार। झाले आहेत होणार। देणे देवाचे।।"

सगुण आणि निर्गुण ब्रह्मापेक्षांही एक महत्त्वाचा विशेष सद्‌गुरूंचा आहे. सद्‌गुरु मायारूपी महानदीत बुडणाऱ्या, कामक्रोधादि सुसरींनी ग्रस्त जीवांची आर्त याचना ऐकून त्या नदींत उडी घालून त्याला वर काढतात. त्याचा उद्धार करतात. मानवरूप धारण करून, मानवी जीवन स्वीकारून, मानवी मर्यादांचा अंगीकार करून शिष्याची जवळीक करतात. त्याच्या सुखदुःखांत समरस झाल्यासारखे दाखवतात. प्रसंगीं त्याच्या सांसारिक त्रुटीहि दूर करतात. त्याच्या धर्मानुकूल कामनाही पुरवतात. पण ह्या सर्व चमत्कृतींचे मुख्य उद्दिष्ट असते ते त्या जीवाला कामक्रोधांच्या जबड्यांतून काढून त्याचे मन अंतर्मुख करण्याचे! अनेक प्रयत्नांनी शिष्याचे मन विषयांकडून मुरडून सद्‌गुरु ईश्वरभजनाकडे वळवतात. त्याच्या दैवी संपत्तीची जोपासना करतात. लाभाविण प्रीति करणारे हे अकारण कारुण्य हेच सद्‌गुरूंचे व्यवच्छेदक लक्षण आहे. यासाठी शेवटी प्रार्थना केली आहे ***कामक्रोधग्रसितं मां लभ .***

अशा रीतीने शिष्याला परमार्थप्रवण केल्यावर सद्‌गुरु त्याला त्याच्या

अंतरांतील चैतन्याची ओळख करून देतात. हाच प्रत्यगात्मा - आपल्या महामंत्रांतील पहिला दिगंबर होय. ह्यालाच शक्तिपात असेही नांव आहे. याच दिगंबराचा विकास करीत त्याचे परमात्मरूपाशी, महामंत्राच्या दुसऱ्या पदांतील दिगंबराशी, पर्यायाने आपल्याशींच ऐक्य करतात. हे ऐक्य झाले की तो शिष्यच सद्‌गुरुस्वरूप होतो. आपणांसारिखे करिती तात्काळ (संत तुकाराम). ह्या जन्मजन्मांतराच्या साधनमार्गावर आपल्या राजस वैष्णवबाळाचे संगोपन करण्यासाठी तेच सगुणरूप श्रीपादवल्लभ होतात. पदोपदी त्याला सांभाळतात. असा हा सद्‌गुरुराज आम्हांला सदैव शीघ्र लाभो. हीच शेवटच्या चरणांत प्रार्थना केली आहे.

श्रीगुरुः शरणम्।

# श्रीस्वामीमहाराजांच्या जीवनांतील प्रमुख घटनांचा आलेख

**साल स्थल घटना, ग्रंथनिर्मिती**

**१८५४** माणगांव जन्म, आनंद नाम संवत्सर, श्रावण कृ।।५, रविवार

**१८६२** माणगांव व्रतबंध, अध्ययन

**१८७५** माणगांव विवाह, स्मार्ताग्नि-उपासना, गायत्री पुरश्चरण, वय २१ वर्षें ज्योतिष्य अभ्यास

**१८७७** माणगांव पितृछत्र मिटलें (वे.मू.गणेशभटजींचा मृत्यू ) वय २३ वर्षें

**१८८३** माणगांव श्रीदत्तमंदिराची निर्मिति व वैशाख शु।।५ ला मूर्तीची स्थापना. वय २९ वर्षें

**१८८९** **श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्त्री)** ची रचना, माणगांव माणगांवचा सहकुटुंब त्याग व वाडीस आगमन कोल्हापूर-भिलवडी-औदुंबर-पंढरपूर-बार्शी मार्गें-

**१८९१** **गंगाखेड** वै.व।।१४ पत्नीचा मृत्यू व १४व्या दिवशीं (वय ३५) वर्षें **संन्यासग्रहण** (ज्ये.शु।।१३).वाशीम-उमरखेड-माहूर -खांडवा-बढवाई-मंडलेश्वर-बलवाडा मार्गें **उज्जैनी** प.प.श्रीनारायणानंदसरस्वतींक्रडून **दंडग्रहण** व १ला चातुर्मास. महत्पूर-सारंगपूर-बजरंगगड-पिछौरा- खरेरा-जालवण

**१८९२** **ब्रह्मावर्त** आठ महिने मुक्काम, २रा चातुर्मास, **श्रीदत्तपुराणाची रचना**, रचना, गोकुळ, वृंदावन, मथुरा मार्गें

**१८९३** **हरिद्वार** येथें चातुर्मासापूर्वी आगमन, शारदापीठाधीश्वर श्रीशंकराचार्य श्रीराजराजेश्वरस्वामी यांच्या आग्रहाने त्यांना उपनिषद्भाष्य ऐकवण्यासाठी सहवासांत चातुर्मास.

**१८९४-९५** **हिमालय** बदरीनारायणाची यात्रा व नरनारायणांचें दर्शन. दोन वर्षांपेक्षां अधिक अज्ञातवास. हरिद्वारला परतून

**१८९६** **जालवण** येथें सहावा चातुर्मास करून ब्रह्मावर्त-महत्पूर-ब्रह्माणी मार्गें नेमावरला नर्मदास्नान व नर्मदेचें दर्शन. नर्मदालहरीची रचना. ॐकारेश्वर-मंडलेश्वर-महेश्वर मार्गें

**१८९७** **पेटलाद** येथें सातवा चातुर्मास. **श्रीदत्तलीलामृताब्धिसार** या ग्रंथाची रचना. तेथून चिखलदा येथें दीपावलीस श्रीदत्तप्रभूंचा अभ्यंगस्नानाचा हट्ट पुरवून -

१८९८ **तिलकवाडा** येथें चातुर्मासापूर्वी दोन महिने आगमन. आठवा चातुर्मास. प्लेगची साथ रेवाखंडावर पुराण व तेलुगु लिपींतील **कूर्मपुराणाचें देवनागरींत लिप्यंतर**. चातुर्मास-समाप्तीनंतर मणिनागेश्वर-कुंभेश्वर-गंगानाथमहादेव-कर्णाळी-चांदोद-व्यास-शुकमुनि करून बरकाळच्या अत्रि-आश्रमांत आगमन, **अनसूयास्तोत्र** शिनोर येथें श्री. रामचंद्रशास्त्री प्रकाशकर व श्री.गांडाबुवा यांच्या भेटी. गिरनार-प्रभास पट्टण-सोरटीसोमनाथ- प्राचीक्षेत्र-पोरबंदर करून

१८९९ **श्रीक्षेत्र द्वारका** येथें ९वा चातुर्मास. ग्रंथ जवळ नसतां प्रभासक्षेत्रीं आरंभ केलेली **द्विसाहस्त्रीवरील टीका** येथें पूर्ण. **चूर्णिका**हि झाली. समाप्तीनंतर, राजकोट-बढवाण-विरमगांव मार्गें सिद्धपूर (मातृगया) हाटकेश्वर मंदिरांत दत्तजयंति. **श्रीदत्तपुराणावर टीका**. डाकोरमार्गें पुनः शिनोर. जागलावर कृपा. ज्येष्ठाच्या आरंभीं -

१९०० **चिखलदा** येथें येऊन ९वा चातुर्मास. माघमाहात्म्य या ग्रंथाची रचना. समाप्तीनंतर मंडलेश्वर. श्री.गणेशपंत सातावळेकर व श्री.सखारामशास्त्री टिल्लू यांना मार्गदर्शन. तेथून इंदोर येथें १८ दिवस गायत्रीभाष्य सांगून उज्जैनीस श्रीगुरुस्वामींची शुश्रूषा करून वैशाखांत

१९०१ **महत्पूर** येथें आगमन. तेथेंच दहावा चातुर्मास. सहा महिने मुक्काम.**श्रीदत्तमाहात्म्य** व **त्रिशति गुरुचरित्र** या ग्रंथांची रचना. डॉ.विश्वनाथराव ताटके याचा हाड्याव्रण(कर्क रोग?) बरा केला. श्रीगांडाबुवांचें जिह्वाछेदन डॉ.ताटके यांच्याकरवीं करून त्यांच्या खेचरीची सिद्धि. तेथून सारंगपूरमार्गें भेलसा येथें श्री.गोविंद पंडित यांना योगाचें शिक्षण. तेथून जालवणमार्गें चैत्रांत -

**ब्रह्मावर्त** येथें तिसयांदा आगमन.तेथें पूर्वाश्रमींचे बंधू श्री.सीतारामपंत यांची भेट. बंधूंना गायत्रीपुरश्चरणास बसविलें. ते त्यासाठीं तेथें २।। वर्षें
१९०२- मुक्काम. प्लेगची बाधा. गुरुचरित्राचें संस्कृत भाषांतर **समश्लोकी**
१९०४ **गुरुचरित्र** व **लघुमननसार** या ग्रंथांची रचना. काशीच्या श्रीशांताश्रम स्वामींचें आगमन. **सप्तशतिगुरुचरित्रसार**. चौदाव्या चातुर्मासांत मौन. समाप्तीनंतर यमुनातीरानें काल्पी-जालवण-पिछोरामार्गें वेत्रवतीतीरावर भेलसा येथें श्रीदीक्षितस्वामींची भेट. तेथून हुशंगाबादवरून -

१९०५ **श्रीक्षेत्रनृसिंहवाडी** येथें आगमन. फाल्गुन शु।।२ शनिवारीं सकाळीं १० वाजतां वाडींत ४८ दिवस मुक्काम. श्रीदीक्षित स्वामी(श्रीनृसिंहसरस्वती)महाराजांना दंड दिला. वाडींत वेदपाठशाळेची स्थापना,श्रीधुंडिराज कवीश्वर अध्यापक. चैत्र व।।३० ला श्रीनारायणस्वामींची पुण्यतिथि झाल्या वर वाडीकरांचा निरोप घेऊन व

शिरोळ व मिरज कृष्णाघाट येथें प्रत्येकीं ३ दिवसांचा मुक्काम करून पंढरपूर-कमळापूर-अक्कलकोट मार्गें गाणगापूरला जातांना श्रीकृष्णामाईंचें साक्षात् दर्शन व **श्रीकृष्णालहरी** स्तोत्राची (५१ श्लोक) उत्स्फूर्त रचना. गाणगापूरीं पापविनाशी तीर्थावर ३ दिवस मुक्काम व दृष्टांताप्रमाणें संगमावर गमन व श्रीदत्तप्रभूंचें साक्षात् दर्शन. तुकाराम नामक दत्तभक्तांस दर्शन व त्याच्यासाठीं **श्रीगुरुस्तुति** या स्तोत्राची रचना. तीन दिवसांच्या मुक्कामानंतर हुमणाबादमार्गेंगंगाखेड येथें दशहरा.परळीवैजनाथ-माहूर-औंढ्यानागनाथ-येवलें-हिंगोली-पांगरी मार्गें

**१९०५** **नरसी** गांवीं कयाधू नदीच्या कांठीं चातुर्मास. **दत्तचंपू** या ग्रंथाची रचना. वाडीच्या पुजाऱ्यांवरील देवांचा रोष शमविण्यासाठीं **करुणात्रिपदी**. गोटेगांव-वाशीम मार्गें **श्रीक्षेत्र कारंजें** येथें मारुतीच्या देवळांत मुक्काम. पुढें अमरावतीस जगदंबेचें दर्शन करून मूळ तापीस संग्रहणीचा त्रास वाढल्यानें महि नाभर दत्तमंदिरांत मुक्काम. दिवाळीनंतर चित्रकूट वरून पयस्विनी-मंदाकिनी संगमावर स्नान करून मार्गशीर्षांत हुशंगाबादमार्गें भेलसा येथें दत्तजयंति. तेथून वेत्रवतीकांठीं बासोदा-मुगावली-जालवण मार्गें ब्रह्मावर्त. तेथून फाल्गुन अखेर निघून प्रयाग मार्गें काशीच्या तारकमठांत ३ दिवस मुक्काम. तिथें वाडीला जाण्याच्या देवांच्या आज्ञेनें एकदम अदृश्य होऊन प्रयागला प्रकट. तेथून ब्रह्मावर्त-जालवण -सिप्री-गुणाछावणी-सारंगपूर-इंदोर-बलवाडा येथें इंदोरचे सखारामशास्त्री यांच्याकडून तीन चुली मांडून भिक्षा. तेथून ॐकारेश्वर मार्गें इंदोर संस्थानांत नर्मदाकिनारीं -

**१९०६** **बढवाई** येथें खेडेघाटी धर्मशाळेंत १६वा चातुर्मास. श्रीगांडामहाराज-श्रीसीतारामहाराजप्रमुख भारतभरांतून भक्तजनांची गर्दी. योग, वेदांत आदींचें शिक्षण. सत्तु-ताक-फळें एवढाच आहार. भक्तांना मात्र रोज पक्वान्नें. मोठमोठ्या पंक्ती. सनावदहून पुढें जंगलांतून एकट्यानें एक महिन्याचा प्रवास. महिन्यांत फक्त तीनच वेळां भिक्षा (जेवण). बाकी जलाहार. पंढरपू रला आगमन. पंढरपूर ते वाडी (८०-९०मैल) एक दिवसांत -

**(आश्विन व।।६). श्रीनृसिंहवाडीला** ब्रह्मानंदमठांत दोन महिने मुक्काम. वाडींत गुरुद्वादशीचा उत्सव व कार्तिक पौर्णिमेचें वनभोजन. मार्गशीर्ष कृ।।७ला देवाच्या आज्ञेनें अचानक वाडीहून कुरुंदवाडला प्रयाण व घाटावर मुक्काम. दुसया दिवशीं कुरुंदवाड संस्थानाच्या राजेसाहेबांकडे(श्रीमंत (बाळासाहेब )भिक्षा व श्रीदत्तप्रभूंच्या फुलबागेंत

मुक्काम. तेथून तेरवाड-सदलगे-मलिकवाड-संकेश्वर-बेळगांव-शृंगार पूर-केंगेरी मार्गें गुर्लहोसूर येथें स्वामी कैलासाश्रम यांच्या आग्रहानें ८-१० दिवस मुक्काम. तेथून घटप्रभा, विश्वामित्री नद्यांच्या कांठानें जात तुंगभद्रातीरीं हंपी येथें श्रीविद्यारण्य स्वामींच्या मठांत मुक्काम. पुढें ऋष्यमूक पर्वत-किष्किंधा करून शेषाचल पर्वतावर श्रीकार्तिकस्वामींचें दर्शन. **द्व्यर्थी षडाननस्तोत्र** व **कुमारशिक्षा** यांची रचना. तिथून बाहुदा, करतोया या नद्यांच्या तीरावरून भार्गवक्षेत्र, पूढें श्रीरंग-श्रीशैल्यमल्लिकार्जुन करून श्रीतिरुमलावर श्रीव्यंकटेशाचें स्पर्शपूर्वकदर्शन. पुढें कालहस्ती-शिवकांची-विष्णुकांची -पक्षीतीर्थ करून चैत्री पौर्णिमेला पिनाकिनीच्या तीरावर क्षौर व स्नान. स्नानाच्या वेळीं बुडी मारण्याइतकेंहि पाणी नसतांना एकदम छातीएवढें पाणी आलें. पुढें चिदंबरक्षेत्रा वरून मायावरमला आल्यावर स्वामींच्या मृत्यूच्या अफवेनें महाराजांना शोधत आलेल्या वाडीच्या मंडळींची भेट. त्याचें समाधान करून त्याना पाठवून तंजावर-श्वेतारण्य-कुंभको णम्-मदुरामीनाक्षी करून तंजावरजवळ कावेरी (वेणू) तीरावर -

१९०७ **संध्यामठ तंजावर** येथें १७वा चातुर्मास. **गुरुसंहिता (समश्लोकी गुरुचरित्र) चूर्णिका** येथें झाली. **कृष्णालहरीवर संस्कृत टीका**. समाप्तीनंतर, सत्यमंगल जंबुकेश्वर-कोटीलिंग करून श्रीरंगम् येथें शृंगेरीपीठाच्या शंकराचार्यांचें दर्शन व त्यांच्याकडून गौरव. तेथून भवानी मार्गें करूर स्टेशनवरून नेलोर येथें **श्रीसदाशिवब्रह्मेंद्रच्या स्वामींच्या समाधीचें दर्शन व स्तोत्र**. तंजावरला परत येऊन अवधूतराव याच्याकडे दत्तजयंतीचा उत्सव करून अमरावती, चिदंबर, त्रिपुर, कालहस्ती मार्गानें श्रीशैल्याच्या पायथ्याशीं. तेथून कृष्णातटाकानें कोटिलिंगाचें दर्शन करून कृष्णा जिल्ह्यांत, नंदीगड तालुक्यांत कृष्णाकाठीं -

१९०८ **मुक्तेश्वरपूर** म्हणजेच मुक्त्याला येथें १८ वा चातुर्मास. **युवाशिक्षा, वृद्धशिक्षा, स्त्रीशिक्षा** या ग्रंथांची निर्मिति. चातुर्मासानंतर नागेश, हंसलादेवी, कृष्णासागर, पेडकल्लापल्ली या सप्तगोदावरीच्या स्थानास येऊन गोदावरीची स्तुति केली. तेथून गोदातीरीं बेदवाडपल्ली येथें दत्तजयंति साजरी करून कोगूर, पालर **राजमहेंद्री मार्गें पीठापूर** या श्रीपादश्रीवल्लभांच्या जन्मस्थानाची तेथील लोकांना माहिती करून देऊन तेथें श्रीपादुकांची स्थापना केली. नंतर कोकोनाडा(?काकिन्नाडा) मार्गें राजमहेंद्रीला परत. तेथें ब्रह्मानंद सरस्वती यांनीं स्वामींच्या हस्तें त्रिमुखी **"भक्तवत्सल"** दत्ताची व पादुकांची स्थापना करविली. पुढें इच्छेश्वर, भीमेश्वर, मंथनकाळेश्वर, नागभीडतळोदी, नागपूर मार्गें वेनगंगा तीरावर भंडारा जिल्ह्यांत

१९०९ **पवनी** (पौराणिक पद्मावतीपुरी) येथें १९ वा चातुर्मास. प्रथम स्थानिक लोकांची ओळख नसल्यानें उपेक्षा. मात्र पर गांवच्या भक्तांची वर्दळ सुरूं झाल्यावर सर्व भक्त झाले. नित्य हजार दीड हजारांच्या पक्वान्नांच्या पंक्ति होत. यज्ञयागादिक कार्यें, पुराण, प्रवचन, श्रीस्वामींच्या महा पूजा असे कार्यक्रम थाटानें होत व द्रव्यहि खूप जमे. त्याचा (देवाचा खजिना) विनियोग विद्वानांची संभावना, ब्राह्मणांना दक्षिणा, सुवासिनींना लुगडें-चोळी इ. होई. याच चातुर्मासांत वडील बंधू श्री.शंकरराव, माता उमा बाई व भगिनी गोदावरी यांच्यासह आलेल्या **श्री. वामनराव गुळवणी** यांना अनुग्रह झाला. हेच पुण्याचे सुप्रसिद्ध योगिराज श्रीगुळवणीमहाराज होत. हा चातुर्मास झाल्यावर महाराज बोरी, उनकेश्वरमार्गें माहूरगडावर दर्शन करून फुलसुंगी, हिंगोली मार्गें आजेगांवला श्री.शंकरराव आजेगांवकर यांच्या केशवराजाच्या मंदिरांत मुक्काम. शंकररावांचा क्षयरोग बरा केला.तेथून रेणापुरास येऊन दत्तजयंति केली, बार्शीस अंबरीषवरदाचें दर्शन घेतलें, मकरसंक्रांतीला पंढरपूर करून

**वाडी**स पौ।।१३ ला आगमन. वै।।१२ पर्यंत मुक्काम. 'शृंगेरीस चलावें' अशी आज्ञा होतांच एकसंबे, टाकळी, बेळगांव मार्गें मलप्रभाकांठानें गुर्लहोसूर येथें श्रीकैवल्याश्रम स्वामींच्या आग्रहानें दशाहारापर्यंत मुक्काम. पुढें धारवाडहून श्रीगांडाबुवांना गायत्रापुरश्चरणास पाठविलें. येथें श्रीधुंडिराज कवीश्वर यांची स्वहस्ताची भिक्षा घेतली. तेथून तुंगभद्रा तीरावर -

१९१० **हावनूर** या हावेरी स्टेशनजवळच्या गांवांत त्रिपुरांतकेश्वराच्या देवळांत २० वा चातुर्मास. **श्रीवामनराव गुळवणी यांना १०-१२ दिवस सहवास व व्याघ्रांबरधारी श्रीदत्तात्रेयांचें दर्शन.** तुलागताचें स्नान करून कुपेलूर, शिमोगा मार्गें शृंगेरीस आचार्यपीठास वंदन करून हरिहर, नृसिंहवन करून बनवासी येथें १।। महिना मधुकेश्वराच्या मंदिरांत मुक्काम.दत्तजयंति तेथेंच केली. पुढें शिरसी, सिद्धेश्वर मार्गें गोकर्ण येथें अहिल्याबाईंच्या छात्रांत मुक्काम. १०-१२ दिवस मुक्काम व संक्रांत साजरी. तेथून कोटि तीर्थ, गुर्लहोसूर मार्गें गलगली येथें दोन महिने मुक्काम. तेथें बरींच धार्मिक अनुष्ठानें संपन्न व शैव-वैष्णव सामंजस्य. नंतर जैनापूर, मलप्रभा-कृष्णा संगम, कडलूर मार्गें रायचूरजवळ कृष्णानदींतील दुर्गम बेट

१९११ **कुरुगड्डी** अर्थात् कुरवपूर या श्रीपादश्रीवल्लभांच्या स्थानांत येऊन २१ वा

चातुर्मास. पुढें समाप्तीला पैलतीरावर जाऊन येऊन गुरुद्वादशीपर्यंत तेथेंच राहिले. अशा दुर्गम स्थानींहि पावसाळा असूनसुद्धां भक्तजनांची खूप गर्दी.पुढें कृष्णाकाठानें प्रवास करीत तुळजापूरला जगदंबेचें दर्शन करून **वांजरातीरावर दत्तजयंति** केली. तेथून गोदावरी संगम, परळीवैजनाथ मार्गें **राजूरला** येऊन हंपी शंकराचार्य, श्रीदाजीमहाराज, हैद्राबादचे भटजीबापू यांच्या उपस्थितींत मोठा **स्वाहाकार** केला. तेथून औंढ्यानागनाथ, पिंपरी, उटी, जिंतूर,राक्षसभुवन, बामनी, पांचाळेश्वर, पाथरी, पैठण, हिगोली,दौलताबाद गोंड या भागांत २० स्वाहाकार, दोन चातुर्मास्य याग व दोन ठिकाणीं श्रीदत्तपादुकांच्या स्थापना करून गोपेगावीं आले. तेथें अप्पादेव व अण्णादेव यांना एका कडुनिंबाखालीं अरणें सागितलीं. तो निंब गोड झाला. तेथून वेरूळजवळ घृष्णेश्वराचें दर्शन घेऊन कन्नड, चाळीसगांव, धर्मपूरी मार्गें नर्मदाकाठीं -

**१९१२** **चिखलदा** येथें २२ वा चातुर्मास संपन्न झाला. ६-७ महिने मुक्काम झाला. तेथून कातरखेड्याच्या जंगलांतून प्रवास करीत असतां अश्वत्थाम्यानें वाट दाखविली व ओळख दिली.

**१९१३** **गरुडेश्वर** चैत्र व।। ६ शनिवारीं महाराज या नर्मदाकिनारच्या स्थानीं आले ते शेवटपर्यंत तिथेंच राहिले. २३ वा चातुर्मास तिथेंच झाला. भक्तजनांची खूप गर्दी होऊन स्थानाचें माहात्म्य वाढलें. नित्यश्रीर्नित्यमंगलम् असा मोठा उत्सवच तिथें सुरूं झाला. वैशाखापासून प्रकृति बिघडली. पूर्वाश्रमांत कुणीतरी मागें लावलेला व आयुष्यभर शक्य असूनहि प्रतिकार न करतां सहन केलेला अतिसार बळावला. कोणतेंहि औषध व चिकित्सा घेतलें नाहीं. भक्तांच्या आग्रहाला त्यांचें उत्तर कीं **'या देहाला दोन वेळां सर्पदंश, तीन वेळां महामारी, एक वेळ सन्निपात, एक वेळ प्लेग, दोन वेळां महाव्याधि, दोन वेळां कोड, इतके रोग उत्पन्न झाले. संग्रहणी तर कायमचीच आहे. त्यावेळीं कोणी औषध दिलें. जन्मापासून ज्या वैद्याला धरलें आहे तो याही वेळीं आहेच. त्याची इच्छा असेल तसें होईल**.'

आषाढ शु।। १ प्रतिपदा(मंगळवार, आर्द्रा नक्षत्र, उत्तरायण लागतांच सिद्धासन घालून देवाकडे मुख करून त्राटक केलें. श्वासनिरोध करून दीर्घ प्रणवोच्चार करीत देहाचें विसर्जन केलें.

।।इति शम्।।

# श्रीस्वामीमहाराजांची ग्रंथसंपदा

| ग्रंथ | रचनास्थल | वर्ष |
|---|---|---|
| १. **श्रीगुरुचरितम् (द्विसाहस्त्री) सटीकम्,** | **माणगांव**<br>टीका **प्रभास** व **द्वारका** | मूल **१८८९**<br>टीका **१८९९** |
| २. **श्रीगुरुसंहिता**<br>(समश्लोकी संस्कृत गुरुचरित्र) | **ब्रह्मावर्त** | **१९०२** |
| ३. **सप्तशती गुरुचरित्र** (मराठी) | **ब्रह्मावर्त** | **१९०४** |
| ४. **त्रिशती गुरुचरित्र**(संस्कृत) | **महत्पुर** म.प्र. | **१९०१** |
| ५. श्रीदत्तपुराण (संस्कृत) | **ब्रह्मावर्त** | **१८९२** |
| ६. **श्रीदत्तमाहात्म्य** (मराठी) | **महत्पुर** म.प्र. | **१९०१** |
| ७. **श्रीदत्तलीलामृताब्धिसार** (मराठी) | **पेटलाद** | **१८९७** |
| ८. **श्रीदत्तचम्पू** (संस्कृत) | **नरसी** | **१९०५** |
| ९. **शिक्षात्रयम्** (संस्कृत) **कुमारशिक्षा** | **हम्पी** | **१९०७** |
| **युवाशिक्षा** | **मुक्त्याला** | **१९०७** |
| **वृद्धशिक्षा** | **मुक्त्याला** | **१९०७** |
| १०. **स्त्रीशिक्षा** (मराठी) | **मुक्त्याला** | **१९०७** |
| ११. **लघुवासुदेवमननसार** (मराठी) | **ब्रह्मावर्त** | **१९०३** |
| १२. **माघमाहात्म्य** (मराठी) | **चिखलदा** | **१९००** |
| १३. **पञ्चपाक्षिक**.(संस्कृत) | | |
| १४. **स्तोत्रादिसंग्रह.** | | |